# प्रपंच-कथा

१ कादम्बिनी
२ गर्व-निर्वाण
३ बिजली

द्वितीय खंड ]

शंकर बाळाजी शास्त्री.

भारत-गौरव-ग्रंथमाला, पुष्प ७२ वें.

# प्रपंचकथा

## ( द्वितीय खंड )



न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।

—भगवान् श्रीकृष्ण.

---

लेखक

**शंकर बाळाजी शास्त्री.**

---

# प्रपंचकथा

## ( द्वितीय खंड. )



### कादंबिनी.

गरिबीबरोबर निरंतर अविरतपणें संचार करणाऱ्या नाना हालअपेष्टांच्या समूहांतून कसा तरी मार्ग काढीत कृष्णाला, त्याच्या आईनें, तो चवदा वर्षांचा होईतोंपर्यंत वाढविलें. घरची सांपत्तिक स्थिति अत्यत करुणाजनक, व साऱ्या जगांत आश्रयाला स्थान नाहीं, अशा दुहेरी आपत्तींशीं तोंड देऊन एकुलत्या एक मुलाच्या पालनपोषणाचा भार वाहून नेण्यासाठी तिला किती कष्ट पडले असतील, किती आपत्तींशीं झगडावें लागलें असेल, या गोष्टीची कल्पना वाचकांनींच करावी. अशा अवस्थेत, एके दिवशीं आपल्या लाडक्या मुलाला अगदींच अनाथ अवस्थेत टाकून देऊन ती अकस्मात् स्वर्गलोकीं निघून गेली! कृष्णाचा एक मात्र आधारही आज नाहीसा झाला! त्याला दाही दिशा अगदीं शून्य दिसूं लागल्या!

कृष्णाला कादंबिनी या नांवाची एक सावत्र बहीण होतें. हिच्या घरची स्थिति चांगली होती, असें कृष्णानें ऐकलें होती आजपर्यंत या बहिणीच्या भेटीचा योग कृष्णाच्या १४ वर्षांच्या लहानशा आयुष्यांत कधींच आला नव्हता. पण मातेच्या अचानक मृत्यूमुळें तो असा उघडा पडल्यानंतर गांवांतील कांहीं माणसें म्हणूं लागलीं, " जा, बाबा! आतां तूं आपल्या बहिणीच्याच घरीं जाऊन रहा, म्हणजे मग तुला कशाचीही ददात राहणार नाहीं! "

या आकस्मिक संकटाचा कृष्णाच्या कोमल अंतःकरणावर एवढा जबरदस्त परिणाम झाला कीं, तो मातेच्या मृत्युदिवशींच तापानें आजारी पडला. परंतु एकदोन दिवसांतच तो बरा झाला, व गांवांतील चार मंडळीच्या साहाय्यानें त्यानें आपल्या आईचें क्रियाकर्म यथासांग पार पाडलें. एवढा वेळपावेतों, तो गडबडींतच असल्याकारणानें, त्याला स्वतःबद्दल विचार करावयाला वेळच सांपडला नाहीं. पण क्रियाकर्मांच्या गडबडींतून तो मोकळा होतांच, स्वतःबद्दलचा प्रश्न त्याच्यासमोर दत्त म्हणून उभा राहिला. आपल्या बालबुद्धीला अनुसरून बराच विचार केल्यानंतरही जेव्हां त्याला दुसरा कोणताच मार्ग दिसेना, तेव्हां शेवटीं

त्यानें कादंबिनीकडे जाऊन राहण्याचेंच नक्की ठरविलें. त्यानंतर दुसरे दिवशींच एक लहानसें गांठोडें डोक्यावर घेऊन पायीं चालत चालतच तो कादंबिनीच्या घरीं येऊन उपस्थित झाला. आपल्याला कृष्णा या नांवाचा एक सावत्रभाऊ आहे, ही गोष्ट कादंबिनीलाही ऐकूनच काय ती ठाऊक होती. तिनें त्याला पूर्वी कधींही पाहिलें नव्हतें. तेव्हां आज तो एकाएकीं तिच्या समोर येऊन उभा राहिल्यानंतर तिनें त्याला ओळखलें नाहीं, यांत कांहीं नवल नाहीं. पण कृष्णानें स्वतःचा परिचय करून दिल्यानंतरही तिला भावाच्या भेटीबद्दल आनद वाटल्यासारखें दिसलें नाहीं. कृष्णानें अश्रुपूरित नेत्रांनीं तिला आपल्या दुर्दैवाची सर्व हकीकत सविस्तरपणें सांगितली. पण त्याचादेखील तिच्या मनावर कांहीं विशेष परिणाम झाला असावा असें दिसलें नाहीं. कृष्णाचें सर्व भाषण ऐकून घेतल्यानंतर ती उत्तरादाखल एक लहानसा निःश्वास टाकून म्हणाली, "अस्सं !"

वास्तविक पाहतां कादंबिनीच्या घरची सांपत्तिक स्थिति चांगल्यापैकीं असून, कृष्णाच्या पालनपोषणाचा भार तिच्याकडे आला असतां, तिला तो जड वाटण्याचें कांहींच कारण नव्हतें. तिचा पति देखील सहसा तिच्याविरुद्ध जात नसे. अशा परिस्थितींत कृष्णाच्या अनाथ अवस्थेबद्दल करुणा उत्पन्न होऊन त्याला आश्रय देण्यास तिनें अनमान करण्याचें कांहींच कारण नव्हतें. पण तिला कृष्णा आपल्या घरीं येऊन राहणार ही कल्पना विशेष रुचली नाहीं हें खास ! आतांपर्यंत आपल्या पोरांबाळांसहित सर्व संसाराचा गाडा ती मोठ्या आनंदानें हांकलीत होती; आज त्या आनंदाचा विरस करण्याकरितां, कृष्णा डोंगरासारखा आपल्या मार्गांत येऊन उभा राहिला आहे, असें तिला वाटलें !

कादंबिनीच्या गांवापर्यंत कृष्णाला पोहोंचविण्याकरितां त्याच्याबरोबर त्याच्या गांवचा एक म्हातारा न्हावी आला होता. कृष्णाचें हें विघ्न आपल्या बोकांडीं बसविण्याबद्दल हा म्हाताराच जबाबदार असावा असें वाटून कादंबिनी त्याच्याकडे वळून किंचित् कठोर स्वरांत म्हणाली, "कां रे, ए ! या पोराला माझ्या घरीं आणून, माझ्या पोरांच्या तोंडचा घांस काढण्याची एवढी उठाठेव करण्याचें तुला काय कारण होतें ?" नंतर ती कृष्णाच्या मृत मातेला उद्देशून म्हणाली, "याची आई जोंपर्यंत जिवंत होती, तोंपर्यंत मी जिवंत आहें किंवा नाहीं याबद्दल देखील कधीं तिनें विचारपूस केली नाहीं, कीं कधीं आठवण काढली नाहीं. पण तेंच आतां ती मेल्यानंतर हा एवढा पाझर फुटला कसा ? जिवंत जीव

असे तोंपर्यंत थेरडीनें कधीं फुकाचें देखील सुख लाभू दिलें नाहीं; आणि जीव गेल्यानंतर अशा रीतीनें आमच्या सुखाच्या आड उभी राहात आहे! जा रे बाबा!—नकोच तें! या पोराची सोय आमच्या येथे जमेलसें मला वाटत नाहीं! दुसऱ्याचं पोर! उगीच जबाबदारी कोणी ओढून घ्यावी! मला नको हें विकत श्राद्ध! जा, घेऊन जा याला परत!"

म्हातारा जातीनें न्हावी होता, पण कृष्णाच्या आईबद्दल त्याला अत्यंत आदर वाटत असे. तो तिला 'आई' म्हणून हांक मारीत असे. तिच्या सुस्वभावाबद्दलही प्रत्यक्ष अनुभवामुळें त्याची खात्री झाली होती. कादबिनीचें वरील भाषण ऐकून त्याला अत्यत आश्चर्य वाटलें, व खेदही झाला! आपल्याला अत्यंत पूज्य वाटत असलेल्या व्यक्तीबद्दल असे निंदापूर्ण कटु उद्गार ऐकण्याचा प्रसंग आपल्यावर यावा, याबद्दल त्याला अत्यंत वाईट वाटलें! परंतु त्याच ठिकाणीं कृष्णाची व्यवस्था लावून देण्याखेरीज दुसरा मार्ग नसल्यामुळें त्याला तें सर्व मुकाट्यानें ऐकून घेणें भाग होतें! कृष्णाच्या मृत मातेची स्मृति मनांत बाळगून, तिच्यानंतर तिच्या मुलाला अन्नान्नदशेंत हाल भोगीत दिवस काढावे लागूं नयेत अशी व्यवस्था करणें त्याला आपलें कर्तव्य वाटत होतें; आणि म्हणूनच तो कृष्णाबरोबर येथपर्यंत आला होता. कादंबिनीचें सर्व कठोर भाषण अगदी स्तब्धपणें ऐकून घेतल्यानंतर तो हळूच अतिशय नम्रपणें तिला म्हणाला, "बाईसाहेब, आपणच त्यांना असें दूर लोटल्यावर मग त्यांनीं कोणाच्या तोंडाकडे पहायचें बरें? आपल्याखेरीज त्यांना कोणाचा आश्रय मिळणार? ईश्वराच्या दयेनें आपल्या घरीं कुबेराचें भांडार आहे—प्रत्यक्ष लक्ष्मी आपल्या घरीं वसतीला आहे! आपल्या घरच्या उष्टावळीवरच आज किती तरी भणंगभिकारी, कुत्रींमांजरें जगत असतील! आपल्या कनवाळूपणाबद्दलचा लौकिक आमच्या गांवापर्यंत देखील पोहोंचला आहे. आणि म्हणूनच, मी मुद्दाम यांना आपल्या आश्रयाला घेऊन आलों आहें. एवढे जीव आपल्या येथे जगताहेत, त्यांपैकींच हाही एक आहे असें समजा. दोन घांस खाऊन ओसरीवर आंग टाकीत जाईल; त्यामुळें आपल्या अंगावर कांहीं भार पडणार आहे असें नाहीं! त्यांचा स्वभाव देखील फार शांत व सुशील आहे. त्यांच्यापासून तुम्हाला कांहीं देखील त्रास होणार नाहीं! आणि, किती झालें तरी ते आपले भाऊच आहेत ना? त्यांना असें झिडकारून कसें बरें चालेल? भाऊ म्हणून ठेवायचें नसेल, तर गरीब ब्राह्मणाचें पोर म्हणून तरी त्यांना आश्रय द्या; पण असें दूर लोटूं नका!"

स्तुतीच्या अशा जबरदस्त भडिमारानें काळा डगला घातलेल्या शिपाईदा-दाचें मन देखील पाझरले असतें; मग कादबिनी तर किती झालें तरी स्त्रीच होती. म्हाताऱ्याचें भाषण ऐकून घेतल्यानतर ती कृष्णाला ठेऊन घेण्याच्या विरुद्ध कांहींच बोलली नाहीं. स्तुतीच्या चाटुवाक्यांमुळें तिच्या मुखावर खेळत असलेल्या मद स्मिताकडे पाहून म्हाताऱ्याला विजय मिळाल्याबद्दल खात्री वाटूं लागली. त्यानें कृष्णाला एकीकडे बोलावले, व उपदेशाच्या दोन गोष्टी सांगून डोळे पुशीत पुशीत त्यानें आपल्या गांवाकडे प्रयाण केलें.

अशा रीतीनें कृष्णाला एकदांचा आश्रय मिळाला!

कादबिनीच्या पतीचें नाव नवीनचंद्र! हे तांदुळाचा व्यापार करीत असत. बाजारआळींत यांचे तांदुळाचें एक मोठें दुकान होतें. दररोज प्रातःकाळीं दुका-नावर जायचें, आणि दोनप्रहरीं बारा वाजून गेल्यानंतर परत घरीं यायचें असा यांचा परिपाठ होता. रोजप्रमाणे आजही घरीं येऊन पाहतात तों एक नवीनच मुलगा बसलेला त्यांना दिसला. त्याच्याकडे किंचित् वक्रदृष्टीनें पहात त्यांनीं पत्नीला प्रश्न केला, " कोण हा ? "

हंसत हंसत कादबिनीनें उत्तर दिलें, " कोण हे का ? हे तर आपले अगदीं जवळचे आप्त! हे तुमचे बऱ्या घरचे बडे मेहुणे आले आहेत तुमच्या घरीं! यांच्या भोजनाची वगैरे नीट बरदास्त ठेवण्याचें कार्य सुदैवानें आपल्याकडे आलें आहे! यांची सर्व व्यवस्था उत्तम ठेवली पाहिजे–म्हणजे स्वर्गांत स्थान मिळायला कांहीं अडचण पडणार नाहीं! " अशा प्रकारें आपल्या पतीची व कृष्णाची ओळख करून दिल्यानंतर कादबिनीनें आपल्या सावत्र आईच्या मृत्यू-बद्दलची बातमी नवीनबाबूला कळविली. त्याबरोबर सर्व प्रकार नवीन बाबूच्या लक्षांत चांगल्या तऱ्हेनें आला. आपली तीक्ष्ण दृष्टि कृष्णाकडे कांही वेळ रोखून नवीनबाबू म्हणाले, " अस्सं! शरीरानें तर चांगला गुटगुटीत दिसतो आहे! " हें वाक्य त्यांनीं कोणत्या हेतूनें उच्चारलें असावें, तें त्यांनाच माहित!

कादंबिनी म्हणाली, " गुटगुटीत नसायला काय झालें ? बाबा वारले, आणि त्यांच्या नंतर त्याच्या जवळ होतें नव्हतें, तें सारें यानें गिळंकृत केलें. थेरडीनें आमच्या तोंडाला चांगलीच पानें पुसलीं; एक फुटकी कवडीदेखील हातीं लागूं दिली असेल तर शपथ! सारेंच या चिरंजिवाच्या उरावर घातलें! मग कां नाहीं गुट गुटीत होणार ? "

पण वस्तुस्थिति अगदींच निराळी होती. कादबिनीनें वर्णन केलेलें हें सर्व "होतें नव्हते" म्हणजे एक अगदीं मोडकळीस आलेलें लहानसें घर व त्याच घराच्या परसांत असलेलीं एक दोन संख्याचीं झाडें! या जीर्ण खोपटात कृष्णाची आई रात्रीचे वेळीं आपलें मस्तक टेंकी; व दिवसा, गांवांत दळण काडण वगैरे करून आणि परसांतल्या झाडांचीं फळें विकून आपलें व मुलाचें पोट भरी! या उत्पन्ना-(?) मधूनच ती कसें तरी करून मुलाचा शाळेचा खर्चही भागवीत असे! परंतु वस्तुस्थिति जरी अशी असली, तरी नवीनचंद्राला यापैकीं काहींच ठाऊक नसल्या कारणानें पत्नीनें सांगितलेल्या हकीकतीवर त्याचा साहजिकच विश्वास बसला! तो काहींसा संतापानें म्हणाला, "वाः! फार चागलें!"

कादंबिनी पुढें म्हणाली, "अहो, चागलेंच नाहीं तर काय? आपलें केवढें सुदैव कीं आमचे हे श्रीमत बंधुराज आपल्या धरी पायधूळ झाडायला आले, व अनायासेंच आपल्या पदरी पुण्य बाधून देण्याचा योग आणून दिला! आपण त्यांचे आभारच मानायला हवे! यांचा सर्व मानमरातब यांच्या मोठे-पणाला साजेसाच ठेवायला पाहिजे! नाही तर त्याच्या व्यवस्थेंत तिळभर जरी उणें पडलें, तरी गावात तोंड काढायला जागा राहणार नाहीं!" असें बोलून तिनें समोरच्या दोनमजली घराकडे एक अत्यत क्रोधपूर्ण दृष्टिनिक्षेप केला! तिच्या क्रोधाला उत्तेजक अशी शक्ति त्या समोरच्या घरांत वसत होती खरीच! हें घर नवीनचंद्राच्या धाकट्या भावाचें असून, तेथे तो हेमागिनी या नांवाच्या आपल्या पत्नीसह रहात असे!

पतिपत्नीचें असें संभाषण सुरू असतां, कृष्णा बिचारा बाहेर ओसरीवर बसून सर्व वाक्प्रहार मुकाट्यानें ऐकून घेत होता. लज्जेमुळें त्याला जीव अगदीं जड वाटूं लागला होता. इतक्यांत कादंबिनी आंत गेली, व एका वाटींत थोडेंसें खोबऱ्याचें तेल आणून, ती वाटी कृष्णासमोर किंचित् जोरानेंच आदळून म्हणाली, "हं, हें घ्या, डोक्याला लावा, आणि आंघोळ उरकून या लवकर. चालेलना हें खोबऱ्याचें तेल? का सुगंधी तेलें लावण्याची संवय आहे तुम्हाला?" असा टोमणा मारल्यानंतर पतीकडे मुख वळवून ती म्हणाली, "ऐकलें का? स्नानाला जातेवेळीं यांनाही आपल्याबरोबर घेऊन जा; नाहीं तर, पाण्यांत बुडून जीव-बीव गेला तर घरांतल्या साऱ्या माणसांच्या हातांत सरकारी अलंकार पडायचे!"

कोणीही तलावांत बुडून न मरतां एकदांचा स्नानाचा समारंभ निर्विघ्नपणें पार पडला. त्यानंतर दोघेही भोजन करण्याकरितां बसले. कृष्णा नेहमींच भात जास्त

खात असे. त्यांत कालपासून त्याला कांहींच खाण्याकरितां न मिळाल्याकारणानें, आज पोटांत क्षुधेनें अगदीं काहूर माजविलें होतें. मार्गश्रमामुळें, खाण्याकरितां केव्हां मिळतें असे त्याला झालें होतें. हीं सर्व कारणें त्याच्या दुर्दैवानें आजच एकत्रित झाल्यामुळें, भोजनाला बसला असतांना, कृष्णाच्या पानावरचा भात फारच लवकर संपला, हें जवळच बसलेल्या नवीनबाबूच्या ध्यानांत आलें व ते पत्नीला म्हणाले, "अग, कृष्णाला थोडा आणखी भात वाढ!" "वाढतें." असें म्हणून कादंबिनी उठली व एक झांकणी भरून भात आणून त्याच्या ताटांत ओतून, मोठ्यानें उच्च हास्य करून म्हणाली, "हं घ्या, जेवा."

हा प्रकार पाहून कृष्णाचें मुख लज्जेनें लाल झालें! त्यानें लाजून खालीं मान घातलेली पाहून कादंबिनीला जास्तच स्फुरण आल्यासारखें दिसलें. ती पतीकडे वळून म्हणाली, "हा असाच प्रकार आणखी कांहीं दिवस चालू राहिला, तर दुकानाचें दिवाळें लवकरच वाजणार खास! कांहीं तरी दुसरा उपाय शोधून काढल्याखेरीज कांहीं हा पांढरा हत्ती आपल्याला पोसतां येणार नाहीं! असं करा; आज संध्याकाळीं दुकानावरून येतांना चांगल्या जाड तांदुळाचें एक पोतें घेऊन या! उंची तांदूळ अशा तऱ्हेनें खपवून पुढें चौपदरी नाहींना घ्यायची हातीं? बाई, बाई! काय, राक्षस का उठला आहे पोटांत याच्या?"

मार्गानें चालत असतां, पोटांत भुकेनें प्रलय मांडला असतां घरीं गेल्याबरोबर ताईला अगोदर कांहीं तरी खाण्याकरितां मागायचें असा कृष्णानें निश्चय केला होता. परंतु घरी येतांच, त्याचें जें अपूर्व थाटाचें प्रेमळ स्वागत झालें, त्यामुळें त्याचा तो निश्चय मनांतल्या मनांतच जिरला. आत्यंतिक आनंदानें, किंवा दुःखानें मनुष्याची तहानभूक नाहींशी होते असें म्हणतात. ताईनें भावाच्या केलेल्या अपूर्व स्वागतामुळें मात्र कृष्णाची भूक खरोखरच पळाली होती. पण आतांपर्यंतच्या कादंबिनीच्या सर्व वाग्बाणांपेक्षां, तिनें तो जेवत असतांना बोललेले शब्द त्याच्या हृदयात अगदीं खोल खोल रुतून बसले. तो आपल्या आईचा एकुलता एक मुलगा होता. अगदीं गरिबीच्या अवस्थेत तो आपल्या घरी रहात असतांना, त्याची आई त्याला उची बारीक तांदुळाचा भात खाऊं घालीत होती किंवा नाहीं कोणाला ठाऊक! पण पोटभर जेवल्याबद्दल त्याला तिच्याकडून कधीं टोमणे सहन करावे लागले नाहींत खास! जास्त भात

खाण्याच्या अक्षम्य अपराधाबद्दल त्याला लज्जेनें कधींही खालीं मान घालण्याचा प्रसंग आला नव्हता! उलट, आपल्या मुलाला पोटभर खाऊं घालण्याचें सामर्थ्य आपल्या अंगीं नाहीं, याबद्दल त्याच्या आईला आमरण वाईट वाटत असे. तो कितीही जेवला, तरी तो पोटभर जेवला नाहीं, असेंच त्याच्या आईला वाटून तिच्या प्रेमळ हृदयाचें कधींही समाधान होत नसे!

गतकाळांतील या सर्व प्रसंगांची स्मृति त्याच्या अंतःकरणांत जागृत होऊन त्याचे नेत्र भरून आले. पण हात वर करून नेत्र पुसण्याचें साहसदेखील त्याला करवेना! कदाचित् हें ताईच्या लक्षांत येऊन पुन्हा बोलणें ऐकावें लागेल, या भयानें तो तसाच खालीं मान घालून जेऊं लागला. डोळयांतले अश्रू ताटांत पडत होते; व ताटांतला भात हळू हळू कृष्णाच्या पोटांत जात होता. कादंबिनीच्या भीषण वाक्प्रहारांबद्दलच्या धाकानें, त्याच्या मातृ-शोकाचा गळा जणूं काय चेपून टाकला!

[ २ ]

वडिलोपार्जित इस्टेटीची विभागणी बरेच दिवसांपूर्वी करण्यांत आली होती. नवीनचंद्राच्या दुसऱ्या भावाचें नांव विपिनचंद्र. या दोघांखेरीज त्यांना आणखीही एक तिसरा भाऊ होता; पण तो लहानपणींच मरण पावला.

विपिनचंद्र देखील तांदुळाचाच व्यापार करीत असे. त्याचा रोजगार नवीनचंद्रासारखा मोठ्या प्रमाणांत जरी चालत नव्हता, तरी पण त्याचें उत्पन्न साधारण बऱ्यापैकीं होतें. तो जरी वडील बंधूपेक्षां कमी श्रीमंत होता, तरीसुद्धां त्याची राहणी नवीनचंद्रापेक्षां जास्त थाटमाटाची होती. याचें कारण, त्याची पत्नी हेमांगिनी. हिचें माहेर शहरांत असल्या कारणानें लहानपणापासूनच तिची रहाणी शहराला साजेशीच होती. परमेश्वरानें जो पैसा दिला आहे, तो जमिनींत पुरून ठेवण्याकरितां नसून, त्याचा योग्य रीतीनें उपभोग घ्यावा म्हणून दिला आहे, असें तिचें मत होतें. तिचे घर नेहमीं दासदासी, अतिथिअभ्यागत इत्यादि माणसांनीं गजबजलेलें असे. तिचा स्वभाव फार खर्चिक आहे; हात राखून खर्च करण्याची तिला संवय नाहीं, याच कारणावरून मागें पाच सात वर्षांपूर्वी उभयतां जावांमध्यें तंटा सुरू झाला. शेवटीं भांडण विकोपास जाऊन दोघेही बंधु वेगवेगळे राहूं लागले.

हीं दोन्ही कुटुंबें निरनिराळ्या घरांत राहूं लागलीं, म्हणून जावाजावांमध्यें भांडणें होत नसत असें मात्र नाहीं. याचें मुख्य कारण, म्हणजे कादबिनीचा कुत्सित स्वभाव. कांहीं तरी क्षुल्लक कारणावरूनसुद्धां एखादे प्रसगीं भाडण उपस्थित व्हावयाला फारसा वेळ लागत नसे. अशी भाडणे किती तरी झालीं; व तीं सर्व मिटलीं देखील. परंतु उभयताच्या अतःकरणात उत्पन्न झालेलें मालिन्य मात्र नाहीसें झालें नाहीं. हें मनोमालिन्य नाहींसें होणे फक्त वडील जावेकडे—कादंबिनीकडेसच होतें. हेमांगिनीचा स्वभाव जात्याच प्रेमळ असल्याकारणानें, आणि कुटुंबांतील माणसे एकत्र गुण्यागोविंदानें नांदावी, अशी तिची अतःकरणापासून इच्छा असल्याकारणानें, कादबिनीनें इच्छा प्रदर्शित केली असती, तर हा उभयतां जावांमधील तंटा केव्हांच नि:शेष झाला असता. परंतु कादंबिनीनें "चार पावसाळे" जास्त पाहिले असल्यामुळें तिला जगाचा अनुभव हेमांगिनीपेक्षां जास्त होता; तिचें ठाम मत होतें कीं, एकदां तडकलेली कांच पुन्हां पूर्ववत् होणें शक्य नाहीं. हेमांगिनीनें ते "चार पावसाळे" पाहिले नसल्यामुळें अर्थातच तिचें मत असे नव्हते. पुष्कळदा ती स्वतःच भांडणाला कारण होत असे, हें खरें; परंतु क्रोध शांत झाल्यानतर वडील जाऊबाईची समजूत घालण्याकरितां व दोघांमध्यें भाषण सुरू होण्याकरितां तिच्या अतःकरणाला सारखी तळमळ लागत असे; व शेवटीं कादबिनीच्या हातापायां पडून, नानाप्रकारें तिच्या विनवण्या करून, व रडूनसुद्धां ती तिची मर्जी सुप्रसन्न करून घेई. अशा प्रकारें कादबिनीचा व हेमांगिनीचा आयुष्यक्रम सुरू होता!

आज दोनप्रहरची गोष्ट. सरासरीं २॥ वाजण्याचा सुमार. अशा वेळीं हेमांगिनी कादबिनीच्या घरीं सहज आली. पाहते, तों विहिरीच्या कांठीं भर उन्हांत एक अनोळखी मुलगा कपड्याला साबण लावीत आहे. समोर धुण्याकरितां म्हणून ठेवलेल्या वस्त्रांचा एक भला थोरला ढीग पडला आहे; हाताशेजारींच गंगाळांत साबणाच्या फेंसामुळे किंचित पांढरें झालेलें पाणी आहे; व बाजूला कादंबिनी उभी असून, वस्त्राला थोडें साबण लावून जास्त जोरानें धुतल्यास तें लवकर कसें स्वच्छ करतां येतें, याबद्दल नुसत्या शब्दांनींच त्या मुलाला धडा देत आहे! हा अनोळखी मुलगा कृष्णाच होता, हें वाचकांना सागण्याची आवश्यकता नाहीं.

एकाएकीं हेमांगिनी आलेली पाहून कादबिनी तिच्याकडे न पाहतां, स्वतःशींच म्हणाली, "बाई, बाई, बाई! किती वस्त्रें आणलीं धुण्याकरितां या पोरानें हीं!"

गोष्ट कांहीं खोटी नव्हती. कृष्णाचें धोतर व सदरा, दोन्हीही साधारण मळले होते हें खरें; व स्वच्छतेच्या व आरोग्याच्या दृष्टीनें, परिटाच्या अभावीं, ते स्वतःच धुऊन स्वच्छ करणेंही आवश्यक होतें. पण याच सुमारास कादंबिनीचे पति नवीनचंद्र व चिरंजीव गोपाळ, या उभयतांचेही कपडे मळकट झालेले होते. कार्यबाहुल्यामुळें, किंवा अन्य काही कारणामुळें त्या दोघांना आपापलीं वस्त्रें स्वतःच स्वच्छ ठेवणें शक्य नव्हते. दुसरे, कृष्णाला तरी कांहीं तरी उद्योग हवाच ना ? मनुष्याच्या मागें कांहीं उद्योग नसला, तर जीवनांत त्याला सुख प्राप्त होणें शक्य नाहीं. तेव्हा, काळ आनंदात जावा म्हणून प्रत्येकानें निरंतर कांहीं तरी उद्योग करीत असले पाहिजे असा नवीनबाबूचा दृढ सिद्धांत होता ! अशा एकंदर कारणांमुळें, आज कृष्णा स्वतःच्या वस्त्रांबरोबरच त्या दोघांची वस्त्रेंही धुण्यांत गुंतला होता. आपल्या भावाचा काळ दुःखात जावा हे कादंबिनीसारख्या प्रेमळ भगिनीला तरी कसें पाहवेल ? या कारणाकरितां ही सर्व वस्त्रे ती स्वतःच्या देखरेखीखालीं कृष्णाकडून धुववून घेत होती !

कृष्णाच्या समोर पडलेल्या वस्त्रांच्या ढिगाकडे हेमांगिनीची दृष्टि जातांच, वस्त्रें कोणाचीं असावीं ह्याबद्दल तिला मुळीच शंका उरली नाहीं. पण ही गोष्ट लक्षांत घेऊन सुद्धा तिनें तिचा उघड उल्लेख करण्याचे मुद्दाम टाळले. कादंबिनीकडे वळून तिनें विचारले, " बाई, हा मुलगा कोण ? अनोळखीच दिसतो आहे ! "

कादंबिनीकडे तिचा भाऊ राहण्याकरिता आला आहे, हें हेमांगिनीला पूर्वीच कळलें होतें; व तो भाऊ म्हणजे हाच असावा, हें देखील तिनें अनुमानानें ताडलें होतें. तरी देखील तिनें तसे कांहीं एक न दर्शविता कादंबिनीला वरील प्रश्न मुद्दामच विचारला. उत्तर देण्यास कादंबिनी बराच विलंब करीत आहे असें पाहून तीच पुन्हा म्हणाली, " दिसायला देखील कोणा तरी थोरामोठ्यांच्याच घरच्यासारखा दिसतो आहे. आणखी बाई, तुमच्या आणि याच्या तोंडवळ्यांत बरेंच कीं हो साम्य आहे ! तुमच्या माहेरचाच तर नव्हे ना हा कोणी तरी ? "

एवढें झाल्यानंतर मग उत्तर न देणें अशक्य होतें. किंचित् विरक्त व गंभीर स्वरांत कादंबिनी म्हणाली, " होय. हा माझा सावत्रभाऊ. अरे ए कृष्णा, वडील माणसांना नमस्कार करावा एवढें देखील तुला समजत नाहीं का ? काय तरी बाई रानटी पोरगा ! सभ्यतेचे चार शिष्टाचार देखील याला ठाऊक नाहींत. याला म्हणावं तरी काय ? चल, ये असा आणि तुझ्या वहिणीला नमस्कार कर !

एवढा मोठा वाढलास तू; अजूनपावेतों या साध्या गोष्टी शिकविण्याला देखील तुझ्या मातोश्रीला वेळ मिळाला नाही वाटतें ? ”

हें ऐकतांच कृष्णा धडपडून उठला, व लवकर लवकर येऊन त्यानें कादंबिनीला नमस्कार केला. त्याबरोबर ती जास्तच रागावून आशीर्वादादाखल म्हणाली, “ जळलें मेल्या तुझें लक्षण ! मेल्याला नमस्कार करायला सांगितलें कोणाला, आणि यानें नमस्कार केला कोणाला ! ”

कृष्णानें या घरांत पाऊल ठेवल्यापासून तिरस्कार व अपमान यांखेरीज त्याला दुसऱ्या कशाचाही लाभ झाला नव्हता. जेव्हां पहावें, तेव्हां कादंबिनी त्याच्यावर सारखी धुसफुसत असे. ह्याचा परिणाम असा झाला, की कादंबिनी समोर असली कीं त्याचें हृदय भीतीमुळें गर्भगळित होऊन जाई. काय केलें म्हणजे ताईची मर्जी संपादन करून घेता येईल, ही विवंचना त्याच्या बालहृदयाला सारखी पीडा देत होती. ‘ तुझ्या बहिणीला नमस्कार कर. ’ हे शब्द बहिणीच्या मुखावाटे निघताच, तो तत्परतेने उठला व कादंबिनीपुढें जाऊन त्यानें मस्तक नम्र केले. हेमागिनी कोण, हे त्याला ठाऊक नसल्याकारणानें, तिला नमस्कार करण्याची आज्ञा झालेली आहे, हे त्याला समजले नाही. पण कादंबिनीच्या शेवटच्या क्रोधपूर्ण वाक्याने त्याची चूक त्याच्या ध्यानात आणून दिली ! तो घाबरून उठला, व हेमागिनीसमोर येऊन तिला नमस्कार करण्याच्या उद्देशानें खालीं वांकला. त्याचे मस्तक हेमागिनीच्या चरणास स्पर्श करण्याच्या पूर्वींच हेमागिनीनें त्याला प्रेमपूर्वक वर उचललें व त्याच्या मस्तकावरून हात फिरवीत त्याच्याकडे पहात म्हणाली, “ नको, नको. नमस्कार करण्याची आवश्यकता नाही. चिरंजीव हो बरं, बाळ ! ”

आश्चर्यानें मूढ होऊन कृष्णा सारखा हेमागिनीच्या मुखाकडे पाहू लागला. या प्रांतांत राहणाऱ्या व्यक्तीच्या मुखावाटे असे प्रेमळ उद्गार निघू शकतात तरी कसे, ह्या गोष्टीचा त्याला उलगडा होईना ! त्याचें ते भीत, कुंठित व असहाय असें दीन मुख पाहून हेमागिनीचें हृदय भडभडून आले. यापुढें स्वतःचे संवरण करणे अशक्य झाल्यामुळे, तिनें त्याला आपल्या पोटाशी ओढलें, व स्वतःच्या पदराने त्याच्या कपाळावरील घर्मबिंदु पुशीत पुशीत ती गद्गदस्वरानें कादंबिनीकडे वळून म्हणाली, “ बाई, या एवढयाशा कोंवळ्या पोराकरवीं का तुम्ही धुण्याची ही एवढी मोठी मोट धुववून घेणार ? एखाद्या चाकराला हाक मारून त्याच्याकडे नाहीं का हे काम सोपविता आले ? ”

एकंदर प्रकार हेमांगिनीच्या दृष्टीस पडला, हेंच प्रथम कादंबिनीला कसेंसेंच वाटत होतें. त्यांत पुन्हा हेमांगिनीचें वर्तन पाहून व तिनें विचारलेला तो प्रश्न ऐकून तर ती अगदींच गोंधळून गेली. तरी पण आपल्या चित्ताची अस्थिरता बाहेर प्रगट न करतां ती तशीच धीटपणानें रागाचा आव आणून म्हणाली, "आम्ही आपलीं गरीब माणसें! वाटेल त्या लहानसहान कामाकरता चाकर-ठेवण्याकरितां आम्ही कुठें बाई तुझ्याप्रमाणे श्रीमंत आहोंत? माझा आपला आहे गरिबीचा संसार! मला तर—"

परंतु हा वाद पुढें वाढवावा अशी हेमांगिनीची इच्छा नव्हती. जावेचें भाषण संपण्यापूर्वींच तिनें आपले मुख स्वतःच्या घराकडे वळविलें, व आपल्या मुलीला हांक मारून म्हणाली, "उमा, अग उमा! त्या शिवाला इकडे पाठवून दे पाहूं. म्हणाव, हे एवढे भाऊजींचे आणखी गोपाळचे कपडे धुवून या इथ वाळत लावून दे लवकर." नंतर कादंबिनीकडे वळून ती पुढे म्हणाली, "बाई, आज संध्याकाळीं कृष्णा आणि गोपाळ दोघेही माझ्या घरीच जेवतील, बरं का! शाळेतून परत आल्याबरोबर गोपाळला माझ्याकडे धाडून द्या. तोपावेतो मी कृष्णाला आपल्याबरोबर घेऊन जातें!" त्यानंतर हंसत हंसत कृष्णाकडे पाहून, त्याचा हात आपल्या हातात धरून ती प्रेमळ स्वरांत म्हणाली, "बाईप्रमाणेच मीदेखील तुझी बहीणच आहें, बरें का कृष्णा! चल, येतोस ना माझ्याबरोबर तू! शाळा सुटायची देखील वेळ झालीच म्हणायची! गोपाळ पण येईल आपल्या मागोमाग. चल, आपण जाऊं या!" असें म्हणून, कादंबिनीच्या अनुमतीची वाट न पाहतां ती कृष्णाला आपल्या घरी घेऊन गेली.

कादंबिनीला देखील मध्ये व्यत्यय आणण्याचे काही प्रयोजन आहे, असें वाटलें नाहीं. इतकेंच नव्हे, तर हेमांगिनीनें मारलेला टोमणा देखील तिने मुकाट्यानें सहन केला. इतर प्रसंगी तिनें हेमांगिनीची चांगलीच खरडपट्टी काढल्याखेरीज कधींही सोडलें नसतें. पण आज मूग गिळून बसण्याचें कारण असें होतें कीं, हेमांगिनीनें जरी तिखट भाषा वापरली असली, तरी तिने संध्याकाळपुरता दोन पोटांचा खर्च कमी केला होता! संसारांत पैसा म्हणजे परब्रम्ह मानणाऱ्या काद-बिनीसारख्या क्षुद्र मनोवृत्तीच्या स्त्रीनें असे वागावें यात आश्चर्य वाटण्यासारखे काय आहे? दूध काढीत असता गाईनें एखादी लाथ जरी हाणली, तरी ती मुकाट्यानें सहन केलीच पाहिजे, अशी तिची सहज व्यावहारिक बुद्धि (?) होती!

[३]

सायंकाळीं, हेमांगिनीकडून भोजन आटोपून आल्यानंतर, कादंबिनीनें कृष्णाकडे वक्र दृष्टीने पहात प्रश्न केला, “ हूं, आलास का एकदांचा परत ! काय काय केलें होते रे आज ? ”

सलज्जपणे खालीं मान घालून कृष्णा म्हणाला, “ पुरी ! ”

कांहींसे आश्चर्य वाटून कादंबिनीनें विचारलें, “ आणखी ? ”

कृष्णानें पूर्वीप्रमाणेच सलज्जपणेंच उत्तर दिले, “बटाट्याची भाजी, बासुंदी—” कृष्णाला बिचाऱ्याला काय ठाऊक कीं या पदार्थांच्या नांवांच्या अंगी दुसऱ्याच्या अंगाचा भडका उडविण्याचें आश्चर्यकारक सामर्थ्य आहे म्हणून ? नाही तर त्यानें तीं नांवें उच्चारलीच नसती. परंतु या नांवांतील ‘ जादूचा ’ परिणाम मात्र व्हावयाचा तो झालाच ! कादंबिनी तीव्र स्वरांत म्हणाली, “ अस्स ! आज तुम्हाला मेजवानी होती तेथे एकूण ! पण काय रे, बासुंदी जास्त कोणाला वाढली, तुला की गोपाळला ? ”

त्या विवक्षित स्वरात उच्चारलेला तो प्रश्न कानी पडतांच, कृष्णाचें तोंड पांढरें फटफटीत पडले. दाव्यानें जखडून बांधलेल्या वासरावर प्रहार करण्याकरितां काठी उगारल्यानंतर त्या वासराची जशी स्थिति व्हावी, तशीच स्थिति या वेळी कृष्णाची झाली. कादंबिनीच्या प्रश्नाला काय उत्तर द्यावे ते त्याला सुचेना. कसेंही उत्तर दिलें, तरी पंचाईतच. बराच वेळ झाला, तरी त्याच्या मुखावाटे शब्द निघत नाही असें पाहून, खरा प्रकार काय झाला असावा, त्याची कल्पना कादंबिनीला तेव्हाच करता आली. ती विलक्षण स्वरात म्हणाली, “ तुलाच वाटतं !” जणू काय हा कृष्णाचाच अपराध होता.

दुसऱ्यांना कांहीं जरी वाटले, तरी कादंबिनीप्रमाणें कृष्णाला देखील, हा त्याचाच अपराध असावा असें खात्रीपूर्वक वाटलें. एखाद्या घोर गुन्हेगाराप्रमाणे त्यानें आपली मान खाली घातली !

नवीनबाबू जवळच दारात बसून गुडगुडीचा मधुर स्वाद सेवन करण्यांत दंग झाले होते. त्याच्याकडे मोर्चा वळवून कादंबिनी म्हणाली, “ ऐकले का ? ”

नवीनबाबूनीं संक्षेपांत उत्तर दिले, “ काय ? ” हा एक शब्द उच्चारून ते पुन्हा गुडगुडी ओढण्यांत तल्लीन झाले.

कादंबिनीनें स्वर किंचित् तीव्रतर केला व भाषणास सुरवात केली, " ही हेमांगिनी म्हणजे आपलीच ना ? पण तिचें वर्तन पाहिले का कसे तें ? आपल्या गोपाळाला बासुंदी फार आवडते, हे तिला ठाऊक का नव्हतें ? तरी देखील तिनें त्याला टाकून देऊन, कृष्णाच्याच पानांत जास्त बासुदी वाढली ! कसें काय कृष्णराव, बासुदीपुरीवर चांगला यथेच्छ ताव मारला ना ? चैन आहे बुवा तुमची ! साता जन्मांत ज्या वस्तू कधी डोळ्यांनीं पहायला देखील मिळाल्या नसतील, त्या आज तुला पोटभर खायला मिळाल्या !" नतर पुन्हा पतीकडे दृष्टिनिक्षेप करून ती पुढें म्हणाली, " ज्याला दोन वेळ पोटाला मिळण्याची मारामार, त्याला असल्या मेजवान्यांचे काय वाटेल, ते तुम्हीच सांगा पाहू ? मला आतां खात्रीपूर्वक वाटू लागले आहे, कीं हेमांगिनी कृष्णाला पूर्णपणे बिघडविण्याच्या मार्गास लागली आहे. तसे नसेल, तर माझे नांव बदलून ठेवीन ! "

यावर नवीनबाबूनीं कांहीच उत्तर दिलें नाही. कारण त्यांचा, स्वतःच्या पत्नीच्या कर्तबगारीवर पूर्ण विश्वास होता. ती जिवंत असतां, हेमांगिनी कृष्णाला बिघडवूं शकेल या गोष्टीवर त्यांचा विश्वासच बसेना ! परंतु, त्यांचा तसा दृढविश्वास असला, तरी कादंबिनीचा मात्र स्वतःबद्दल तसा विश्वास मुळींच नव्हता ! तिची अगदीं सोळा आणे खात्री होती कीं, आपल्या भोळेपणाचा फायदा घेऊन कोणीही तिला वाटेल तेव्हां फसवू शकेल ! म्हणून, त्या दिवसापासून ती आपल्या धाकट्या भावाच्या मानसिक उन्नतिअवनतीबद्दल अगदी डोळयांत तेल घालून जपूं लागली !

दुसऱ्या दिवशींच दोन चाकरांपैकीं एक कमी करण्यांत येऊन, त्याच्याऐवजीं कृष्णाची नेमणूक करण्यांत आली. त्या दिवसापासून तो दुकानांतील काम पाहूं लागला. मणचे मण तांदूळ उरापोटीं उचलून आणून मोजणें, विक्री करणें, बाजारांतून, व शेजारच्या खेड्यांपाड्यांत हिंडून निरनिराळया प्रकारच्या तांदुळाचे नमुने गोळा करणें, इत्यादि प्रकारचीं कामें त्याच्या वांट्यास आलीं. दोनप्रहरीं बारा वाजण्याचे सुमारास नवीनबाबू भोजनाकरितां घरीं येत, ते आपलें स्नान, भोजन व थोडीशी वामकुक्षी वगैरे संपवून मग दोनच्या सुमारास परत दुकानावर जात. तोंपर्यंत कृष्णाला अर्थातच दुकानावर बसून रहावें लागे. मालक नसतांना दुकानावर कोणी तरी मनुष्य हजर असणें आवश्यकच होतें ! नवीनबाबू जेवण आटोपून परत आले, म्हणजे घरीं जाऊन जेवण्याची कृष्णाला

मोकळीक होतीच! आतां एवढें खरें, कीं तो जेवण्याकरितां घरीं जाईतोंपर्यंत तिहीचा सुमार होत असे. परंतु किंचित् शरीरकष्ट सोसल्याखेरीज कधीं तरी कोणाची उन्नति झाली आहे का? पुढें आपल्याला चागले दिवस दिसावे, अशी जर त्याची इच्छा असेल—आणि त्याची नसली, तरी नवीनबाबूंची व कादंबिनीची तशी अत्यंत आग्रहाची इच्छा होती—तर या वयांत त्यानें थोडे कष्ट सोसण्याकरितां तयार असावयालाच पाहिजे! असो.

कृष्णा दुकानावर जाऊ लागला, त्यानंतर सरासरीं तीन चार दिवसांनंतरची गोष्ट! कृष्णा दुकानावरून परत आला, व मुकाट्यानें आंघोळ उरकून घेऊन स्वयपाकघराकडे वळला. आज नवीनबाबूची वामकुक्षी कांहींशी जास्तच लांबल्याकारणानें त्याला घरीं परत येण्याकरितां थोडा जास्तच उशीर झाला होता. तेव्हां त्याला भूक सपाटून लागली होती, यात नवल नाहीं. स्वयपाकघराकडे जाऊं लागतांच त्याला कळलें कीं ताईसाहेबाची स्वारी झोंपीं गेली आहे. प्रत्यक्ष वाघाच्या गुहेत शिरून अन्न काढून आणण्याची पाळी आली असती, तरी देखील कृष्णानें मागे पुढें पाहिलें नसते, इतका तो क्षुधेनें व्याकुळ झाला होता. पण कादबिनीची झोंपमोड करून तिला वाढण्याकरिता सांगण्याचें साहस त्याच्याकरवीं होईना!

स्वयपाकघरच्या दारांत, उबरठ्यावर एक पाय ठेऊन कृष्णा बराच वेळपर्यंत स्तब्धपणें उभा होता. आंत जावें किंवा नाहीं, याबद्दल त्याच्या अंत·करणांत 'भवति न भवति' चालली होती तो आंत गेला तरी काय उपयोग? त्याला वाढणार कोण? स्वत·च्या हातानेंच अन्न काढून घेण्याची तर त्याची प्राज्ञाच नव्हती! बरें, आत न जावे, तर पोटात भुकेनें नुसता हलकल्लोळ मांडलेला! तेव्हां कांहीं झालें तरी कादबिनीची निद्रा समाप्त होईपर्यंत वाट पाहणें भागच आहे, असा विचार करून, तो त्या दाराशेजारच्या कोंपऱ्यांत जाऊन बसला! इतक्यांत ताईची झोंप उघडेल व आपल्याला जेवावयाला मिळेल, अशी आशा त्याच्या अतःकरणांत वारंवार डोकावीत होती, पण दुसऱ्या क्षणींच बिचाऱ्याची निराशा होई! याप्रमाणें आशा-निराशेच्या चक्रांत तो फिरत आहे, इतक्यांत मागून प्रेमळ स्वरात कोणी तरी हाक मारली " कृष्णा! "

तो स्निग्ध कठस्वर कानी येताच कृष्णानें मागें वळून पाहिलें. हेमांगिनी आपल्या माडीच्या खिडकीशी उभी असून त्याच्याकडे सस्मित मुखानें पहात

होती. कृष्णानें एकदां तिच्याकडे पाहिलें, व लगेच आपली दृष्टि अवनत केली. थोड्याच वेळांत हेमांगिनी त्याच्यासमोर येऊन उभी राहिली व म्हणाली, " का रे, होतास तरी कोणीकडे तू इतके दिवस? आणखी, आज तुझें तोंड असें उतरलेलें काय म्हणून दिसते आहे? प्रकृति तर बरी आहे ना? या कोंपऱ्यांत एकटा बसून काय करतो आहेस?"

कठोरतेशीं झगडण्याचा प्रसग आला असता, मनुष्य वाटेल तेवढे असह्य प्रहारसुद्धां, मुकाट्यानें, दुःखाचा एक निःश्वासही न टाकतां सहन करू शकतो; परंतु सहानुभूतीशीं गांठ पडली, म्हणजे पूर्वी अमानुषतेलाही दाद न देणारे तेंच अतःकरण वितळून जाऊन, अश्रुरूपानें वाहू लागते! या वेळीं कृष्णाचीही तशीच अवस्था झाली होती. अगोदरच, क्षुधा-पीडित अवस्थेत नेत्रांत अश्रु उभे राहण्याकरितां फार वेळ लागत नाही, त्यांत पुन्हा हेमांगिनीच्या स्नेहार्द्र कंठस्वराची भर! त्याचे नेत्र भरून आले! त्याच्यानें उत्तर देववेना! तो तसाच खाली मान घालून बसून राहिला!

'काकी' चा कंठस्वर घरातील सर्व मुलामुलीच्या चागल्या परिचयाचा होता. तो परिचित स्वर कानी पडताक्षणीच कादंबिनीची सर्वात धाकटी कन्या धावतच बाहेर आली. हेमागिनीशेजारीच कृष्णाला पाहून तिला एकाएकीं कसलीशी आठवण झाली, व ती त्याला उद्देशून म्हणाली, "मामा, तुझें ताट स्वयपाकघरांत वाढून ठेविलें आहे. आई केव्हांच जेवून निजली देखील. तूं आलास, म्हणजे जेवण आटोपून घे, असा निरोप तुला कळविण्याकरिता आईनें मला सांगितले होतें!"

हे शब्द हेमांगिनीच्या कानीं पडतांच तिला अत्यत आश्चर्य वाटलें. तिनें स्तंभित होऊन प्रश्न केला, "काय म्हणतेस? अजूनपर्यंत कृष्णाचे जेवण व्हावयाचें आहे? आणखी तुझी आई निजली देखील? का रे कृष्णा, आज तुला एवढा उशीर कां बरें झाला?"

कृष्णा काय उत्तर देणार? तो तसाच खालीं मान घालून स्तब्ध उभा आहे असें पाहून त्याच्या भाचीनेंच उत्तर दिले. ती म्हणाली, "मामाला रोज असाच उशीर होतो, काकी! बाबा आपलें जेवणखाण आटोपून दुकानात गेले, म्हणजे मग हा घरीं येतो. तोंपर्यंत त्याला दुकानांतच रहावें लागतें! म्हणूनच त्याला रोज असा उशीर होतो!"

कृष्णाला दुकानावर काम करण्याकरितां ठेवलें आहे हें आतां हेमांगिनीला कळलें! कादंबिनी आपल्या भावाला कांहीं उद्योग करूं न देतां स्वस्थपणें घरींच बसू देईल, असे हेमांगिनीला मुळींच वाटले नव्हतें. पण त्याला इतक्या निष्ठुरतेनें वागविण्यात येईल अशी कल्पनादेखील तिच्या मनांत कधीं उत्पन्न झाली नाहीं! एवढयाशा कोंवळया वयांत जेवणाला रोजच्यारोज हा असा उशीर! क्षुधेनें कासावीस झाल्याकारणानें व्याकुल झालेल्या कृष्णाच्या त्या आर्त मुखाकडे दृष्टि जातांच हेमांगिनीचें हृदय कळवळलें! ती पदरानें स्वतःचे नेत्र पुशीत आपल्या घरीं गेली! व दोन मिनिटांचे आंतच दुधानें भरलेला एक वाडगा घेऊन परत आली. स्वयंपाकघरांत पाऊल ठेवतांच तिच्या शरीरावर थरारून रोमांच उभे राहिले!

कृष्णा जेवावयाला बसला होता! एका लहानशा पितळेच्या ताटांत थंडगार भाताच्या खरवडीचा एक डिखोळा, व त्याच्या जवळच थोडेंसे भाजीचें पाणी! दूध मिळतांच त्याचें हृदय आनंदानें भरून येऊन तो हंसूं लागला!

कृष्णाचें जेवण होत असतां हेमांगिनी स्वयपाकघराच्या बाहेर दाराशीं येऊन उभी राहिली. थोड्याच वेळांत त्याचें भोजन आटोपलें, व तो हाततोंड धुण्याकरितां बाहेर गेला. हेमांगिनीनें आंत डोकावून पाहिलें, तों ताटांत अन्नाचा एक कण देखील शिल्लक उरला नव्हता! क्षुधेच्या ज्वालेंत त्या तसल्या अन्नाचीही संपूर्ण आहुति पडली होती!

हेमांगिनीच्या नेत्रांसमोर स्वतःच्या मुलाची मूर्ति उभी राहिली. आपल्या मागें त्याचीही कदाचित् अशीच दीन अवस्था होईल अशी कल्पना तिच्या मनांत उद्भवली, व तिचें हृदय भडभडून आलें! अनावर झालेले अश्रू संवरण करण्याचा प्रयत्न करीत करीत ती आपल्या घरीं निघून गेली!

## [४]

हेमांगिनीची शरीरप्रकृति जात्याच कांहींशी नाजुक होती. अगदीं क्षुल्लक कारणामुळें देखील ती एखादे वेळीं आजारी पडत असे. हिंवाळयांत तर तिला हटकून ताप आल्याखेरीज रहात नसे. वर उल्लेख केलेल्या घटनेला बरेच दिवस लोटले असतील. आज तिची प्रकृति सकाळपासूनच कांहींशी अस्वस्थ होती, व दोन प्रहरच्या सुमारास तिला थंडी वाजून ताप देखील आला; म्हणून ती

आज अंथरुणावरच पडून होती. सूर्यास्ताची वेळ जवळ येत चालली होती. खोलींत दुसरें कोणीही नव्हतें. अशा वेळीं, दाराच्या आडून कोणी तरी डोकावून पहात आहे, असा तिला भास झाला. त्याबरोबर ती म्हणाली, "कोण आहे रे बाहेर, ललित?"

पण बाहेरून कोणीच उत्तर देईना!

स्वर किंचित् जास्त उच्च करून हेमांगिनीने पुन्हा प्रश्न विचारला, "कोण आहे ते? बोलत कां नाहीं?"

दाराच्या मागून हळूच उत्तर आलें, "मी."

"'मी' कोण? आत ये पाहूं असा!"

हळू हळू पाउलें टाकीत कृष्णा खोलींत आला, व दाराशेजारींच भिंतीशीं पाठ टेंकून उभा राहिला. त्याला पाहतांच हेमांगिनी अंथरुणावर उठून बसली, व त्याला स्नेहपूर्वक आपल्याजवळ येण्याकरितां खूण करून म्हणाली, "का रे बाळ? कोणीकडे आलास?"

कृष्णाला कांहीसें जास्त धैर्य चढून तो दोन पाउलें पुढे सरसावला. हेमांगिनीच्या अंथरुणापाशीं येताच त्यानें आपल्या मळलेल्या सदऱ्याच्या खिशात हात घातला, व आंतून दोन जांब बाहेर काढले. जांब तिच्यासमोर धरून तो स्मितमुखानें म्हणाला, "हे घ्या."

हेमांगिनीनें उत्सुक भावानें आपला हात पुढें केला, व म्हणाली, "तुला रे कोणी सांगितलें, मला जांब पाहिजेत असें? कालपासून मी प्रत्येकाच्या मागें लागलें आहें, मला जांब आणून द्या म्हणून, पण एकानें देखील माझ्या विनवणीकडे लक्ष दिलें नाहीं." असें बोलताबोलतांच तिनें जांबांसहित कृष्णाचा हात आपल्या हातांत धरला, व प्रेमपूर्वक त्याला आपल्या शेजारीं बसविलें. आनंदानें व कांहींशा लज्जेनें कृष्णाचें मुख आरक्त झालें! हेमांगिनीला ज्यामुळे आनंद वाटेल असें कृत्य आपल्या हातून घडलें, याबद्दल त्याला अभिमानही वाटल्याखेरीज राहिला नाहीं. वास्तविक पाहतां हे दिवस जांबांचे नव्हते. जांब खाण्याकरितां मिळावे अशी जरी हेमांगिनीची इच्छा असली, तरी ती जांबाकरितां अगदीं व्याकुळ झाली होती, असेंही नव्हतें! तरी देखील, तिची ती क्षुल्लक इच्छा पूर्ण करण्याकरितां, किती तरी त्रास सहन करून, सबंध दुपारचें कडकडीत ऊन सहन करून कृष्णानें कसे तरी हे दोन जांब मिळवून आणले होते. आपल्या सर्व श्रमांचें

सार्थक झालें असे पाहून त्याला आनद व अभिमान वाटणें अगदीं साहजिकच होते! हेमांगिनीनें पृच्छा केली, "कां रे कृष्णा, मला ताप आला आहे, हें तुला कसे बरें कळलें?"

परंतु कृष्णानें कांहीं उत्तर दिलें नाहीं!

"मला जांब पाहिजेत, हें तरी तुला कसें कळलें?"

पण या प्रश्नाला देखील कृष्णाकडून कांहींच उत्तर येईना. त्यानें जी एकदां मान खालीं घातली, ती पुन्हा वर उचलली नाहीं.

पोरगा स्वभावतःच फार भित्रा व लाजाळू आहे, हें हेमांगिनीला पूर्वींच कळून आलें होतें. कादबिनीकडून त्याला ज्या प्रकारें वागविण्यांत येत होतें, त्यामुळें तर त्याच्या मूळच्या भित्रेपणात जास्तच भर पडत होती. परंतु मुलांना वश करून घेऊन, त्याना मोकळया अतःकरणानें बोलावयाला लावण्याची युक्ति हेमा-गिनीला चांगली अवगत होती. तिच्या सान्निध्यात संकोच फार वेळपर्यंत टिकून राहणे शक्यच नव्हते. मोठ्या प्रेमळतेनें त्याच्या पाठीवरून हात फिरवीत तिनें हळू हळू एक एक प्रश्न विचारावयाला सुरवात केली. थोड्याच अवकाशांत जांब कसे आणले ह्या गोष्टीपासून, तो तहत अगदीं त्याच्या गांवची हकीगत, त्याच्या मृत मातेसंबंधीं माहिती, कादंबिनीचें त्याच्याशीं असलेलें वर्तन, दुकानावर त्याला करावीं लागणारीं कामें, वगैरे सर्व गोष्टींबद्दलची सपूर्ण माहिती तिनें त्याच्याजवळून मोठ्या कुशलतेनें विचारून घेतली! त्याची सर्व हकीगत अवगत करून घेतल्यानंतर हेमागिनीने एक निःश्वास टाकला, व नेत्रात उभे राहिलेले अश्रू पदरानें पुसून ती म्हणाली, "मीदेखील तुझी ताईच आहे, बरें का बाळ! माझ्यापासून अगदीं काही देखील लपवून ठेवीत जाऊं नकोस—अगदीं मोकळे-पणानें वागत जा! ज्या ज्या प्रसगीं तुला कोणत्याही वस्तूची आवश्यकता भासेल, त्या त्या प्रसंगीं तूं अगदीं खुशाल माझ्याजवळ येत जा. मी तुला कशाचीही उणीव भासू देणार नाहीं! समजलास ना? यापुढें मी सांगते तसा वागशील ना तूं माझ्याशीं?"

आल्हादयुक्त अतःकरणानें कृष्णा म्हणाला, "हो."

खरें निर्हेतुक प्रेम कसें असतें, त्याची ओळख कृष्णाला आपल्या मातेच्या सह-वासांत असतांना पटली होती. ती मरण पावल्यापासून आतांपर्यंत, तशा प्रेमाला तर तो पारखा झाला होताच. परंतु त्याऐवजीं, शक्तीपलीकडे काबाडकष्ट व वर

कुशब्दांचा रतीब त्याच्या नशिबीं आला होता. आज त्याच पवित्र प्रेमाची मंगल प्रतिमा हेमांगिनीच्या ठायीं त्याला दिसताच, त्याचें हृदय उचंबळून आलें. शुष्क जीवनातील वैराण वाळवंटांत या प्रेमळ मूर्तीच्या आश्वासनपर शब्दांमुळें त्याच्या बावरलेल्या चित्ताला पराकाष्ठेचा धीर आला! प्रेमाच्या अभावामुळें हृदयांत रुद्ध झालेला त्याचा मातृशोक आज एकाएकीं नाहींसा झाला! जगांत आपण अगदींच निराधार नाहीं, आपल्यासाठीं कळवळणारें, आपला दुःखभार हलका करण्याचा मनापासून प्रयत्न करणारें एक तरी अतःकरण—अगदीं आपल्या मृत मातेच्या हृदयात वसत असलेल्या प्रेमानेंच भरलेलें अतःकरण—आपल्याला आश्रय देत आहे, या जाणिवेनें त्याच्या हृदयावरील सर्व भार नाहींसा झाला! हेमांगिनीच्या चरणांवर मस्तक ठेवून, मुखावाटे एक शब्दही न काढतां स्वप्न पहात असल्याप्रमाणें, तो हळू हळू खोलीबाहेर चालता झाला!

परंतु इकडे कादंबिनीचा त्याच्यावरील क्रोध दिवसेंदिवस वाढत्या प्रमाणांतच होता. कारण तो तिच्या सावत्रआईचा मुलगा! त्यानें कादंबिनीच्या सख्ख्या मातेच्या उदरीं जन्म घेतला नाहीं, हा जणूं काय त्याचाच अपराध आहे, असेंच कादंबिनीला वाटत होतें. कोणीकडून हें पाप आपल्या नशिबीं आलें, असें तिला वाटत होतें! आवश्यक वाटत असले, तरी लोकलज्जेच्या भयामुळें, त्याला घराबाहेर हांकून लावणेंही शक्य नव्हतें! तेव्हां तो जर तिच्या घरीं राहणें अपरिहार्यच होतें, तर मग त्याच्या देहांत सामर्थ्य असे तोंपर्यंत त्याच्या करवीं वाटेल तसे काबाडकष्ट तरी कां करवून घेऊ नयेत, असा विचार करून, रोजच्या रोज नवीन उपाय शोधून काढून, ती शक्य तोंपर्यंत त्याला त्रास देण्याचा प्रयत्न करीत असे!

हेमागिनीकडून घरीं परत येतांच कादंबिनीनें त्याला आपल्यासमोर उभें केलें, व डोळे वटारून भीषण स्वरांत प्रश्न विचारला, "आज सबंध दिवस दुकानातून पळ काढून कोणीकडे गेला होतास रे कृष्णा?"

कृष्णानें कांही उत्तर दिलें नाहीं. त्यामुळें जास्तच चवताळून जाऊन कादंबिनी ओरडली, "कां रे मेल्या, बोलत कां नाहींस? वाचा कशानें बंद झाली अशी?"

तरी देखील कृष्णा एक नाहीं, दोन नाहीं! प्रतिपक्षानें मौन स्वीकारल्यानंतर क्रोधाची मात्रा कमी होते, असा साधारण नियम आहे. परंतु कादंबिनीचें सर्वच

कांहीं असाधारण! कृष्णानें मौन स्वीकारल्यामुळें तिचा राग जास्तजास्तच वाढूं लागला! तिनें पुष्कळ प्रयत्न केला, परंतु त्याच्या मुखांतून शब्द निघण्याचें चिन्ह दिसेना! कृष्णाच्या मौनांत व कादंबिनीच्या क्रोधांत जणूं काय चढाओढ सुरू झाली होती! शेवटीं, कृष्णानें न बोलण्याचा निर्धारच केला आहे असें पाहून तिनें गोपाळला हांक मारली, व त्याला कृष्णाचा कान धरण्याकरितां आज्ञा केली! गोपाळ इतर बाबतींत कसाही असला, तरी असा प्रसंग उपस्थित झाला, म्हणजे तो कमालीचा आज्ञाधारक बनत असे. त्यानें कृष्णाचे दोन्ही कान पुन्हा पुन्हा जोरानें पिरगाळून आईच्या हुकमाची तत्परतेनें अमलबजावणी केली! आजपर्यंत कृष्णाला वाटेल तसे कटु वाक्प्रहार सहन करावे लागले होते, परंतु त्याच्या शरीराला स्पर्श करण्यापर्यंत कधींच पाळी आली नव्हती! आज त्याला शरीरदंडही भोगावा लागला! आणखी पुन्हा, ही शिक्षा पुरेशी झाली नाहीं म्हणूनच कीं काय—" सध्याकाळीं जेवावयाला मिळणार नाहीं!"

आघात वाटेल तेवढा दारुण असला, तरी जोंपर्यंत आघाताला प्रतिघात होत नाहीं, तोंपर्यंत त्या आघाताचा कांहींच परिणाम होत नाहीं. एखादा मनुष्य अत्यंत उच्च शिखरावरून जरी खालीं कोसळला, तरी जोंपर्यंत तो पृथ्वीतलावर आदळत नाहीं, तोपर्यंत त्याचे हातपाय तुटत नाहींत, किंवा इतर कोणत्याही प्रकारची इजा होत नाहीं! तो खालीं आल्यानंतर, कठिण भूमि जेव्हां त्याच्या वेगाचा प्रतिकार करते, तेव्हांच त्याच्या शरिराला दुस्सह वेदना होतात! खरें दुःख आघातांत नसून प्रत्याघातात असतें!

कृष्णाच्या बाबतींत अशीच स्थिति झाली होती. मातेच्या मृत्यूमुळें, त्याच्या पायाखालीं असणारा आधार एकाएकीं कोठें तरी नाहींसा झाला, व तो अत्यंत उंच पर्वतशिखरावरून खालीं कोसळला! त्या वेळेपासून आतांपर्यंत त्याला कोणत्याही प्रकारच्या आघाताचें दुःख जाणवूं शकत नव्हते. तो एका दीनदुबळया, दुःखी-कष्टी, गरीब आईचा मुलगा होता! तरी देखील ती जिवंत असेपर्यंत, दुःखाशीं त्याची प्रत्यक्ष ओळख झाली नव्हती! लांछना, गंजना, कुशब्दप्रहार, मारहाण वगैरे गोष्टींशीं त्याचा परिचय झाला नव्हता! अशी स्थिति असूनही, मातेच्या मरणानंतर कादंबिनीकडून प्रत्येक बाबतींत होणारा छळ तो मुकाट्यानें सहन करीत असे—जवळ जवळ त्याला त्याचें कांहींच वाटत नव्हतें! याचें कारण हेंच कीं, जगांत तो अगदींच असहाय–निराधार होता! प्रसंग आला, म्हणजे

आपली करुणापूर्ण दृष्टि वर उचलून आशेनें पाहण्याकरितां, उभ्या जगांत त्याला एकदेखील व्यक्ति नव्हती—त्याच्या पायाखालीं आधार नव्हता !

परंतु आज मात्र त्याची ती निःसहाय अवस्था नाहींशी झाली होती ! आज तो जगांत एकटाच नव्हता ! आज त्याला हेमांगिनीच्या मातृस्नेहाचा आधार मिळाला होता ! याच कारणामुळें, आजचा अपमान त्याला असह्य झाला. कादंबिनीनें व गोपाळनें आज त्याला वाटेल तशा शिव्या दिल्या, मारहाण केली, नानाप्रकारें त्याचा अपमान केला, व स्वतः चालते झाले. पण हा निरपराधी निराश्रय पोर अंधारांत, त्याच खोलींत तसाच पडून राहिला ! त्याच्या नेत्रांवाटे अविरत अश्रुप्रवाह वाहूं लागला ! मृत मातेची मूर्ति आज त्याच्या मनश्चक्षूं पुढें उभी राहिली ! त्या स्नेहाच्या मूर्तीसमोर, कादंबिनीच्या असह्य अत्याचारांमुळें कृष्णा हेमांगिनीची आठवण काढून हुदके देऊन रडूं लागला !

[ ५ ]

दुसरे दिवशीं प्रातःकाळी कृष्णानें आपले प्रातर्विधि आटोपले, व दुकानांत जाण्याच्या ऐवजीं, त्यानें हेमांगिनीच्या घरची वाट धरली. अजूनपर्यंत हेमांगिनी अंथरुणावरच डोळे मिटून पडून होती. कृष्णा खोलींत आला, व हळूच तिच्या पायथ्याशी जाऊन बसला. त्याची चाहूल लागताच हेमांगिनीनें नेत्र उघडले—पाहते तो कृष्णा ! तो असा अनपेक्षितपणे आलेला पाहून तिला थोडेसें आश्चर्य वाटलें, व ती म्हणाली, " का रे कृष्णा, आज तू दुकानात नाहीं गेलास तो ? "

कृष्णा म्हणाला, " हो. जातोच थोड्या वेळानतर. "

हेमांगिनी म्हणाली, " जा बाबा, लवकर जा. तुझी रोजची वेळ होत आली. उशीर झाला म्हणजे आणखी शिव्या मिळायच्या तुला ! जा बाळ, उशीर करूं नकोस ! "

" जातों. " असें म्हणून कृष्णा पलंगावरून खालीं उतरला. त्याच्या मनांतून हेमांगिनीला कांहीं तरी सागावें असें होते, पण शब्द मात्र बाहेर निघेना. त्याचें मुख एकदां आरक्त होऊन लगेच त्यानें खालीं मान घातली व उभा राहिला.

त्याच्या मनाची स्थिति ध्यानांत येऊन हेमांगिनीनें प्रश्न केला, " कां रे बाळ, कांहीं सांगायचें का आहे मला ? "

जमिनीवर दृष्टि स्थिर करून कृष्णा अगदीं हलक्या स्वरांत म्हणाला, "—काल-पासून कांहीं खाल्लें नाहीं— ! "

" कालपासून कांहीं खाल्लें नाहीं ? काय, म्हणतोस काय तूं कृष्णा ? " कांहीं वेळपर्यंत हेमांगिनी त्याच्या मुखाकडे पहात राहिली. तिचे नेत्र भरून आले. हळू हळू ते अश्रू खालीं पडू लागून तिचा पदरही थोडासा ओला झाला. तिनें त्याला आपल्या शेजारी बसवून घेतलें, व सर्व हकीगत विचारली. कालचा एकंदर सर्व प्रकार ऐकून घेतल्यानतर ती म्हणाली, " मग काल रात्रींच का बरें आला नाहींस तूं माझ्याकडे ? "

कृष्णानें काहीं उत्तर दिले नाही ! हेमागिनीनें आपले नेत्र कोरडे केले, व त्याच्याकडे वळून म्हणाली, " तुला माझी शपथ आहे, या दिवसापासून तू मला आपल्या आईच्या ठिकाणींच मानीत जा ! तुझी आई मरण पावली नसून, ती माझ्या स्वरूपांत जिवंत आहे, असेंच तूं समज ! "

यथाकाळी या सर्व गोष्टी कादबिनीच्या कानीं गेल्या ! अर्थातच तिच्या अगाचा भडका उडाला असल्यास नवल काय ? ती आपल्या घराच्या आंगणातून हेमांगिनीला हांक मारून उच्च स्वरात म्हणाली, " काय ग, माझ्या भावाला खाऊ घालण्याची माझ्या अगांत शक्ति नाहीं की काय ? त्याला मी आश्रय दिला तो काही दुसऱ्याच्या भरवशावर विसबून राहून दिला नाही ! आपल्या श्रीमंतीचा डौल आम्हाला दाखविण्याचें कारण काय ? एकाएकीं, त्याच्याबद्दल प्रेमाचा असा उमाळा आलाच कसा, याचेंच मला नवल वाटत होतें ! काय पण अगदी गळयात गळे घालून गुजगोष्टी चालल्या होत्या ! तुला आमच्या पंचाइतीत पडण्याचे कारणच काय आहे मुळी ? "

कादंबिनीच्या बोलण्याचा प्रकार पाहून हेमांगिनीच्या अगाचा संताप झाला. परंतु तिने आपला राग आंवरला, व शातपणानें ती म्हणाली, " आम्ही गळयात गळे घालून गोष्टी बोलत बसलो, तरी त्यांत बिघडले कुठें ? "

कादबिनी म्हणाली, " बिघडलें कुठें तें सांगूं का समजावून ? तुझ्याविरुद्ध तुझ्या मुलाला जर मी अशी फूस देऊं लागलें तर त्यात तुझा मान राहील का ? तूंच जर त्याला अशी शिरजोर करून ठेऊं लागलीस, तर मी त्याला शिक्षा करून तरी काय उपयोग ? त्याच्यांत सुधारणा घडणार तरी कशी ? "

करूनसवरून पुन्हा सज्जनपणाचें पांघरूण अंगावर घेणाऱ्या कादंबिनीचें हें भाषण हेमांगिनीला आतां अगदीं असह्य झालें. ती लगेच सडेतोडपणानें म्हणाली, "जाऊबाई, पंधरा सोळा वर्षांच्या वर मीं तुमच्याबरोबर एका घरांत राहून संसार केला

आहे. तुम्ही मला असल्या गोष्टी शिकवूं नका. मी तुमचा स्वभाव चांगला ओळखतें! उपाशीपोटीं राहण्याची शिक्षा अगोदर आपल्या पोटच्या पोराला करा, आणि मग दुसऱ्याच्या मुलाला शिक्षा करण्याचें नाव काढा! तसें केलें, म्हणजे मग नाहीं मी येणार गळ्यात गळा घालून गोष्टी सागायला."

असे शब्द हेमांगिनी उच्चारूं शकेल ही कल्पनादेखील कादबिनीच्या अतःकरणाला कधीं शिवली नव्हती. ती आश्चर्यानें स्तमित होऊन काही वेळपर्यंत हेमागिनीच्या मुखाकडे स्थिर दृष्टीनें पहातच राहिली. नतर ती म्हणाली, "काय म्हणालीस तूं? माझ्या गोपाळबरोबर त्या कारट्याची तुलना? रामाची आणि माकडाची बरोबरी? यापुढें आणखी आता तू काय बोलायचे ठेवले आहेस बाई?"

आज हेमागिनीनें "जाऊबाईचा" पूर्णपणेच समाचार घ्यायचे ठरविलें असावें. वरील वाक्य ऐकतांच ती लगेच म्हणाली, "राम कोण आणि माकड कोण, तें मला चागले ठाऊक आहे! पण आता तुमच्याबरोबर जास्त वाद घालण्याची माझी इच्छा नाहीं! तुम्हाला फक्त एकच गोष्ट सागावीशी वाटते, ती हीच की, तुमच्याप्रमाणें निष्ठुर अमानुष स्त्री साऱ्या जगांत आढळणे शक्य नाही!" इतके बोलून तिने धाडकन् आपल्याकडचे दार लावून घेतले!

त्याच दिवशी सायकाळची गोष्ट! दिवसभर पोटापाण्याचा उद्योग केल्यानतर, नवीनबाबूची, व त्याचप्रमाणे हेमांगिनीच्या पतीचीही घरीं परतण्याची वेळ होत आली असे पाहून, कादबिनीनें मोलकरिणीशी बोलण्याचे मिष करून उच्च स्वरात आपल्या भाषणास सुरवात केली, "काही हरकत नाहीं म्हणाव! देव काही झोपीं गेलेला नाहीं. खरे खोटे सर्व कांहीं तो पाहातो आहे! ह! काय म्हणे, आईपेक्षा मावशीलाच पोराबद्दल जास्त कळवळा! मोठी आली गोष्टी सागणार! माझ्या भावाचें मर्म मला कळत नाही; आणि ते कळतें या वाटेवरच्या चोरांना! खासा न्याय! भावाबहिणींमध्यें कलह उत्पन्न करून देऊन स्वतः लाबून गमत पाहणे, हें देवाधर्माला कधींही रुचणार नाहीं म्हणावें!—चागले जाणून असा मेल्यांनो. देव तुम्हाला पाहील!" इत्यादि, इत्यादि.

अशा प्रकारची बडबड करीत कादंबिनी स्वयंपाकघरात जाऊन बसली. उभयतां जावांमध्ये असे कलह होत नसत असें नाहीं. परंतु आजचा प्रकार कांहींसा जास्त प्रमाणावर होता. पुष्कळ वेळा, असा प्रसग आला म्हणजे

हेमांगिनी मुद्दाम त्याकडे दुर्लक्ष करी. शक्य तोंपर्यंत तटेभांडणें करूं नयेत अशीच तिची प्रवृत्ति होती. परंतु आज तिची प्रकृति अगोदरच काहीशी अस्वस्थ असल्याकारणानें तिला आपला क्रोध आवरतां आला नाहीं. ती तशीच उठली, व आपल्या खिडकीशीं उभी राहून कादंबिनीला म्हणाली, " का ? इतक्यातच कां थांबविलें बाई ? चालू द्या ना ! इतक्यातच परमेश्वराच्या कानापर्यंत तुमची फिर्याद जाऊन पोंचली नसेल ! म्हणून म्हणतें—शिव्याशापांची लाखोली एवढयावरच थांबवू नका ! अजूनपावेतो भाऊजी घरीं आले नसतील, त्यांना येऊं द्या. म्हणजे त्यांच्याही कानीं सर्व गोष्टी जातील—इकडच्याही कानी जातील ! इतक्यातच सपवून कसें चालेल ? "

हे शब्द कानीं पडताच कादंबिनी जास्तच संतापली. रागानें फणफणत ती तशीच बाहेर आली, व हेमांगिनीकडे आपली क्रोधपूर्ण दृष्टि रोखून ती ओरडली, " तू का आलीस माझ्याशी बोलायला ? मी काहीं कोणा मेल्याचे नांव घेऊन बोलत नव्हते ! "

हेमागिनीने स्थिरभावानें उत्तर दिलें, " त्यांत कोणाचे नांव घेऊनच बोलायला कशाला हवे ? असें उघड उघड नांव घेऊन शिव्या देण्यात तुमची बुद्धि तरी काय राहिली ? तेवढें शहाणपण तुमच्या अगीं भरपूर आहे ! बाकी तुमच्याखेरीज करून, जगात सर्व मूर्खच भरले आहेत अशी का तुमची समजूत आहे ? तुम्ही कोणाला उद्देशून बोलत आहां, हेदेखील कोणाला समजत नाहीं वाटते ! "

आतां मात्र कादबिनीने आपलें खरें स्वरूप प्रकट केलें. नेत्र आरक्त करून, विलक्षण हातवारे करीत ती अत्यत कर्णकर्कश स्वरांत ओरडली, " समजलें म्हणून काय झाले ? ज्याचा अपराध असेल, त्यालाच बोलणें लागेल ! आणखी तुला काय वाटते तूच तेवढी शहाणी आहेस असें ? करूनसवरून वर मलाच दटावणीच्या गोष्टी सांगतेस ? कृष्णा येथें आला, तेव्हां कसा गाईसारखा गरीब होता अगदीं ! वाटेल तें झालें, तरी कधीं तोंडांतून ' ब्र ' देखील काढीत नसे ! जसें सांगावें, त्याप्रमाणेच वागायचा !—पण तेंच आतां पहा ! तूं त्याला फूस देऊं लागलीस त्याचा परिणाम पहा, तो कसा झाला तो ! आज दुपारीं तो कोणाच्या जोरावर किती उर्मटपणाचें उत्तर देऊन चालता झाला, तें हवें तर हिलाच विचार ! " असें म्हणून, तिनें आपल्या शेजारींच उभ्या असलेल्या मोलकरणीकडे बोट दाखविलें !

मोलकरीण म्हणाली, "हो, हो. बाईसाहेब सांगताहेत, तें मुळीच खोटें नाहीं. आज सकाळचीच गोष्ट. जेवतांना त्यांच्या पानांत शेवटी थोडासा भात उरला, तो तसाच टाकून देऊन ते उठून जाऊ लागले. बाईनीं त्यांना तो भात खाऊन मग उठण्याकरिता आग्रह केला व म्हणाल्या, " मेल्या, असा माजलास काय म्हणून ! हे पिंड न मिळताच तुला यमाच्या घरीं जावें लागणार आहे. " झाले बाई, यांच्या तोंडावाटे एवढे शब्द निघण्याचाच काय तो अवकाश. त्यानीं एकदम उत्तर दिलें कीं, ' हेमांगिनी ताई असतांना मला कोणाचीही पर्वा बाळगण्याचें कारण नाही, ' असें म्हणून ते चालते झाले ! "

हेमांगिनीकडे एकवार सदर्प दृष्टिनिक्षेप करून कादंबिनी म्हणाली, " मी विनाकारण त्रागा करीत नाहीं, हे आता पटले ना तुला ? सांग पाहूं त्याच्या अंगीं एवढा शिरजोरपणा कसा आला तो ? पोरगा वाईट वळणावर जात आहे, याबद्दल दुसरा कोणता पुरावा पाहिजे ? आज मी तुला अगदीं शेवटचें स्पष्टपणें सांगून टाकतें. यापुढें आम्हा बहीण भावांमध्ये ढवळाढवळ करण्याचें तुला कांहीं एक कारण नाहीं ! "

यावर हेमांगिनीनें कांहीं उत्तर दिले नाही. कृष्णानें कादंबिनीला असें उत्तर दिलें, हे ऐकून तिला आश्चर्य वाटलें. तो उद्धट किंवा उच्छृंखल वृत्तीचा नाही, याबद्दल हेमांगिनीची पूर्ण खात्री होती. मग त्यानें वडील बहिणीला असे उत्तर कसें दिले, हे गूढ तिला उलगडेना ! काही वेळपर्यंत विचार केल्यानंतर तिला वाटलें कीं, कृष्णाला होणारा जाच आपली मर्यादा ओलांडून असह्य झाल्यामुळें, कदाचित् क्रोधाच्या आवेशांत त्याच्या मुखावाटे असे शब्द निघून गेले असल्यास नवल नाहीं ! अगदी प्रत्यक्ष पायांखालीं तुडविल्यानंतर सर्पानें उलट दंश केला, तर त्यांत आश्चर्य कशाचें ? हेमांगिनीने दार लावलें, व येऊन आपल्या पलंगावर पडून राहिली !

हेमांगिनीची प्रकृति अगोदरच क्षीण झाली होती. त्यांत, कादंबिनीशीं झालेल्या भांडणांत तिच्या मनोवृत्तींना थोडा ताण पडला, व त्यामुळें तिचे डोकें दुखूं लागलें. लवकरच ताप येणार अशीं चिन्हेंही दिसूं लागलीं. अशा अवस्थेंत ती आपल्या अंथरुणावर पडली असतांना तिचा पति आंत आला, व तिच्या स्थितीकडे लक्ष न देतां क्रुद्ध स्वरांत म्हणाला, " वहिनीच्या भावाबद्दल आज पुन्हा काय घोंटाळा माजविला आहेस हा ? जेव्हां पहावे, तेव्हां तुझें आपलें कांहीं तरी

आहेच ! एखादा गरीब, दीनदुबळा दिसला, कीं लगेच धांवली त्याला सहाय्य करण्याकरितां ! जशी कांहीं परमेश्वराचाच अवतार ! हजारदा सांगितलें असेल, पण कोणी नको म्हटलें तरी ऐकायचेच नाहीं ! यापुढें माझ्याच्यानें रोज रोज हा असला गोंधळ कांहीं सहन करवत नाहीं ! आज त्याबद्दलच वहिनी मला विनाकारण किती तरी बोलल्या ! ”

पतीकडे वळून श्रान्त स्वरांत हेमांगिनी म्हणाली, “ बाई सकारण बोलतात तरी केव्हा, म्हणून तुम्हाला आजच त्याच्या ‘ विनाकारण ’ बोलण्याबद्दल एवढे वाईट वाटावें ? ”

विपिन म्हणाला, “ पण आज त्या उगाच कांहीं तरी बोलल्या नाहीत ! त्यांच्याऐवजी दुसरे कोणी असते, तर त्यालादेखील त्याच्याप्रमाणे राग येणें अगदी साहजिक होते ! तुझा स्वभाव माझ्या ओळखीचा नाहीं की काय ? मागे, त्या राखालदासाच्या बाबतीतदेखील तुझा हा स्वभावच आडवा आला. इतक्या मोठ्या थोरला बगीचा अगदीं घरात आला होता, पण तुझ्याकरिता तो हातचा घालवावा लागला ! इतकेच नव्हे, तर पोलिसांचें तोंड बंद करण्याकरिता, आणखी वर शेदीडशे पदरचे खर्च करावे लागले ! स्वत चे हितदेखील तुला कळूं नये म्हणजे काय ? ‘ स्त्रीबुद्धि प्रलयकरी ’ असें म्हणतात तें काही खोटें नाही ! केव्हा तुझा स्वभाव सुधारेल ते देव जाणे ? ”

हें ऐकून हेमागिनी उठून बसली, व पतीकडे दृष्टिनिक्षेप करून काहीशा क्रुद्ध-स्वरांत म्हणाली, “ माझा स्वभाव सुधारेल माझ्या मरणानतर; त्यापूर्वी सुधारण्याची आशा नको ! मी आई आहें–माझ्या ओटीत देवाने चार मुलंबाळे निरवली आहेत ! आणि वर परमेश्वर आहे ! मला—! पण जाऊ द्या ? वडील माणसा-विरुद्ध मी तुमच्याजवळ फिर्याद करणार नाहीं ! माझी प्रकृति बरी नाही.— आणखी मला बोलू नका—! ” असें म्हणून तिने डोक्यावरून पांघरूण ओढून घेतले !

विपिनबाबूला देखील जास्त तर्कवितर्क करण्याचें साहस झाले नाहीं ! परतु आंतल्याआंत त्याला हेमागिनीचा—विशेषतः या सर्व प्रकाराच्या मुळाशी असणाऱ्या त्या अभागी कारव्याचा फार सताप आला ! तो हळू हळू बाहेर चालता झाला !

[ ६ ]

दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं हेमांगिनीनें खिडकी उघडताच, पलीकडच्या घरांतून निघणाऱ्या कादंबिनीच्या तीक्ष्ण कंठस्वराचा तीव्र झंकार तिच्या कर्णपथावर येऊन आदळला! ती आपल्या पतीला सांगत होती, "कारटा कालपासून नाहींसा झाला आहे, त्याचा अजूनपावेतों पत्ता नाहीं! तो जिवंत आहे किंवा नाही, याबद्दल एकदां चौकशी तरी करावयाची होती!"

यानतर नवीनबाबूचा स्वर ऐकू आला. ते म्हणाले, "चुलींत जाऊं दे त्याला! बरें झालें, अनायासेच पीडा नाहीशी झाली! त्याचा शोध लावून तरी काय करावयाचे आहे?"

यावर, सर्व शेजाऱ्यापाजाऱ्यांना सहज ऐकूं जाईल अशा स्वरांत कादंबिनी म्हणाली, "तसें झाले, म्हणजे मग गावात तोडदेखील काढू देणार नाहीत लोक! येथे राहणे देखील अशक्य होईल! गावांत आपले शत्रु थोडे का आहेत? आपले म्हणविणारेच जर गळयावरून सुरी फिरवावयाला कमी करीत नाहीत, तर मग इतर तरी का मागें पुढें पाहतील? कारटा स्वत:च घरांतून पळून गेला असला, तरी, तो आपल्या जाचामुळेंच पळाला असावा, असेंच लोक बोलतील. आणि त्यात जर का त्यानें कुठे जीवबीव दिला असला, तर मग सर्वांच्या हातात शृंखला पडून तुरुंगाची वाट धरावी लागेल ते निराळेच! म्हणून म्हणते......!"

कादबिनीचें पुढील भाषण ऐकण्याची हेमांगिनीला आवश्यकता भासली नाही! तिनें खिडकी बद केली, व एक जड निःश्वास सोडून दुसरीकडे चालती झाली!

दोनप्रहरच्या सुमारास ती स्वयपाकगृहात स्वत:चें जेवण उरकीत होती. इतक्यात हळूहळू चोराप्रमाणें मद पावलें टाकीत टाकीत कृष्णा तिच्यासमोर येऊन उपस्थित झाला! त्याचे केंस इतस्ततः विखरले असून मुख अगदीं शुष्क दिसत होते. त्याच्या त्या मलिन स्वरूपाकडे एकवार दृष्टिनिक्षेप करून हेमांगिनीनें त्याला प्रश्न केला, "का रे, कालपासून तूं कोठें पळून गेला होतास?"

कृष्णा आश्चर्यव्यंजक स्वरांत म्हणाला, "कोण? मी? केव्हां, कुठे पळून गेलो होतों?"

हेमांगिनी म्हणाली, "मग कालपासून होतास तरी कुठें? घरीं आला नाहींस तो?"

कृष्णा म्हणाला, "काल संध्याकाळीं दुकानांत बसलो होतो. बराच वेळ झाला तरी दुकान बंद झालें नाहीं; इतक्यात मला तेथेंच झोंप लागली. बऱ्याच वेळानंतर जेव्हां झोंप उघडली, तेव्हां मध्यरात्र उलटून गेली होती, आणखी नवीनबाबू दुकानाला बाहेरून कुलूप लावून घरीं निघून आले होते. मी आंत झोंपीं गेलो आहें, हें त्यांच्या ध्यानांतच आले नाही! आज सकाळीं त्यांनी दुकान उघडल्यानंतर माझी सुटका झाली! सकाळपासून आतापर्यंत मी दुकानावरच काम करीत होतो!—पण ताई, मला फार भूक लागली आहे!"

"तूं आपल्या घरीं जाऊन जेव जा बाबा!" असें रुक्ष स्वरांत बोलत हेमांगिनीनें आपली दृष्टि खाली ताटाकडे वळविली! तिचा स्वर जरी रुक्ष असला, तरी नेत्र आर्द्र झाले होते; व तें कृष्णाच्या लक्षांत येऊं नये या उद्देशानेंच तिनें आपली मान खाली वळविली होती!

तिचें हे उत्तर ऐकून कृष्णा सरासरीं दीड मिनिटपर्यंत निस्तब्धपणें उभा राहिला; नंतर हळू हळू तिच्याकडे पाठ वळवून तो जड गतीनें परत जाऊं लागला! त्याबरोबर हेमांगिनीनें पुन्हां त्याला हांक मारली, व त्याला स्वतःच्या जवळच त्याचें ताट वाढून आणण्याकरिता स्वयपाकिणीला आज्ञा केली!

कृष्णाचे सरासरीं अर्धें अधिक जेवण आटोपले असेल इतक्यांत उमा बाहेरून व्यस्त भावानें धावत धांवत आत आली, व आईला खुणेनें कळविलें—"बाबा येत आहेत!"

ही बातमी आज इतक्या व्यस्त भावानें सांगण्याचें काय कारण असावें तें हेमागिनीच्या ध्यानांत येईना! तिनें आश्चर्यदर्शक स्वरांत तिला विचारलें, "बरे मग? तुला त्यात एवढें घाबरण्याचें काय कारण?"

उमा कृष्णाच्या पाठीशी उभी होती. आईच्या प्रश्नाचें उत्तर म्हणून तिनें त्याच्याकडे बोट दाखविलें, व पुन्हा पूर्वीप्रमाणेंच खुणेनेंच कळविले—"कृष्णा जेवतो आहे ना!"

साहजिकपणेंच कुतूहलप्रेरित होऊन कृष्णानें उमेकडे मुख वळविलें होतें! तिची ती उत्कंठित दृष्टि, शंकित भावानें केलेल्या खुणा वगैरे सर्व त्याच्या दृष्टीस पडलें! उच्च स्वरात न बोलण्याचा उमेचा उद्देश विफल होऊन, तिच्या भीतीचें कारण कृष्णाच्या तेव्हांच ध्यानांत आलें! त्याचे मुख पांढरें फटफटीत झालें! "ताई, विपिनबाबू येताहेत." असें बोलून, तो तसाच गडबडीनें ताटावरून

उठला, व स्वयंपाकघराच्या दाराआड जाऊन उभा राहिला. त्याचें अनुकरण करून उमाही दुसऱ्या दिशेनें दिसेनाशी झाली! एकाएकीं घराचा मालक येताच चोरांची भीतीनें गाळण उडून त्यांनीं जसें आचरण करावें, तसेंच आचरण या उभयतां मुलांनीही केलें! हा सर्व प्रकार इतक्या थोड्या वेळांत घडून आला कीं, हेमांगिनीला मुखावाटे शब्द काढण्याला देखील वेळ मिळाला नाहीं. कांहीं वेळपर्यंत हतबुद्ध झाल्याप्रमाणें तिनें एकदां इकडे, एकदां तिकडे दृष्टि फेंकली, व त्यानंतर परिश्रांत झाल्याप्रमाणें ती भिंतीला पाठ टेंकून बसून राहिली. लज्जा-युक्त अपमानाचा तीक्ष्ण शूल तिच्या हृदयाचा ठाव काढीत पार निघून गेला!

इतक्यांत विपिन आंत आला. अशा अवस्थेत समोरच बसलेल्या पत्नीकडे दृष्टि जातांच तो किंचित् उद्विग्न स्वरात म्हणाला, " हे काय? समोर ताट ठेवून अशी भिंतीला टेकून काय म्हणून बसली आहेस तू?"

हेमांगिनीनें कांहीं उत्तर दिलें नाहीं. विपिन जास्तच उत्कंठित होऊन म्हणाला, "पुन्हा ताप आला कीं काय? तुझें मुख असें म्लान कां?" इतक्यांत कृष्णाच्या ताटाकडे दृष्टि जाऊन तो म्हणाला, "आणखी, हे ताट कोणाचें? एवढें पुष्कळ अन्न टाकून देऊन कोण उठून गेलें? ललित वाटतें!"

हेमांगिनी म्हणाली, "नाहीं—ललित नाहीं!—तेथे कृष्णा जेवावयाला बसला होता. तुमच्या भयामुळें न जेवतां, ताट तसेंच टाकून देऊन तो दाराच्या आड जाऊन लपून बसला आहे!"

"का बरें?"

हेमांगिनी म्हणाली, "कां, तें तुम्हालाच चांगलें ठाऊक आहे! आणखी, तो एकटाच तुम्हाला भिऊन पळून गेला असें नाहीं. तुम्ही आल्याची बातमी कळ-वून, उमादेखील कोणीकडे जाऊन लपून बसली आहे!"

पत्नीच्या भाषणाचा प्रवाह वक्रगतीनें चालला आहे, हें विपिनबाबूंच्या लक्षांत यावयाला फारसा वेळ लागला नाहीं. म्हणूनच, तिला सरळ मार्गावर आण-ण्याच्या हेतूनें सहास्यमुखानें तो म्हणाला, " ती बेटी काय म्हणून पळाली? तिला भय वाटण्याचें काय कारण?"

हेमांगिनी रुक्ष स्वरातच म्हणाली, " तें मला काय ठाऊक? कदाचित् आईचा अपमान प्रत्यक्ष पाहण्याचा अप्रिय प्रसंग टाळावा या उद्देशानेंच ती पळून गेली असेल!" नंतर एक निःश्वास सोडून ती पुढें म्हणाली, " कृष्णा किती झालें,

तरी दुसऱ्याचा मुलगा ! तो भीतीमुळें लपून बसल्यास नवल नाहीं ! परंतु कोणा-लाही बोलावून दोन घांस खाऊं घालण्याचा अधिकार आपल्या आईला आहे, या गोष्टीवर प्रत्यक्ष पोटच्या पोरीचादेखील विश्वास बसला नाहीं ! ”

एकदर प्रकार आपल्या कल्पनेपेक्षां फार पुढें जाऊन ठेपला आहे, हें आतां विपिनला समजलें. तेव्हां, तो निदान यापुढें तरी जाऊं नये अशा उद्देशानें, त्यानें सर्व प्रकार थट्टेवर नेण्याचा प्रयत्न करून म्हटलें, “ अ हं !–तुझा कशाचा अधिकार ! भिकाऱ्याला भिक्षा घालावयाची असल्यास देखील तुला माझ्या परवानगीची आवश्यकता असते ! बरें पण, तें जाऊ दे—कालपासून पुन्हा तुझें डोकें तर दुखलें नाही ना ? मला वाटते एकदा सिव्हिल सर्जनला बोलावून तुझी प्रकृति नीट तपासून घेतली पाहिजे—नाहीं तर कांहीं दिवसांकरितां कलकत्त्याला—! ”

परंतु तिच्या आजाराच्या आणि चिकित्सेच्यासंबंधींची चर्चा येथेंच थांबली. हेमागिनीनें प्रश्न केला, “ ती असतांना तुम्हीं कृष्णाला काहीं बोलला होता का ?”

विपिन जणू काय आकाशांतून खालीं कोसळला.—“ मी ?—केव्हां ? नाहीं !—मी कांहीं—ओ हो !—त्या दिवशीं मला वाटतें, मीं त्याला म्हणालों होतों—वहिनी रागावतात—दादांना देखील हा प्रकार रुचत नाहीं—मला वाटते उमादेखील तेव्हा जवळ उभी होती—कोणाला ठाऊक—! ”

“ मला ठाऊक आहे ” असें म्हणून हेमागिनीनें विपिनचे भाषण अर्ध्यातच थाबविलें ! आतां जास्त वेळ थांबून उपयोग नाहीं, असा विचार करून त्यानें आपल्या खोलीचा मार्ग सुधारला ! विपिन बाहेर निघून जातांच, हेमांगिनीनें कृष्णाला हांक मारली व म्हणाली, “ कृष्णा, हे घे चार पैसे. बाजारांतून फुटाणे आणून खा, जा बाळ ! आणखी यापुढें तुला भूक लागली असतां माझ्याकडे येत जाऊ नकोस ! दुसऱ्या माणसाला दोन घांस खाऊं घालण्याचा तुझ्या ताईला अधिकार नाहीं ! ”

कांहीं एक न बोलतां खालीं मान घालून कृष्णा निघून गेला ! स्वतःमध्यें आणि आपल्या पत्नीमध्यें मनोमालिन्य उत्पन्न करणाऱ्या या “ दुष्टग्रहा”कडे विपिनबाबूनें आपल्या खोलींतून क्रोधपूर्ण दृष्टि वळविली ! हळू हळू, तो त्या दृष्टीसमोरून नाहींसा झाला. पण त्याच्याबद्दलचा क्रोध मात्र विपिनच्या अंतःकरणांतून नाहींसा झाला नाहीं !

[७]

या गोष्टीला सरासरीं पांच सहा दिवस लोटले असतील. या अवधींत विशेष असें कांहीं घडून आलें नाहीं. आज दोनप्रहरच्या सुमारास हेमांगिनी आपल्या खोलीत बसली असतां, विपिन एकाएकीं आंत आला. त्याच्या मुखचर्येवरून, तो आज बराच रागावला असावा असें दिसत होतें. आंत पाऊल टाकताच, आपली विरक्त दृष्टि हेमांगिनीकडे वळवून तो म्हणाला, " हें तूं मांडलें आहेस तरी काय? कृष्णाबद्दल तुझ्या मनात एवढा द्रव उत्पन्न होण्याचे कारण तरी काय? त्या तिऱ्हाइताकरितां तू प्रत्यक्ष आपल्या माणसांशीं देखील भाडण करावयाला मागें पुढे पाहात नाहीस, याला म्हणावें तरी काय? आज दादादेखील फार सताप-लेले दिसत आहेत ! "

कांहीं वेळापूर्वी, हेमांगिनीला ऐकूं जाईल अशा बेतानें, नवीनबाबूशीं बोल-ण्याचें निमित्त करून कादंबिनीनें जे वाग्बाण सोडले होते, ते अगदीच निष्फळ गेले होते असें नाहीं ! अगोदरच कादंबिनी म्हणजे वाग्युद्धात पूर्णपणें निष्णात; त्यात आज तिला स्फुरण चढलेले ! तिच्या मुखांतून निघणारा प्रत्येक शब्द कठोर शस्त्राचे रूप धारण करून हेमांगिनीच्या हृदयावर दारुण प्रहार करीत होता; व त्या वाग्बाणाचीं टोकें ज्या प्रमाणांत विषांत भिजविलेलीं असतील त्या प्रमाणात इकडे हेमागिनीच्या अगाचा जास्तच भडका उडत होता ! आज तिला प्रत्युत्तरही देतां येईना; कारण दिराची स्वारी हजर होती. ह्या कारणामुळे हा सर्व अपमान मुकाट्यानें सहन करण्याखेरीज प्रतिकाराचा दुसरा मार्ग तिला आढळेना ! पूर्वीच्या काळीं रजपूत लोकांवर एरव्हीं विजय मिळविणें दुरापास्त असल्या कारणानें मोंगलांनीं एका नवीन युक्तीचे अवलंबन केलेलें इति-हास सांगतो. गाईंच्या आडून रजपुतांच्या सैन्यावर शरवृष्टि करून मोगल कधीं कधीं विजय मिळवीत असत. कादंबिनीनें देखील आजकाल हेमागिनीवर विजय मिळविण्याकरितां असल्याच युक्तीचें अवलम्बन करण्यास सुरवात केली होती. नवीन बाबूंच्या समक्ष वाटेल तशा युक्तींचा उपयोग केला तरी प्रत्युत्तर येण्याचा संभव नसल्याकारणानें कादंबिनीनें विजयप्राप्तीचा हा एक नवा मार्गच शोधून काढला होता !

योग्य वेळींच बाहेर पडण्याकरितां हेमांगिनीच्या क्रोधाला अवकाश न सांप-डल्या कारणानें ती जास्तच संतापली होती. त्यांत पतीच्या मुखावाटे निघालेल्या

शब्दांची भर पडतांच तिचा क्रोध जास्तच वाढला. त्याच्याकडे वळून ती म्हणाली, "अस्सं! भाउजींना देखील राग आला आहे आज? नवलच आहे म्हणायचें मोठें! माझा विश्वास देखील बसत नाहीं या गोष्टीवर! बरें, पण आतां काय केलें म्हणजे त्यांचा राग शात होईल?"

तिचें बोलणें ऐकून विपिनला देखील बराच राग आला. परंतु अंतःकरणांतील भाव बोलून दाखविणें त्याला आवडत नसल्या कारणानें, तो आपला संताप व्यक्त न करतां सहज स्वरात म्हणाला, "काय वाटेल तें झालें, तरी त्यांचें आपलें नातें काय, ते आपल्यापेक्षां वडील—!" परंतु त्याचें भाषण पूर्णपणे ऐकून न घेतां हेमांगिनी त्याला मध्येंच थांबवून म्हणाली, "आहे, आहे, मला सारं कांहीं ठाऊक आहे. वडील माणसांचा मान बाळगावा हे न कळण्याइतकी मी काहीं मूर्ख नाहीं! परंतु, त्या पोराबद्दल माझ्या अतःकरणात प्रेमभाव उत्पन्न झाला आहे, असें पाहून ते त्याला रात्रदिवस जास्त जास्तच छळीत असतात—!" बोलतां बोलतां तिचा स्वर बराच नरम झाला. कारण, बोलण्याच्या भरात दिराबद्दल आपल्या मुखावाटे निघूं नयेत असे अयोग्य शब्द निघाले, याबद्दल मागाहून ती काहींशी अप्रतिभ झाली! आज तिच्या अंगाचा फारच संताप झाला होता, व म्हणूनच तिच्या अंतःकरणावरील दाब बऱ्याच अशानीं कमी झाला होता.

या बाबतींत विपिन पत्नीच्या विरुद्ध होता. एका तिऱ्हाईत पोराबद्दल भावाभावामध्ये विनाकारण भांडणे उत्पन्न व्हावी, हे त्याला मुळींदेखील आवडत नव्हतें! हेमांगिनीला आपल्या भाषणाची लाज वाटली आहे असें पाहून, तो या संधीचा लाभ घेऊन आपली बाजू जोरदारपणानें तिच्यापुढें आणण्याकरितां म्हणाला, "छळीतबिळीत कांहीं नाहीं! तुला तरी लोकांच्या उठाठेवी हव्यात कशाला? तो त्यांचा पोरगा आहे, ते त्याला मारोत, झोडोत, हमाली करायला लावोत, वाटेल तें करोत! त्याच्या नसत्या पंचाइतींत पडण्याचें तुला कांहीं कारण नाहीं! त्या पोराबद्दल तुला एवढें वाईट कां वाटावें? पुन्हा, त्यानीं काहीं जरी केलें, तरी ते वडील आहेत, हें तूं कशी विसरतेस?"

हें ऐकून हेमांगिनीला थोडेसें आश्चर्य वाटलें! तिचें विपिनबरोबर लग्न होऊन सरासरीं पंधरा वर्षांच्या वर अवधि लोटला होता. या अवधींत तिनें त्याच्या अंतःकरणांत एवढया जाज्वल्य भ्रातृभक्तीचा उमाळा उत्पन्न झालेला कधींच पाहिला नव्हता. कांहीं वेळपर्यंत ती त्याच्या मुखाकडे टक लावून पाहात

राहिली. तिचा क्रोध सारखा वाढत्या प्रमाणात होता. कांहीं वेळानंतर ती कठोर स्वरांत म्हणाली, " ते वडील असतील—पण मलादेखील हृदय आहे! मी देखील दोन लेकरांची आई आहें! वडील माणसानी स्वतःच जर आपला मान कमी करून घेतला, तर त्याला मी काय करणार? "

यावर विपिन काहीं तरी प्रत्युत्तर देणार, इतक्यात तो मध्येच थबकला! दाराच्या बाहेरून कोणी तरी विनम्र कुंठित कंठस्वराने हाक मारीत आहे असें त्याला ऐकूं आले—" ताई! "

पतिपत्नीनी एकमेकांकडे अर्थपूर्ण दृष्टिनिक्षेप केला! पतीच्या मुखावर हास्याची क्षीण रेषा उमटलेली दिसली, परंतु त्यामुळे प्रेम किंवा आनंद विकीर्ण झाला नाहीं! पत्नी काही न बोलता अधरप्रांत ओष्ठाखाली दाबून दाराकडे वळली. तिच्याकडे दृष्टि जातांच कृष्णा आल्हादयुक्त स्वरांत सस्मितमुखाने म्हणाला, " कसें काय ताई? "

काहीं वेळपर्यंत हेमांगिनीच्या मुखातून शब्द निघेना! ज्या व्यक्तीबद्दल पतिपत्नीमध्ये नुकताच कलह सुरू होता, तीच व्यक्ति एकाएकी समोर येऊन उभी राहिलेली पाहून हेमांगिनीनें आपला सर्व राग त्याच्यावरच काढला! ती जास्तच विरक्त होऊन त्याला म्हणाली, " काय आहे रे? रोजच्या रोज तू येथे काय म्हणून येत असतोस? "

हे शब्द कानीं येताच कृष्णाच्या हृदयात भयाने धडकी भरली! हेमांगिनीच्या मुखावाटे असा कठोर स्वर आपल्याला ऐकावा लागेल, अशी त्याला कल्पना देखील नव्हती! एकदा हेमांगिनी आपली थट्टा करीत असावी, अशी एक पुसट शंकादेखील त्याच्या अंतःकरणात उत्पन्न झाली. परंतु तिच्या त्या कठोर मुद्रेकडे दृष्टी जाताच, ही प्रेमामुळें झालेली थट्टा नव्हे, हे त्या हतभागी बालकाच्या लक्षात यावयाला फारसा विलंब लागला नाही!

भय, विस्मय आणि लज्जेमुळें त्याचें मुख काळें ठिक्कर पडलें. अपराध्याप्रमाणें खालीं मान घालून तो हलक्या स्वरात म्हणाला, " काहीं नाहीं! सहज भेटण्याकरितां आलो होतो—! "

मोठ्यानें हास्य करून विपिन म्हणाला, " तुला भेटण्याकरितां आला आहे तो! " पतीचे हे हास्य हेमांगिनीच्या अंतःकरणाला फार झोंबलें. अपमानानें खवळून जाऊन, दलित नागिणीप्रमाणे तिनें विपिनकडे एक तीव्र दृष्टिपात केला,

व नंतर कृष्णाकडे वळून म्हणाली, "बरें आहे. आतां पुन्हा तूं येथें येऊं नकोस! —जा."

"बरें आहे." असें म्हणून कृष्णानें आपल्या मुखावरील काळा ठिक्करपणा, क्षीण हास्याखाली झाकण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यामुळें त्याचे मुख जास्तच काळे ठिक्कर, जास्तच विकृत दिसू लागलें! तो खाली मान घालून हळूहळू निघून गेला!

त्याच्या त्या विकृत मुखावरील काळी छाया हेमागिनीच्या मुखावरही पसरली. तिनें पुन्हा पतीकडे एकवार दृष्टिनिक्षेप केला, व द्रुतगतीनें खोलीच्या बाहेर निघून गेली!

[८]

सरासरीं पांच सहा दिवस निघून गेले. या अवकाशांत हेमागिनीचा आजार बराच विकोपास गेला होता. रोज डॉक्टर येऊन औषध देऊन जात असे. तरी देखील प्रकृति सुधारण्याचें चिन्ह दिसेना.

नुकताच सूर्यास्त झाला होता. हेमागिनी आपल्या खोलीत पलंगावर निजली होती. तिच्या शेजारी एका टेबलावर पाच सहा औषधाच्या बाटल्या असून, त्याच टेबलावर एक कंदील जळत होता. खोलीत दुसरे कोणीही नव्हतें. हेमांगिनी डोळे मिटून स्वस्थ पडली असताना, ललित आंत आला व तिला उद्देशून म्हणाला, "आई!"

हेमांगिनीनें नेत्र उघडले, व त्याच्याकडे मान वळवून क्षीणस्वरात प्रश्न केला, "काय म्हणतोस रे?"

ललित म्हणाला, "आई, मी खेळायला जाऊ का ग बाहेर?"

हेमागिनी किंचित् हसून म्हणाली, "कां रे ललित, तुझी आई एवढी आजारी आहे, तरी या पाचसहा दिवसांत तू एकदां देखील तिच्याजवळ येऊन बसला नाहींस!"

ललित लाजला, व हळू हळू येऊन आई शेजारीं तिच्या पलंगावर बसला. त्याच्या पाठीवरून प्रेमाने हात फिरवीत हेमांगिनी म्हणाली, "या आजारांतून बरी न होतां, जर मी मरण पावले, तर तुला काय वाटेल? मी मेल्यानतर तूं काय बरे करशील? रडशील का रे तूं माझ्याकरतां—?"

पण ललितनें तिला जास्त बोलूंच दिलें नाहीं! त्या अप्रिय भाषणाचा ओघ मध्येंच थाबवून तो म्हणाला, " हूं:! असे भलतेच काय बरें बोलतेस तूं? बाबा म्हणत होते, तू लवकरच बरी होशील म्हणून!"

मातेनें पुत्राचा हात आपल्या हातात घेतला, व मुखावाटे कांही न बोलतां ती तशीच पडून राहिली. या शीतल स्पर्शाच्या योगानें, ज्वरामुळे होणारी तिच्या शरीराची व्यथा शांत झाली, असें तिला वाटूं लागलें. पुष्कळ वेळपर्यंत तो हात तसाच धरून ठेवून हें सुख अनुभवावें, अशी तिची इच्छा होती; परंतु ललितला बाहेर खेळावयाला जावयाचें असल्याकारणानें, तिची इच्छा तृप्त होऊं शकली नाही. आपले सोबती या वेळीं खेळण्यात गढून गेले असतील, व आपणच काय ते एकटे त्या आनदापासून वञ्चित झालो आहोत, या विचाराने त्याचें अतःकरण अस्वस्थ झालें, व त्याबरोबर त्याचे शरीरही अस्थिर झालें. मुलाच्या अतःकरणांत काय चाललें आहे, तें ओळखून, ती स्मितमुखानें त्याला म्हणाली, " बरं तर, जा खेळायला. बाकी लवकरच परत ये हो! रात्र करूं नकोस!"

" अहं! हा इतक्यात येतो मी परत!" असें म्हणून ललित आनंदानें उड्या मारीत खोलीच्या बाहेर चालता झाला. हेमागिनीनेंही त्याच्या मागोमाग आपली प्रेमपूर्ण दृष्टि वळविली! त्याला जाऊन सरासरीं दोन मिनिटे झालीं असतील, इतक्यांतच पुन्हा खोलीचें दार वाजलें व ललित पुन्हा येऊन आईच्या समोर उभा राहिला. तो इतक्यांतच परत आलेला पाहून हेमागिनीनें आश्चर्यानें प्रश्न केला, " कां रे, इतक्यातच परत आलास?"

ललित म्हणाला, " माझें एक काम आहे! ऐकशील का तूं?"

हेमागिनी हंसून म्हणाली, " समजलें तुझे काय काम आहे तें! खाऊकरितां पैसे हवे असतील, होय ना? जा. त्या टेबलाच्या खणांत पैसे आहेत, त्यातून चार पैसे घे. जास्त घेऊं नकोस, बरें का!"

ललित म्हणाला, " अहं! मला पैसे नकोत! दुसरेंच काहीं काम आहे तुजजवळ! हो म्हणशील तर सागतों!"

आता मात्र हेमांगिनीला बरेंच आश्चर्य वाटले. खाऊकरितां पैसे मागण्याखेरीज त्याचे दुसरें कोणते काम असावे, याची तिला कल्पना होईना! आश्चर्यव्यंजक स्वरांत ती त्याला म्हणाली, " काय, तुला पैसे नकोत? मग दुसरें काय बरें काम आहे तुझें?"

ललित आणखी थोडा पुढें आला, व विनवणीच्या स्वरांत म्हणाला, “ कृष्णा-मामाला एकदां आंत येऊ देईनास ? वाटल्यास त्याला खोलींत येऊं देऊ नकोस. तो दारांतूनच एकदां तुझ्याकडे पाहून परत जाईल हवा तर ! कालदेखील तो किती तरी वेळपर्यंत बाहेर बसून होता. आजदेखील तो तेथेच बसला आहे. तू आजारी आहेस हें ऐकल्यापासून, तुला एकदा पहावें अशी त्याची फार इच्छा आहे ! ”

हेमांगिनीला कसेसेच वाटलें ! त्या दिवशीं रागाच्या भरात आपण त्याला पुन्हा येथे येऊं नकोस असे सांगितले, त्याचा असा परिणाम झालेला पाहून तिला अत्यत वाईट वाटले. कृष्णाला तिच्याबद्दल वाटणारें प्रेम पाहून त्याला आपण अशा निष्ठुरतेनें वागविल्याबद्दल तिचे अत.करण कळवळले ! ती व्यस्त भावाने अथरुणावर उठून बसली, व ललितला म्हणाली, “ काय म्हणतोस, तो बाहेर बसून आहे ? जा, जा–त्याला आत घेऊन ये ! अरे, अरे ! तो बाहेरच बसून राहिला आहे, हे तुम्ही कोणीच मला कसे सांगितलें नाही ? ”

“भीतीमुळे तो आत येत नव्हता ” असे म्हणत ललित बाहेर गेला. थोड्याच वेळानंतर कृष्णाने खोलीत प्रवेश केला. स्थिर दृष्टीनें हेमांगिनीकडे पाहण्याचें धैर्य त्याच्याकडून करवेना ! खोलीच्या आंत आल्यानंतर, दाराजवळच भितीला टेकून, खाली दृष्टि खिळवून तो काही न बोलता तसाच उभा राहिला !

हेमांगिनीनें नेहमींप्रमाणें प्रेमळ स्वरांत त्याला हाक मारून म्हटलें, “ ये, बाळ, असा माझ्याजवळ ये ! ” तरीदेखील कृष्णा आपल्या स्थानापासून हालेना ! आपण हेमांगिनीच्या आज्ञेविरुद्ध, तिला न आवडणारें वर्तन करीत आहों, या जाणिवेनें त्याची अवस्था एखाद्या अपराध्याप्रमाणें झाली होती. तो आपण होऊन जवळ येत नाहीं असे पाहून शेवटी हेमांगिनी स्वतः पलगावरून खालीं आली, व त्याचा हात धरून त्याला आपल्या शेजारीं आणून बसविले. त्याच्या पाठीवरून प्रेमपूर्वक हात फिरवीत ती अत्यंत ममतापूर्ण स्वरात म्हणाली, “ त्या दिवशीं रागाच्या भरांत मी तुला थोडेंसें रागावून बोललें, म्हणून तू आपल्या ताईचे पुन्हा नावदेखील घ्यायचे नाहीं, असें ठरविलेंस वाटते ! ”

तरीसुद्धा कृष्णा खालीं मान घालूनच बसला होता. पाहतां पाहतां, त्याचे नेत्र अश्रूंनीं भरून झाले. थोड्याच वेळांत, बांध फुटलेल्या जलप्रवाहाप्रमाणें, त्याच्या नेत्रांवाटे अश्रुधारा सुरू झाल्या. हें पाहून हेमांगिनीला आश्चर्य वाटलें.

आजपर्यंत कृष्णाला रडताना कोणीही पाहिलें नव्हतें. वाटेल तसे कष्ट पडले अथवा यातना सोसाव्या लागल्या, तरीदेखील तो सर्व कांहीं मुकाट्यानें खाली मान घालून सहन करीत असे. त्याच्या नेत्रांत अश्रु उभा राहिलेला आजपर्यंत कोणीही पाहिला नव्हता. त्याचा हा स्वभाव हेमांगिनीच्याही ओळखीचा होता. तेव्हां तोच कृष्णा आज स्फुंदस्फुदून अश्रु ढाळीत आहे हें पाहून तिला साहजिकच फार आश्चर्य वाटलें. त्याचें रडणे थांबविण्याच्या उद्देशानें ती म्हणाली, "छीः! हें रे काय? तुझ्यासारख्या शहाण्या मुलानें डोळ्यांतून आसवें गाळणें चांगलें का? वेडा कोणीकडचा! हं, पूस डोळे!" असें म्हणून ती पदरानें त्याचे अश्रु पुसू लागली!

रडे थांबविण्याचा शिकस्तीचा प्रयत्न करून कृष्णा म्हणाला, "डाक्टर म्हणाला, की आजार बराच विकोपास गेला आहे म्हणून!"

कृष्णाच्या मनःसंतापाचें हें खरें कारण लक्षांत येऊन, हेमांगिनी किंचित् हंसून म्हणाली, "हा रे वेड्या! एवढ्याचकरितां का गंगा यमुनांना पूर आला होता हा एवढा? अगदींच की रे वेडा आहेस तूं!" पण या 'क्षुल्लक' कारणावरून अश्रु गाळण्या इतका वेडेपणा केल्याबद्दल ती तोंडानें जरी त्याचा निषेध करीत होती, तरी प्रत्यक्षपणे ती स्वतः तोच वेडेपणा आचरीत होती! नेत्रांत उभे राहिलेले दोन अश्रु डाव्या हातानें हळूच निःशेष करून ती कृष्णाकडे वळली व कौतुकानें म्हणाली, "माझा आजार बराच वाढला असें डॉक्टरनें सांगितलें, म्हणून काय बिघडलें?—समज मी मेलें; तरी त्यांत वाईट काय? ललित आणि तूं—तुम्ही दोघेही माझ्या चितेला अग्नि द्याल!—देशील ना?—

हेमांगिनी पुढें कांहीं बोलणार होती, तें तेवढ्यावरच थांबलें. तिचें भाषण सुरू असतांनाच, "का ग बाई, आज कशी आहे तुझी प्रकृति?" असें म्हणत वडील जाऊबाईची स्वारी दारांत येऊन उभी राहिली! हेमांगिनीचें भाषण अर्धांतच अर्ध्यांत थांबलें. कृष्णाचें हृदय कांहींसें अस्वस्थ झालें. त्याला तेथें बसलेला पाहतांच कादंबिनीची हेमांगिनीच्या प्रकृतीबद्दलची विचारपूस वर दिलेल्या एका वाक्यावरच थांबली. कांहीं कालपर्यंत कृष्णाकडे आपली तीक्ष्ण दृष्टि रोंखल्यानंतर कादंबिनी म्हणाली, "अस्से! आपणदेखील येथें येऊन हजर झालांत एकूण! आज दुकानाकडे......? आणखी हें काय? आसवें गाळून ताईसाहेबांजवळ प्रेमाचें प्रदर्शन चाललें होतें वाटतें? बाई, बाई! शर्थ झाली या कारट्याच्या

पुढें ! वरून दिसायला मेला कसा अगदीं साळसूद; पण सोंगे तरी कशीं आणतां येतात अगदीं ! काय तें म्हणतात ना ?—गोगल गाय, आणि पोटांत पाय .........!”

परतु कादबिनीला देखील आपला भडिमार एवढयावरच आटोपता घ्यावा लागला ! हेमांगिनी उशीला टेकून पडली होती, ती किंचित् उठून बसून कादंबिनीला तीक्ष्ण स्वरांत म्हणाली, ‘बाई, सात आठ दिवसांपासून माझी प्रकृति बरीच बिघडली आहे. अगोदरच माझें चित्त स्थिर नाहीं, म्हणून म्हणते, कृपाकरून या वेळेला तुम्ही आपल्या घरी जा !”

हे शब्द कानी पडताच, प्रथम काही वेळपर्यंत कादबिनी अप्रतिभ होऊन गप बसली. परतु थोड्याच वेळानतर अगी अवसान आणून, परतु बाह्यतः शात स्वरांत ती हेमांगिनीला म्हणाली, “बाई, मी तुला उद्देशून तर काहीच बोलले नाहीं ! मी आपल्या भावाला उपदेशाच्या दोन गोष्टी सांगितल्या, तर त्यात तुला राग येण्यासारखें किंवा वाईट वाटण्यासारखें काय बरे आहे ? जेथे तेथे आपला सबध आणून, त्याला बोललेले तू आपल्या अगावर काय म्हणून ओढून घेतेस ?”

वाद पुढे वाढविण्याची इच्छा नसल्यामुळें हेमांगिनी शांत स्वरांत म्हणाली, “तुमचा उपदेश रात्रदिवस सुरूव आहे ! घरीं गेल्यानंतर मग वाटेल तेवढा वेळ करीत बसा त्याला उपदेश ! येथे माझ्यासमोर त्याला काही बोलण्याचे कारण नाहीं, व मी तुम्हाला बोलूही देणार नाही !”

पण या भाषणामुळें कादबिनीचा क्रोध शात न होतां उलट जास्तच भडकला. भांडणाच्या पुढच्या तयारीनें ती किंचित् पुढें आली, व नाकपुड्या फुगवून म्हणाली, “कां बरें ? तूं मला घराबाहेर हांकून लावशील कीं काय ?”

हेमांगिनी हात जोडून म्हणाली, “बाई, मला उगाच त्रास देऊं नका ! मी तुमच्या पायां पडतें हवी तर. तुम्हाला येथेच बसावयाचें असेल, तर गप तरी बसा, नाहीतर आपल्या घरीं जा !”

“म्हणजे ? मी आपल्या भावाला उपदेशाच्या गोष्टीदेखील सांगूं नयेत कीं काय ?”

हेमांगिनी म्हणाली, “त्या गोष्टी आपल्या घरीं जाऊन सांगा !”

“कांहीं हरकत नाहीं ! घरीं जाऊनच सांगतें कसें काय आहे तें ! जेव्हां पहावें तेव्हां मेला माझ्या नांवानें खडे फोडीत हिंडत असतो—बज्जात कारटा !

वासराचें दावें तुटलें होतें, म्हणून म्हटलें कृष्णा, बाळ, वर माळ्यावर जुना दोर पडला आहे, त्यापैकीं पुरेसा दोर घेऊन ये आणखी एक सुरेखसें दावें तयार दे करून! पण तो कसला वस्ताद! काम सांगण्याचाच काय तो अवकाश, कीं केलीच त्यानें इकडच्या तिकडच्या थापा द्यायला सुरवात! काय म्हणे, आज मला खेळायला जाऊ दे; उद्यां सकाळीं अगदी शपथपूर्वक दावे तयार करून देईन! हाच चालला आहे वाटतें तुझा खेळ या ठिकाणीं?" असे म्हणत, दण् दण् पाउले आपटीत कादबिनी खोलीच्या बाहेर निघून गेली! सरासरी पाच मिनिटे झाली, तरी कोणाच्याही मुखावाटे एक शब्दही निघेना! हेमागिनी एखाद्या लाकडाच्या पुतळीप्रमाणे दाराकडे स्थिर दृष्टी लावून बसली होती. कृष्णाही त्याच अवस्थेत तिच्या शेजारी बसला होता. शेवटीं हेमागिनीनें एक लाबच लाब नि श्वास टाकला व अथरुणावर आग टाकले. काही वेळानतर कृष्णाकडे वळून ती किंचित् रुक्ष स्वरात म्हणाली, "का बरे तू खेळण्याचे निमित्त सागून माझ्याकडे आलास कृष्णा? खेळायलाच गेला असतास म्हणजे ही भानगड मुळीच उपस्थित झाली नसती. तू मजकडे येऊं नये, अशी जर त्या लोकाची इच्छा आहे, तर यापुढे तूं येथे येत जाऊ नयेस, हेच बरे!"

यावर कृष्णा काहीच बोलला नाही. हळू हळू पावले टाकीत खाली मान घालून तो बाहेर निघून गेला. पण दुसऱ्याच क्षणीं पुन्हा परत येऊन तो म्हणाला, "ताई, आमच्या गावी विशालाक्षी देवीचे एक फार जागृत स्थान आहे. तिला नवस केला, म्हणजे वाटेल तसा आजार असला तरी लगेच बरा होतो, अशी फार ख्याति आहे. तेव्हा एकदा त्या देवीला नवस करून पहा ना?"

कादंबिनीबरोबर एवढयांतच निरर्थक वादविवाद झाला असल्याकारणानें हेमांगिनीचे चित्त कांहीसें क्षुब्ध झालें होतें. उभयता जावामध्यें अशी भाडणे नेहमींच होत; आजचे भाडण म्हणजे मोठेंसें नवल नव्हते. पण ते नवल नसलें, तरी त्यांत एक विशेष गोष्ट होती. आजच्या भाडणाचें मूळ कारण कृष्णा. आजप्रमाणें सुरेख संधि अनायासेंच प्राप्त झाली असताना, कृष्णा घरीं परत गेल्यानंतर कादंबिनी त्याची काय दुर्दशा करील, हा एकच विचार तिच्या अतःकरणाला सारख्या वेदना देत होता. या गोष्टीला अप्रत्यक्षपणे आपणच कारण झालों, या विचारानेंही तिला कमी दुःख होत होतें असें नाहीं. अशा परिस्थितींत आपल्या हातून कृष्णाला कोणत्याच प्रकारची मदत करतां येणें शक्य नाहीं, आपला

अगदीच निरुपाय आहे, या जाणिवेनें तिचे अतःकरण क्षुब्ध झाले. इतक्यात कृष्णा पुन्हा परत आला, हे पाहून ती उठून बसली व त्याला आपल्या शेजारीं बसवून प्रेमानें त्याच्या पाठीवरून हात फिरवू लागली. त्या अनाथ पोराची अशी करुणाजनक स्थिति पाहून तिच्या नेत्रात अश्रू उभे राहिले. पदरानें डोळे पुसून ती म्हणाली, “मी या आजारातून बरी झाले, म्हणजे एक दिवशी तुलाच, कोणाला न कळता, देवीची पूजा करून नवस फेडून येण्याकरिता पाठवीन! जाशील ना तू एकटा? होईल का तुझ्या हातून एवढं काम?”

आनदामुळे कृष्णाचे नेत्र विस्फारित झाले. उत्साहयुक्त स्वरात तो म्हणाला, “हो, हो! एकटा न जायला काय झाले? मी अगदी सहज जाऊन येईन! मग ताई, असेंच का करू नये, मी म्हणतो? आजच द्या मला पाठवून तिकडे. बरोबर एक रुपाया द्या म्हणजे झाले! तेवढ्यात पूजा वगैरे सर्व आटोपून घेईन मी. देवाच्या देवळातील पुजारीबुवा माझे चागल्या ओळखीचे आहेत. माझें काम ते तेव्हाच उत्तम रीतीनें करून देतील. आणखो, पुन्हा, मला जास्त वेळ लागेल असेही नाही. आता निघालो, म्हणजे उद्या सकाळी येथे हजर! देवीचा प्रसाद खाल्ला की ताबडतोब आजार नाहींसा होईल बघा! मग? पाठवताना मला आजच?”

कृष्णाला आता जास्त विलब सहन होत नसून तो जाण्याकरिता अत्यंत आतुर झाला आहे, हे हेमागिनीला स्पष्टपणे दिसून आले. ती हळूच म्हणाली, “पण तूं उद्या परत आलास, म्हणजे तुला चागला मार खावा लागेल, या गोष्टीचा केला आहेस का काही विचार?”

मार खाण्याबद्दल गोष्ट निघताच कृष्णाचा उत्साह एकदम नाहीसा झाला. त्याचें आनदानें प्रफुल्लित दिसणारें मुख सर्रकन् उतरले. परतु इतक्यात दुसराच एक विचार त्याच्या अत.करणात उदय पावला. त्याबरोबर त्याचा मावळलेला उत्साह पुन्हा आला. त्याचे मुख पुन्हा पूर्वीप्रमाणे आनदानें प्रफुल्लित दिसू लागले. तो म्हणाला, “अ! काही हरकत नाहीं मार खावा लागला तरी! मला नाही त्याची पर्वा! तुमचा आजार तर दूर होईल ना? झालें तर मग!”

हेमागिनीच्या नेत्रात पुन्हा अश्रू उभे राहिले. ती गद्गद स्वरांत म्हणाली, “कृष्णा, अरे मी कोठली कोण, माझे तुझें काय नाते? असें असतांना, माझ्या-करितां तूं असा जाच सहन करण्याचें काय बरें कारण?”

कृष्णा या प्रश्नाचे काय उत्तर देणार ? त्याचें पीडित आर्त हृदय रात्रंदिवस अश्रु ढाळीत असून आपल्या मातेला धुंडाळीत असते, हें त्या पोराला कसें कळावें ? हेमांगिनीच्या प्रश्नाचा अर्थ त्याच्या ध्यानांत येईना ! एकवार तिच्या मुखाकडे दृष्टिनिक्षेप करून तो म्हणाला, " तुमचा ताप अजून हटत नाहीं. प्रकृती दिवसेदिवस जास्त जास्त क्षीण होते आहे......! "

आपल्याबद्दल कृष्णाची एवढी कळकळ पाहून ती किंचित् हंसून म्हणाली, " माझा आजार वाढतो आहे; प्रकृती जास्त क्षीण होत आहे, म्हणून काय झालें ? त्याबद्दल तुला एवढी काळजी काय म्हणून वाटते ? "

हा प्रश्न ऐकून कृष्णाला फार आश्चर्य वाटलें. तो भिवया वर चढवून म्हणाला, " काळजी काय म्हणून वाटते म्हणजे ? अहो, ताप बरा होत नाही अशा स्थितीत वाराबिरा लागून जर छातीत सर्दी जाऊन बसली, तर मग कसें होईल ? डॉक्टर म्हणाला, की तसे झाले म्हणजे रोग असाध्य होतो म्हणून ! भलतेंच कांही तरी ? म्हणे, काळजी वाटण्याचें कारण काय ! "

" बरे तर ! आतां तुझी जरूर वाटली, म्हणजे मी तुला बोलावणे पाठवीन, त्या वेळेस ये ! बाकी यापुढे न बोलावतां येत जाऊ नकोस बर बाळ ! "

"का बरेताई ? "

अंतःकरणातील निश्चय कायम ठेऊन, दृढ भावानें मस्तक हालवून हेमांगिनी म्हणाली, " अं हं ! यापुढे मी तुला माझ्या घरी येऊं देणार नाही ! न बोलावतां जर तूं आलास, तर मी तुझ्यावर फार रागावेन, बरें का ! "

तिच्या मुखाकडे आपली सभय दृष्टि वळवून कृष्णानें प्रश्न केला, " बरें तर मग ! सांगा, उद्यां सकाळी बोलावणे पाठवाल ना ? "

" उद्या सकाळीच पुन्हा येण्याची तुझी इच्छा आहे का ? "

अप्रतिभ होऊन कृष्णाने उत्तर दिले, " बरें, सकाळी नाही तर दोनप्रहरीं येईन !—होय ना ताई ? "

ही विनति करीत असता, त्याच्या मुखावर दृग्गोचर होणारी व्याकुल अनुनयाची छटा पाहून हेमांगिनीच्या हृदयात व्यथा उत्पन्न झाली. आपल्या सहवासांत काळ घालवावा, अशी कृष्णाची अत्यंत उत्कट इच्छा असून, या बाबतीत त्याची निराशा केल्यास, त्याच्या अंतःकरणास दारुण यातना झाल्याखेरीज राहणार नाहीत, हें तिला पूर्णपणें ठाऊक होते. तरी पण, हें कठोर आचरण करण्याखेरीज

तिला दुसरा मार्ग नव्हता! वाटेल तें झालें, तरी यापुढें तिला आपलें हृदय कठिण केलेच पाहिजे, असें तिला पूर्णपणें कळून आलें! प्रत्येक दिशेनें या असहाय एकाकी कोमल बालकावर कुशब्दांचा प्रहार एकसारखा सुरू असे. सहानुभूतीची आशा असलेल्या प्रत्येक ठिकाणीं पूर्ण निराशेशीं गांठ पडली असतांना, त्याला एकाएकीं हेमागिनीच्या प्रेमळ हृदयाची शीतल छाया सांपडली! या सावलीत विश्रांति घेत असतांना, तो इतर समयी अनुभवलेला त्रास, गजना, छळ वगैरे सर्व काहीं पूर्णपणे विसरून जाऊन, एका निराळयाच सुखाचा अनुभव घेत असे! याच कारणामुळे त्याच्या छळाचे स्वरूप तीव्रतर झाले, तरी त्याची त्याला काहीच क्षिति वाटत नव्हती! वाटेल तसा त्रास सोसावा लागला, तरी त्याला त्याची तयारी होती; परतु त्या भयामुळे तो आपले हें एक मात्र आश्रयस्थान सोडणे अशक्य होते! त्याच्या दृष्टीने जरी हे योग्य असले, तरी आपल्यामुळें या गरीब पोराला जास्त त्रास सहन करावा लागतो, ही कल्पनासुद्धां हेमागिनीच्या अतःकरणाला सहन होईना! आपल्या भेटीकरितां आल्यामुळें त्याला जाच सहन करावा लागावा, त्यापेक्षा आपला सहवास यापुढे बंदच राहणे जास्त श्रेयस्कर आहे, अशी तिची खात्री झाली. तिच्यामुळे होणारा छळ कृष्णा जरी मुकाट्याने सहन करू शकत होता, तरी तिने तो कसा व का सहन करावा?

हेमागिनीच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहू लागल्या. तिच्या कठोरतेची तिलाच लाज वाटू लागली. तरीदेखील एकीकडे मान वळवून होईल तेवढया रुक्ष स्वरांत ती कृष्णाला म्हणाली, "कृष्णा, तूं आतां येथून जा! मला उगाच विरक्त करू नकोस? यापुढे तुला बोलावले, तरच तू येथे ये, न बोलावता, वाटेल तेव्हा येऊन मला त्रास देत जाऊ नकोस! समजलास ना? जा आता तू।

"नाही; मी केव्हां बरे तुम्हाला त्रास दिला?" असे म्हणून कृष्णा आपलें भीत लज्जित मुख खालीं वळवून त्वरित गतीनें निघून गेला.

हेमांगिनीच्या नेत्रांतील अश्रुप्रवाह, वर्षाऋतूतील जलधारांचें स्वरूप धारण करून, जोरानें वाहूं लागला. कृष्णा म्हणजे कठोर परिस्थितीच्या वैराण वाळवंटांत वणवण करीत हिंडणारा, निरुपाय झालेला, अनाथ व अजाण असा प्रवासी. मातृप्रेमाच्या आश्रयस्थानापासून मुक्काम हालल्यानतर, आजपावेतों त्याला निवाऱ्याचें असें एकही स्थान आढळलें नाही. परिस्थितीच्या वणव्यात त्याचें

कोमल बाल-हृदय होरपळू लागलें. प्रेमाच्या व सहानुभूतीच्या ओलाव्यासाठीं त्याचा आर्त व पिपासित आत्मा तळमळू लागला! आपल्याला हवी ती वस्तु हेमांगिनीच्या ठायीं असून ती मिळण्यासारखी आहे असें पाहून, तो ती प्राप्त करून घेण्याच्या मागे लागला! तिलाच आपल्या मातेच्या ठिकाणीं मानून, तो तिच्या आश्रयास येऊन राहिला! तिच्या मातृस्नेहाच्या पदराखाली अल्प आश्रय तरी मिळावा या इच्छेनें प्रेरित होऊन, तो एखाद्या कंगाल भिकाऱ्याप्रमाणे आपली दरिद्री आशा अंतःकरणात बळकट धरून ठेवून भटकत होता!

हेमांगिनीला हे समजत नव्हते असे नाही. कोणत्याही स्थितीत असतांना, एखाद्या दीनदुबळ्या अनाथाची करुणापूर्ण प्रार्थना कानी आली, म्हणजे ती त्याचें दुःख नाहीसें करण्याचा शक्य तेवढा प्रयत्न करीत असे. असे असून, कृष्णाला स्वतःच कठोरपणे आपल्यापासून दूर सारताना तिच्या कोमल अंतःकरणाला केवढ्या दारुण यातना झाल्या असतील, याची कल्पना वाचकानीच करावी. नेत्रांतून वाहणारा अश्रु-प्रवाह थांबविण्याचा प्रयत्न करीत ती स्वतःशीच म्हणाली, "कृष्णा, बाळ! जाताना तू एवढेसे तोंड करून गेलास? माझ्या वर्तनाबद्दल तुला फार वाईट वाटले असेल? पण बाळ, मी तरी काय करू? ही तुझी ताई तुझ्यापेक्षां देखील जास्त निरुपाय स्थितींत आहे, हें मी तुला कोणत्या रीतीने समजावून सांगू? तुला आपल्या हृदयाशी धरून प्रेमाने क्षणभर कुरवाळावे, ही क्षमता माझ्या अंगीं नाहीं." उमा आत प्रवेश करून म्हणाली, "आई, काल कृष्णामामा दुकानाच्या कामावर न जाता तुझ्याजवळ येऊन बसला, याबद्दल काकानी त्याला चांगला चोप दिला! त्याच्या नाकावाटे एकसारखे—!"

तिला मध्येच थांबवून, हेमांगिनी रागाच्या स्वरात म्हणाली, "बरें, बरें!—गप बैस आता,—चल, निघ येथून!"

एकाएकीं आई रागावलेली पाहून उमा मनात दचकली! आपलें भाषण पूर्ण करण्याच्या भानगडींत न पडता, ती तशीच परत जाऊं लागली. इतक्यात हेमांगिनीनें तिला हांक मारून विचारले, "काय म्हणालीस तू? त्याला मारले म्हणून? कां ग, फार लागलें का त्याला? नांकातून बरेंच रक्त वाहिलें का?"

आईची हांक कानीं पडतांच उमा मध्येंच थबकली, परंतु पुन्हा आंत जाण्याचें तिला धैर्य झालें नाहीं! ती उभी होती तेथूनच म्हणाली, "नाहीं. फार नाहीं रक्त गेलें;—थोडेंसेंच!"

"बरें! जा तू!"

उमा परत जाऊं लागली. दाराजवळ येतांच ती म्हणाली, “ आई, हा बघ कृष्णा मामा आला ! ”

हे शब्द कृष्णाच्या ही कानी गेले. ताईच्या खोलीत प्रवेश करण्याकरितां हें पुरेसें सबळ कारण आहे असे मानून तो पुढे आला व दारातूनच आंत डोकावून, सलज्ज, सस्मित वदनानें हेमागिनीकडे पाहून म्हणाला, “ कसें काय ताई ? ”

क्षोभ, दु ख, अभिमान इत्यादि विकारानी तिच्या अत·करणात एकच गोंधळ उडवून दिला. एखाद्या वेड्या माणसाप्रमाणे चीत्कार करून ती क्रोधपूर्ण स्वरांत ओरडली, “ काय म्हणून आलास तू येथे ? बोलाविल्याखेरीज येत जाऊ नकोस म्हणून निक्षून सागितलें होते ना मी तुला ? मग का आलास तूं ? चल, जा—जा लवकर ! निघ येथून लवकर—! ”

हेमागिनीच्या मुखावाटे असे शब्द निघतील, असें कृष्णाला स्वप्नांत देखील वाटले नव्हते. त्याला काहीच बोध होईना ! एकाद्या मूढाप्रमाणें डोळे वासून तिच्याकडे पहात तो तेथेच उभा राहिला. हें पाहून हेमागिनी जास्तच तीक्ष्ण स्वरात म्हणाली, “ अजूनदेखील तू उभाच आहेस—जा म्हणून सांगते ना मी तुला ?—”

कृष्णाच्या मुखावरील हास्य पार नाहींसे झाले. शुष्क स्वरांत, फक्त “जातो” एवढा एकच शब्द कसा तरी उच्चारून तो हळू हळू निघून गेला ! तो निघून गेल्याबरोबर हेमागिनीनें निर्जीवाप्रमाणे धाडकन अथरुणावर आग टाकलें, व अस्फुट क्षुब्ध स्वरात ती बोलू लागली —

“शंभर वेळा सागितलें असेल मेल्याला, मजजवळ येत जाऊं नकोस म्हणून ! तरीदेखील, पुन· आपले, “ताई !” आहेच ! उमा, त्या शिवाला सांग, म्हणावें पुन्हा कधी कृष्णाला येथे येऊ देऊ नकोस म्हणून !”

उमा काहीच बोलली नाही ! आजचा प्रकार तिलासुद्धा काहीसा आश्चर्यकारकच वाटत होता. ती हळू हळू बाहेर निघून गेली !

रात्रीच्या समयीं, विपिन बाबू घरीं परत आल्यानंतर हेमांगिनीनें त्यांना आपल्याजवळ बोलावलें, व गद्गद स्वरांत म्हणाली, “आजपर्यंत कधींही मीं कोणत्याही वस्तूबद्दल गळ घातली नाहीं !—परंतु आज मात्र मी एका बाबतींत भिक्षा मागणार आहें ! माझी इच्छा पूर्ण कराल का ?”

तिच्या भाषणाचें नवल वाटून विपिननें सदिग्ध स्वरांत प्रश्न केला, “काय पाहिजे तुला ?”

हेमांगिनी म्हणाली, "मला कृष्णा पाहिजे !—बिचारा हतभागी पोरका पोर !—नाहीं आई, नाहीं बाप ! तेथें त्याची सारखी छळणा चालली आहे. असेंच चालू राहिलें, तर थोड्याच दिवसांत खात्रीनें त्याचा प्राण गेल्याखेरीज राहणार नाहीं ! यापुढें त्याचा छळ मला मुळींसुद्धा पहावत नाहीं !"

विपिन मृदु हास्य हसून म्हणाला, "हा सर्व त्रास निवारण करण्याचा एक सुरेख उपाय आहे ! आपले नेत्र झांकून घेतले म्हणजे झालें !" पतीची ही निष्ठुर थट्टा शूलाप्रमाणे हेमागिनीच्या हृदयात जाऊन भिनली ! इतर एखाद्या प्रसगीं तिनें हे केव्हांही सहन केलें नसते. परंतु आज दु खातिशयामुळें तिचें हृदय बधिर झाल्याप्रमाणें झालें होते. पतीच्या भाषणाचा तिच्या अत करणावर कांहींच विपरीत परिणाम झाला नाही. ती करुणापूर्ण नेत्रानी पतीकडे पहात, हात जोडून, विव्हल स्वरात म्हणाली, "सर्वसाक्षी परमेश्वराला साक्ष ठेवून मी सागते आहे, तो मला अगदी माझ्या पोटच्या मुलाप्रमाणे वाटतो ! यापुढें त्याला माझ्यापासून दूर ठेवू नका ! द्या—त्याला माझ्याजवळ आणून द्या;—मी त्याचा सांभाळ करीन—प्रेमानें खाऊ पिऊ घालून त्याला मोठा करीन,—त्याला माझ्या स्वाधीन करा ! तो मोठा झाला म्हणजे मग काय वाटेल ते करा,—मग मी काहींएक बोलणार नाही !"

तिच्या अन्तःकरणातील कळवळा पाहून विपिनचे हृदयही काहीसे द्रवलें. तो किञ्चित् कोमल स्वरात म्हणाला, "पण कृष्णा म्हणजे बाजारात विकण्याकरिता ठेवलेली वस्तू का आहे, मी तुला आणून द्यायला ? त्याच्यावर आपला हक्क काय ? दुसऱ्याचा भाऊ, दुसऱ्याच्या घरी राहतो—त्या भानगडीत एवढे मन घालून स्वत.ला त्रास करून घ्यायचे तुला तरी काय कारण आहे ?"

हेमागिनीला आपले अश्रू आवरणे कठिण झाले ! थोड्या वेळानें कांहींशी शांत झाल्यावर, डोळे पुसून ती पुन्हा म्हणाली, "वाटेल तसें असले, तरी मनावर घेतल्यास तुम्हाला हे अशक्य नाही ! जाऊबाईना सांगून, भाऊजींना सांगून तुम्ही त्याला येथे अगदीं सहज आणूं शकाल ! मी तुमच्या पाया पडतें—पदर पसरतें, एवढी विनति मान्य कराच !"

विपिन म्हणाला, "बरें, समज, त्याला येथें आणणें जरी अशक्य नसलें, तरी जन्मभर त्याचें प्रतिपालन करायला, आपण तरी काय असे श्रीमत आहोंत ? आपल्या स्थितीचा तरी विचार नको का करावयाला ?"

एवढया दीन वाणीनें विनवून सांगितले, तरीदेखील आपला पति आपली विनंति मान्य करीत नाहीं हें पाहून हेमांगिनीला साहजिकपणें किंचित् वाईट वाटलें. अभिमानयुक्त स्वरांत ती म्हणाली, " यापूर्वी आपण माझी एखादी क्षुल्लक विनतिदेखील अमान्य केली नाहीं; माझी प्रत्येक इच्छा पुरवीत आलां ! आणि आजच असा कठोरपणा स्वीकारावयाला माझ्या करवी काय बरे अपराध घडला ? मीं इतके हृदय फोडून सांगितलें, तरीसुद्धा आज माझी ही सामान्य इच्छा पूर्ण करावी असे आपल्याला वाटत नाही ! त्याचे नशीब फुटके, म्हणून तुम्ही सर्वांनी एकत्र होऊन त्याचा जीव घ्यावा कीं काय ? हा प्रकार उघड्या डोळ्यांनीं पहात असतां, प्रतिकाराचा कांहीं प्रयत्न न करता स्वस्थ बसणे मला शक्य नाही ! तुम्ही नाही माझी विनति मान्य केलो, तरी हरकत नाहीं ! आतां मी स्वत.च या बाबतींत पुढाकार घेणार ! मी स्वतःच त्याला माझ्याजवळ यायला सांगतें !—पाहतें ते तरी माझें काय करतात ते !"

पत्नीचा हा हेकेखोरपणाचा निश्चय पाहून विपिनलाही क्रोध आला. तो रुष्ट स्वरात म्हणाला, " त्याला खाऊ घालण्याकरिता माझ्याजवळ पैसे नाहींत ! "

हेमांगिनीनेंही तशाच स्वरात उत्तर दिलें. ती म्हणाली, " कांहीं हरकत नाहीं ! तुमच्या जवळ नसले तरी माझ्याजवळ पैसे आहेत ! घरांत माझा कांहींच अधिकार नाही की काय ? आपल्या मुलाचे पालन पोषण करण्याचा मला पूर्ण हक्क आहे ! मी उद्याच त्याला बोलावून आणून येथे ठेवून घेते ! जाऊबाई जर जबरदस्तीनें त्याला मजजवळून ओढून घेऊन जाऊं लागल्या, तर मी त्याला पोलिसच्या संरक्षणाखाली नेऊन ठेवीन ! पाहतें, माझें कोण काय करते तें ! "

पत्नीचें हें विलक्षण भाषण श्रवण करून विपिन क्षणभर स्तभितच झाला ! त्याला हेमांगिनीचा बराच राग आला ! अभिमानयुक्त रुष्ट स्वरात तो म्हणाला, " ठीक आहे, पाहूं या काय होते ते ! "—असे बोलून तो खोलीच्या बाहेर निघून गेला !

दुसरे दिवशीं प्रातःकाळीं आकाश मेघाच्छन्न झालें होतें. थोडा थोडा पाऊसही पडत होता. हेमागिनी अथरुणावर उठून बसली. चित्त अस्वस्थ असल्याकारणानें तिला चांगली निद्रा आली नव्हती. कृष्णाचे पुढे कसें होईल, याबद्दल वारंवार तिच्या अतःकरणात विचार उत्पन्न होऊन तिला अस्थिर करीत ! पहाटेच्या सुमारास तिचा डोळा लागला. झोंप उघडल्यावर पाहते, तों आज

उठावयाला तिला रोजच्या पेक्षां जास्त उशीर झाला होता! मेघांच्या आवरणाखालीं झांकून गेल्यामुळें, सूर्याचा प्रकाश जरी नेहमींप्रमाणें दिसत नव्हता, तरी दिवस बराच वर आला असावा अशी कल्पना सहज करता येत होती. हेमागिनी शय्येवरून खालीं उतरली, व तिनें जाऊन खिडकी उघडली. एकाएकीं, पलीकडच्या घरांतून गोपाळाच्या उच्च कठांतून उच्चारलेले पुढील शब्द तिच्या कर्णपथावर येऊन आदळले—"आई, हे बघ, तुझे प्रतापी बधुराज पावसात भिजत भिजत घरी परत येत आहेत!"

"कुठें?—कोठे आहे तो? थांब, ही आलेंच मी!" असे म्हणून कादंबिनी भीषण स्वरूप धारण करून द्रुतगतीनें बाहेर आली!

हेमागिनीचे हृदय थरारले! तिनें ललितला हांक मारली. तो येतांच ती त्याला म्हणाली, "बाळ, त्या घरी जाऊन, कृष्णा कोठें गेला होता,—गडबड कशाबद्दल आहे, ते पाहून ये बरें! जा!"

आईची आज्ञा पालन करण्याकरिता ललित द्रुतगतीनें कादबिनीच्या घराकडे जाण्याकरिता निघाला. इकडे हेमागिनीच्या मनाची स्थिति फार अनुकपनीय झाली होती. कृष्णाच्या हातून आज पुन्हा कोणता नवीन अपराध घडला असावा, त्याचा मोबदला म्हणून आतां त्याला कोणती शिक्षा भोगावी लागणार, वगैरे विचार एकामागून एक तिच्या अत:करणांत उद्भवूं लागले. ललित केव्हां परत येऊन तिकडचे वर्तमान कळवितो, याबद्दल ती एकसारखी उत्कंठेनें वाट पाहूं लागली. शेवटीं एकदांचा तो परत आला. हेमागिनीनें प्रश्न केला, "काय झाले रे?"

ललित म्हणाला, "गोपाळनें कृष्णामामाला खुर्ची दिली आहे!" अगदीं लहान वयात, पंतोजीच्या कडक अमलाखालीं शाळेंत घालविलेल्या दिवसांची आठवण केल्यास "खुर्ची देणें" म्हणजे काय, याची कल्पना बहुतेक वाचकांस आल्याखेरीज राहणार नाहीं!

हेमागिनीने शुष्कमुखानें प्रश्न केला, "त्याचा अपराध काय?"

ललित म्हणाला, "काल तिसऱ्या प्रहरीं, गांवांतील काहीं गृहस्थांकडे उधार आलेली रक्कम वसूल करण्याकरितां म्हणून काकांनीं त्याला सांगितलें. त्याप्रमाणें तो वसूल आणण्याकरितां म्हणून बाहेर गेला, व काहीं माणसांकडून रुपये आणले देखील! परंतु ते काकांच्याकडे आणून न देतां, त्यानें स्वतःच खर्च केले. कालपासून तो घरींदेखील आला नाहीं!"

त्याच्या बोलण्यावर हेमांगिनीचा विश्वास बसेना! तिनें साशंक भावानें विचारलें, " कोण म्हणतो, त्यानें पैसे वसूल करून आणले असें ? "

ललित म्हणाला, " कृष्णा मागावयाला आला असतां, 'आपण त्याला रुपये दिले ' असें लक्ष्मण गवळ्यानें स्वतः काकाना सांगितले! " इतके बोलून ललित अभ्यास करण्याकरितां निघून गेला! यानंतर, विशेष असें कांहीं न घडता, दोन तीन तास निघून गेले. हेमांगिनीचें अस्वस्थ चित्तही हळू हळू स्थिर होऊं लागले. सरासरी साडेदहा वाजण्याचा सुमार झाला असेल. स्वयंपाकिणीनें हेमांगिनीचे ताट वाढून तिच्या खोलींत आणून ठेवलें. ती आता भोजनाला सुरुवात करणार, इतक्यात प्रत्यक्ष तिच्या खोलीच्या दाराशीच कुरुक्षेत्राचे दृश्य दिसूं लागलें. कादंबिनीच्या मागोमाग गोपाळ कृष्णाचा कान धरून त्याला खेचून आणीत होता. त्याच्याबरोबर नवीनबाबूही असून, त्यानीं विपिनला बोलावून आणण्याकरिता दुकानावर नोकर रवाना केला होता!

हा एकदर प्रकार पाहून हेमांगिनीच्या तोंडचें पाणी पळाले! प्रकरण बरेच पुढें गेले असावें, हे ताबडतोब तिच्या ध्यानांत आलें. ह्यानंतर तिला जेवण कसे रुचणार ? ती तशीच ताटावरून उठली, व विनयाने पदर वगैरे नीट सावरून खोलीच्या भिंतीशीं जाऊन उभी राहिली. इतक्यात नवीनबाबूंनी कर्णकर्कश स्वरात युद्धदुदुभी फुकली,—"सूनबाई, हे तू आरभलें आहेस तरी काय ? तुझ्यामुळें, आता आम्हाला आमच्या घरी वास्तव्य करणे सुद्धा कठीण झालें आहे! आज विपिनला सागून, आमच्या घराची किमत मला देऊन टाका म्हणजे आम्ही हे घर सोडून चालते होऊ! दुसरीकडे कोठेंही जाऊन राहिलेलें पुरवले; परंतु यापुढे हा तुमचा त्रास काही सहन करवत नाही आपल्याला! "

हेमांगिनी विस्मयानें अगदी हतबुद्ध झाली! नवीनबाबूच्या भाषणाचा कांहींच अर्थ तिच्या ध्यानांत येईना! ज्याच्याशीं साऱ्या जन्मात प्रत्यक्षपणे भाषण करण्याचा फारच क्वचित् प्रसंग आला होता, असा दीर आज आपल्या घरीं येऊन एवढया कठोर शब्दात आपली निर्भर्त्सना करतो, याचें कारण काय असावें, हे तिला कळेना! तिच्याकडून काहींच उत्तर मिळत नाहीं, असें पाहून कादंबिनी, युद्धपरिचालनाचा सर्व भार आपल्या शिरावर घेऊन, हेमांगिनीच्या अगदीं समक्ष उभी राहून, हातवारे करीत म्हणाली, " सूनबाई, मी तुझ्यापेक्षा वयानें, अधिकारानें वडील आहें—ते एक मेल जाऊं दे चुलींत! मला तर तूं

केव्हांपासूनच कुत्र्यामाजराप्रमाणें लेखीत असतेस! त्याबद्दल मी तुला कांहींच बोलत नाहीं! तुला बरें वाटेल तसें तूं कर!—देव जशास तसे प्रायश्चित्त देईलच! पण मी तुला हजारदा सांगितलें असेल—तूं माझ्या भावाचे नाव काढीत जाऊं नकोस म्हणून—तरी तुझे आपले आहे ते आहेच! लोकांना दाखविण्याकरितां, मारे मायेचा पूर आणून तू त्याला बिघडवून ठेवलें आहेस,—पण त्याचे परिणाम भोगावे लागताहेत आम्हाला! दोन दिवस मारे आजारून गोंजारून लाड करणें सोपे आहे; पण त्याचा जन्माचा भार तर आम्हालाच सहन करावयाचा आहे ना? त्याच्याकरिता तर नाही ना तू पुढे येणार?"

हे भाषण म्हणजे भांडणाला निमंत्रण आहे, हे हेमांगिनीनें तेव्हाच ओळखलें. तिनें आपली शांतवृत्ति ढळू न देता मृदु स्वरात हळूच प्रश्न केला, "पण असें झालें तरी काय?"

कादंबिनी जास्तच संतापून हातवारे करीत म्हणाली, "झाले तरी काय? कांहीं नाही, बाई! फार छान चालविलें आहेस तू हे! भलभलती फूस देऊन त्याच्या साऱ्या आयुष्याचे तू मातेरे केलेंस—आणखी काय व्हायचें राहिलें आहे? तुझ्याच पढवणुकीमुळे तो चोरी करायला शिकला! काल त्यानें वसूल करून आणलेले रुपये चोरले!—आणखी दोन दिवस तू असाच सन्मार्गाचा उपदेश सुरू ठेवलास कीं तो दरोडे घालू लागेल—लोकांचीं घरें फोडील! वाः! बाई—फार—फार छान मांडलें आहेस तू!"

अगोदरच प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें हेमांगिनी क्षीण झालेली! त्यांत या विलक्षण व मिथ्या आरोपाची भर पडली! त्याबरोबर तिचा चित्तक्षोभ अनावर झाला. यापूर्वीं दिरासमोर ती फारच क्वचित् भाषण करीत असे. आर्य कुलीनतेला अनुसरून नवीनबाबूसमोर ती अतिशय मर्यादेने वर्तन करी! परंतु आजच्या प्रसंगीं तिला आपला क्रोध आवरता आला नाहीं! ती क्षुब्ध परंतु हलक्या स्वरात म्हणाली, "काय? मीं त्याला चोरी करावयाला शिकविलें?"

कादंबिनी पूर्वीच्या स्वरात यत्किंचित् सुद्धा फरक न करतां स्वच्छंदानें म्हणाली, "तूं शिकविलें किंवा नाहीं ते त्या कार्ट्याला ठाऊक! त्याबद्दल मी काय सांगू? परंतु, यापूर्वीं त्याच्या अंगीं असला एकही वाईट गुण नसता, तो तुझ्या नादीं लागल्यापासूनच असे चाळे करूं लागला, याचा अर्थ काय? वाटेवरच्या वाटसराला

प्रश्न केला, तर तोदेखील, मी म्हणतें तशाच प्रकारचे उत्तर देईल! मी तुला विचारते, त्याच्याशी एवढें एकातात तासचे तास बोलायचे तरी असते काय ग तुला? त्याच्याबद्दल एवढा प्रेमाचा पाझर तुझ्या हृदयाला फुटावा, असे त्याचें आणि तुझें कोणते जिव्हाळ्याचे नाते आहे, तें तरी कळूंदे एकदा आम्हांला!" किती दिवसापासून हृदयात साठवून ठेवलेल्या द्वेषराशीला या भाषणप्रवाहाच्या द्वारें मार्ग मिळाला, ते एक सर्वसाक्षी परमेश्वरालाच ठाऊक!

काहीं कालपर्यंत हेमागिनी हतज्ञान झाल्याप्रमाणे स्तभित होऊन उभी राहिली! अशा निर्लज्ज अपमानाचा निष्ठुर आघात एक व्यक्ति दुसऱ्या व्यक्तीवर करू शकते, ही कल्पनाच मुळी तिच्या बधिर झालेल्या मस्तकात शिरेना! परंतु तिची ही मूढावस्था फार वेळपर्यंत टिकूं शकली नाहीं. लवकरच तिच्या संज्ञाशून्य हृदयात पुन्हा चेतना उत्पन्न झाली! त्याबरोबर, मर्मांतिक आघातामुळें चिडलेल्या वाघिणीप्रमाणे तिची स्थिति होऊन, ती आपल्या भिंतीजवळच्या स्थानाचा त्याग करून कादंबिनीच्या समोर जाऊन उभी राहिली. तिच्या नेत्रातून जणू काय अग्निकणाचा वर्षाव होऊं लागला! वडील दिराची मूर्ती यावेळी तिच्या दृष्टीसमोर प्रत्यक्ष उभी असूनही, त्याचा तिच्या क्रोधपूर्ण चित्तावर काहींच परिणाम होऊं शकला नाही! आपली तीव्र दृष्टि कादबिनीकडे रोखून ती शात परंतु अत्यत कठोर स्वरात म्हणाली, "बाई, तुम्ही एवढया नीच आहात की, तुमच्या बरोबर भाषण करण्याचा देखील मला अगदी तिटकारा वाटतो. तुमचे हृदय इतके पराकाष्ठेचे निर्लज्ज बनले आहे कीं, तुम्ही आहात तशा असूनसुद्धा, हे पोर तुमचा भाऊ आहे, असा याचा परिचय द्यायला तुम्हाला शरम वाटत नाहीं! धिक्कार असो तुम्हाला! कुत्र्यामाजरासारखें क्षुल्लक जनावर घरात बाळगलें असतां, त्यालासुद्धा पोटभर खायला दिल्याखेरीज माणसाच्यानें रहावत नाहीं! परंतु एवढी माणुसकीसुद्धा तुमच्या अगी नाहीं! या एवढयाशा हतभागी पोराकरवी अगदीं उरस्फोड कामे करवूनसुद्धा, आजपर्यंत त्याला एकदादेखील पोट भरून अन्न तुम्ही दिलें नाही! मी नसते, तर कदाचित् यापूर्वी केव्हाच हें पोर पोटाला न मिळल्या कारणानें अन्नान्न करीत तडफडत मेले असते—नव्हे, तुम्ही मारलें असतें!—अशा तुम्ही पाषाणहृदयी, नीच, निर्लज्ज—बेशरम आहात! तो जेव्हां तेव्हा माझ्याकडे येतो, तो प्रेमाच्या गुजगोष्टी बोलत बसावे म्हणून नव्हे, तर आपल्या पोटात भडकलेली क्षुधेची आग शमन करण्याकरिता!"—तिच्यानें पुढें बोलवेना! क्रोधावेशामुळे तिचा कठ दाटून आला!

क्षणभर थांबल्यानंतर कादबिनी म्हणाली, "एकूण, आम्ही त्याच्याकडून मरेमरेपर्यंत कामें करवून घेतों, कांहीं खायला घालीत नाही—तूच त्याला पोटाला घालून पोसतेस, असेंच ना तुझें म्हणणें ?"

हेमांगिनी म्हणाली, "होय. असेंच माझें म्हणणें! आजपर्यंत एक दिवस-सुद्धां तुम्ही दोन्ही सांज त्याला पोटभर खाऊं घातलें नाहीं. उलट वाटेल तसें मारझोड करून छळलें, व त्याच्या शक्तीच्या पलीकडे त्याच्याकडून कामें करवून घेतलीं! असेच माझें म्हणणे! तुमच्या भीतीमुळेंच, मी त्याला वारंवार, माझ्या-कडे येत जाऊं नकोस म्हणून बजावले. परंतु क्षुधेचा तडाखा त्याला सहन करता येईना, आणि मजजवळ त्याला पोट भरून खावयास मिळत; असे, या एकाच कारणामुळे तो पुन्हा पुन्हा माझ्या घरीं येई!—चोरी करण्याबद्दल उपदेश ऐकण्याकरितां नव्हे! परंतु तुमच्या पाषाणहृदयाची कठोरता एवढया पराका-ष्ठेला जाऊन पोहोंचली आहे कीं, दुसरीकडे त्याला पोटभर खावयास मिळतें आहे, हेदेखील तुम्हाला पहावत नाहीं!"

यावर उत्तर कांदबिनीकडून न मिळता नवीनबाबूकडून मिळालें. त्यानें खाटकाचा सुरा दृष्टीसमोर तळपत असलेल्या करुणमूर्ति दीन कोंकराप्रमाणें एकी-कडे उभ्या असलेल्या कृष्णाला खसूकन समोर ओढलें, आणि त्याच्या खिशांत हात घालून केळीच्या द्रोणाची एक पुरचुडी बाहेर काढली! ती हेमागिनीच्या डोळ्या-समोर धरून तो क्रोधपूर्णस्वरात ओरडला, "तूं म्हणतेस, त्याप्रमाणे आम्ही नीच, पाषाणहृदयी कदाचित् असूं! आम्हाला त्याचे बरें झालेलें उघड्या डोळ्यांनीं पाहवत नसेल! परतु ते का, ते तूच आपले डोळे उघडून नीट पहा! तुझ्याच शिकवणीवरून त्यानें माझे रुपये चोरले! तुझा आजार बरा व्हावा या इच्छेने प्रेरित होऊन तो काल कोणच्याशा देवाची पूजा करण्याकरिता गेला होता—आणि हा त्या देवाचा प्रसाद त्यानें तुझ्याकरितां आणला आहे!—घे हा प्रसाद!" असें म्हणून त्यानें द्रोण उघडून आंत असलेला देवीचा प्रसाद व त्यावरची, देवीच्या निर्माल्यातील एक दोन फुले हेमागिनीच्या दृष्टीसमोर धरलीं!

कादबिनी भिंवया वर चढवून म्हणाली, "बाई, बाई! काय तरी बाई या कार्ट्यांचे गुण! दिसायला मेला दिसतो एवढासा, परतु लुच्चेगिरीत कसा पारंगत आहे अगदी! काय तरी धाडस म्हणावें याचं! शर्थ झाली बाई याच्या-पुढें! बरे, बाई, आता तूंच साग पाहूं, यानें कोणत्या उद्देशानें चोरी केली तें?

मीं सांगितलें का त्याला, चोरी कर, असें? माझ्या बऱ्याकरितांच का त्यानें हा एवढा प्रताप गाजविला?"

हेमांगिनी क्रोधानें देहभान विसरली! तिच्या दुर्बल झालेल्या मनाला हा सर्व क्षोभ सहन होईना! ती द्रुतगतीनें कृष्णाच्या जवळ गेली, व फाडकन् त्याच्या गालात एक चपराक लगावून म्हणाली, "हरामखोर, चोरटा! मीं शिकवले तुला चोरी करण्याकरिता? कितीदा सांगितले मीं तुला, तूं माझ्या घरी येत जाऊं नकोस म्हणून? हजार वेळा घरीं आल्यानंतर परत हाकून लावले, तरीसुद्धा निलाजऱ्याला लाज नाही ती नाहींच! इतके सांगितल्यानंतरसुद्धा पुन्हा पुन्हा तूं येत होतास, याचे कारण दुसरे तिसरे काहीं नसून, तू चोरी करण्याच्या उद्देशानेंच येथें येत असावास, असे मला आता खात्रीपूर्वक वाटू लागले आहे!"

हा वेळपर्यंत घरांतील झाडून सारी माणसें त्या ठिकाणी गोळा झाली होती. हेमांगिनीनें उच्चारलेलें शेवटचे वाक्य कानीं येतांच शिवा नावाचा नोकर मध्येच म्हणाला, "मलादेखील असेच वाटते! हे आपल्या घरी येतात, ते चोरी करण्याच्या हेतूनेंच! त्या दिवशीं मी स्वतः आपल्या डोळयानी पाहिले, रात्रीं अंधारांत हे तुमच्या खोलीच्या दाराशी गुपचूप उभे होते. माझी चाहूल लागताच एकदम पळून गेले! तितक्यात मी तेथे आलो नसतो, तर खात्रीनें यानी खोलीत शिरून चोरी केली असती बाईसाहेब!"

शिवाच्या बोलण्याला आधार देण्याच्या हेतूनें गोपाळ म्हणाला, "हो! त्याला ठाऊकच होते, तुम्ही आजारी आहांत—संध्याकाळ झाल्यासरशी तेव्हाच झोंप लागते—झाले! तो असा तसा बदमाष आहे की काय?"

आज हेमांगिनीनें कृष्णाशी केलेले वर्तन पाहून कादंबिनीची मर्जी जशी सुप्रसन्न झाली, तशी गेल्या सोळा वर्षांत कधीही दिसली नव्हती! मनातल्या मनांत अत्यंत संतुष्ट होऊन ती सस्मितमुखानें हेमांगिनीला म्हणाली, "सारेंच मुसळ केरात! तू त्याला तुझ्या घरी येण्याची बंदी केली आहेस, हे आम्हाला तरी कसें बरें कळावे सूनबाई? तो नेहमीं सांगायचा, म्हणे हेमांगिनीताईचे माझ्यावर आईप्रमाणे प्रेम आहे म्हणून! वस्तुस्थिति निराळीच आहे, हे आम्हाला काय बरें ठाऊक? मेल्यानें तीन रुपये चोरले, आणि कुठून तरी ही दोन सडकीं फुले घेऊन आला!" असें म्हणून तिनें पतीच्या हातातून द्रोण हिसकावून घेऊन तो भर्रकन् फेंकून दिला!

घरीं गेल्यानंतर नवीनबाबूनें चोराला शासन करण्यास सुरवात केली! कोण ते निर्दय प्रहार! परंतु कृष्णाच्या मुखावाटे एक शब्द निघेना, कीं नेत्रावाटे अश्रू निघेना! शरीराच्या वाटेल त्या भागावर निर्दयपणानें होणारा प्रत्येक प्रहार तो अगदी मुकाट्यानें सहन करीत होता! ज्याप्रमाणे ओझ्याची गाडी ओढीत असता एखादा बैल चिखलांत रुतून पडला कीं, गाडी हांकणाऱ्याचे प्रहार सहन करतो, त्याचप्रमाणें कृष्णादेखील एक शब्द न बोलतां मार खात होता! उभें राहणे अशक्य झाल्यानंतर तो खालीं कोसळून पडला, तरीसुद्धा वरून होणाऱ्या लाथाबुक्क्यांच्या वर्षावाचा प्रतिकार करण्याचा त्यानें कांहीसुद्धा प्रयत्न केला नाही! शेवटी कादबिनीलाच, "आतां पुरे," असे वाटून तिनें तो प्रकार थाबविला!

हेमागिनी आपल्या खोलीच्या एकूण एक खिडक्यांची दारें लावून घेऊन पाषाणाच्या मूर्तीप्रमाणें स्तब्ध बसून राहिली! कृष्णाच्या मागोमाग उमा कादंबिनीच्या घरी गेली होती, ती परत येऊन म्हणाली, "आई, काकी म्हणत होत्या, कीं कृष्णा मामा मोठा झाल्यानतर मोठा दरोडेखोर होईल म्हणून! तुला देखील वाटते का....................?"

"उमा?"

मातेचा अश्रुविकृत भग्न कठस्वर कानी पडतांच उमा चपापून मध्येंच थांबली. ती म्हणाली, "काय आई?"

"अजूनदेखील ते सारेजण मिळून त्याला मारताहेत का ग? बोलतां बोलतां तिच्या नेत्रांतून अश्रुप्रवाह सुरू झाला! हृदयाची व्यथा अनावर झाल्यामुळें ती अथरुणावर पडली, व उशींत डोके खुपसून रडू लागली! आई रडते आहे असें पाहून उमेलाही रडूं आले. मातेचे अश्रु तिच्याच पदरानें पुसून ती म्हणाली, "नाही! आतां मोलकरीण त्याला बाहेर घेऊन गेली आहे!"

तोंडातून शब्द बाहेर काढण्यापुरती शक्तिसुद्धा हेमांगिनीच्या शरिरांत उरली नव्हती! ती तशीच अथरुणावर पडून राहिली! झालेल्या प्रकारामुळे तिच्या प्रकृतीवर फारच परिणाम घडून आला! सरासरी दोन तीनच्या सुमारास, एकाएकीं सपाटून थडी वाजून तिला जोराचा ताप भरला! पुष्कळ दिवसांनंतर, आज कांही तरी खावे अशी इच्छा तिच्या मनात उत्पन्न झाली होती. परंतु ती इच्छा पूर्ण झाली नाही. सकाळी वाढलेले ताट अजूनदेखील खोलीतच पडलें होतें! त्यांत वाढून ठेवलेलें अन्नदेखील सुकून जाऊं लागलें!

नेहमींप्रमाणें आज देखील विपिन रोजच्या वेळेवर घरीं परत आला. येतांना, मार्गातच कादबिनीच्या तोंडून त्याला सर्व प्रकार कळला—त्याबरोबर तो पत्नीवर फार संतापला ! त्या भरांत घरीं येऊन, पत्नीच्या खोलींत प्रवेश करून तो तिला कांही तरी बोलणार, इतक्यांत उमा त्याच्याजवळ आली, व अगदीं हलक्या स्वरात म्हणाली, " आई तापामुळे बेशुद्ध होऊन पडली आहे ! "

हे वर्तमान समजतांच विपिनचा क्रोध पार कोणीकडच्या कोणीकडे नाहींसा झाला ! तो उत्कंठापूर्ण स्वरात म्हणाला, " म्हणजे ? म्हणतेस तरी काय तू हे ? चार पांच दिवसांपासून तर ताप येणे अजिबात थांबलें होतें,—मग आजच कां बरें पुन्हा ताप आला बुवा ? "

वास्तविक पाहतां विपिनचें हेमांगिनीवर निरतिशय प्रेम होतें. त्या प्रेमाची मर्यादा कुठपर्यंत गेली होती, हे त्याच्याबरोबरच जगालाही तो आपलया भावापासून विभक्त झाला तेव्हांच कळून आलें होतें ! व्याकुळ चित्तानें त्यानें पत्नीच्या खोलींत प्रवेश केला. पाहतो तो हेमांगिनीचे मुख अगदीं सुकून गेले होतें. तिच्या अगावरील वस्त्र, देहभान नष्टप्राय झाल्या कारणामुळे, अस्ताव्यस्त झालें होतें. तिची ती अवस्था पाहताच विपिनच्या उरात धस्स झाले. आजचा प्रकार, त्याच्या कल्पनेपेक्षांही जास्त दिसत होता तो हळूच गेला व पत्नीच्या शेजारीं जाऊन बसला, व तिच्या कपाळाला हात लावून पाहू लागला. त्याचा हस्तस्पर्श होतांच हेमांगिनीनें आपले नेत्र उघडले. ज्वरामुळे ते अगदी लालभडक झाले होते. थोडा वेळपर्यंत पतीच्या मुखाकडे स्थिर दृष्टीनें पाहिल्यानतर, एकाएकीं तिचे नेत्र पाण्यानें भरून आले. त्याचा हात आपल्या हातात घेऊन ती अत्यत काकुळतीनें गद्गद स्वरात म्हणाली, " मी बरें व्हावें, अशी जर आपली इच्छा असेल तर काय वाटेल तें करा, परतु कृष्णाला तेथून आणून आपल्या येथे आश्रय द्या ! त्या-खेरीज मी बरी होणार नाही ! देवीच्या प्रसादाचा अपमान झाला आहे–तो तिला केव्हांही खपणार नाही. कृष्णाला सकटातून काढून आपल्या घरी सुखांत ठेवल्या-नेंच या पापाचें परिमार्जन होणार आहे. तेव्हा माझी एवढीच प्रार्थना आहे, कीं त्याला आश्रय द्या ! "

यावर काय बोलावें, हें विपिनला सुचेना ! ' नाहीं ' म्हणावें, तर अशा स्थितींत हेमांगिनीच्या अंतःकरणाला दुखविणें योग्य नाहीं, असें त्याला खात्रीपूर्वक वाटत होतें. ती बोलत असलेला प्रत्येक शब्द तिचें हृदय पिळवटून बाहेर येत होता !

कृष्णाला कादंबिनीच्या जाचांतून सोडवून आपल्या घरी ठेवावें अशी तिची अत्यंत आतुर इच्छा होती. तेव्हा त्या इच्छेच्या विरुद्ध जाणे रास्त नाहीं, हे विपिनला पटत होतें. परंतु त्याचबरोबर, एकदर सर्व परिस्थितीचा विचार केला असतां, तिच्या म्हणण्याला कबुली देऊन त्याप्रमाणे वागणेदेखील कठिणच आहे, असेंही त्याचे मन त्याला सांगू लागलें. अशी द्विधा स्थिति झाली असता, कोणता तरी एक मार्ग स्वीकारण्यापेक्षा काही न बोलतां स्वस्थ बसणेच बरे, असा पोक्त विचार करून, तिचे सांत्वन करण्याच्या इच्छेने तिच्या मस्तकावरून आपला हात फिरवीत तो काही एक उत्तर न देता तसाच बसून राहिला परंतु हेमांगिनीने, आज या बाबतीत कांहीतरी शेवटची शहानिशा करून घ्यायची असे ठरविले होते. ती थोडीच त्याला स्वस्थ बसू देणार ? किंचित् कालपर्यंत उत्तराची अपेक्षा केल्यानंतर, आपल्या हातात असलेला पतीचा हात किंचित् दाबून तिनें पुन्हा प्रश्न केला,–“ काय ? मग, मी मागते तसे करायचे ना ? ”

यापुढे जास्त वेळ टिकाव धरणे विपिनला अशक्य झालें. पत्नीची ती केविलवाणी मुद्रा, तिच्या हृदयाची ती व्याकुल तळमळ पाहून त्याचेही हृदय द्रवलें. नेत्रातून बाहेर येऊ पाहणारे अश्रु नेत्रातच नाहीसे करून तो आर्द्र स्वरात म्हणाला, “ तुझी जशी इच्छा असेल, त्याप्रमाणेच सर्व गोष्टी घडून येतील! तूं मुळीसुद्धा काळजी करू नकोस! या आजारातून एकदाची लवकर बरी हो, म्हणजे मिळविले!”

पतीचे हे उत्तर ऐकतांच हेमांगिनीला अत्यंत समाधान वाटले. यानंतर कांहीं बोलण्याची आवश्यकता न वाटल्यामुळें ती स्वस्थ मनानें झोपीं जाण्याचा प्रयत्न करूं लागली. काही वेळानंतर विपिनही तेथून निघून गेला.

त्या रात्रींच हेमांगिनीचा ज्वर उतरून प्रातःकाळीं तिला बरीच हुशारी वाटू लागली. हे पाहून विपिनलाही आनंद झाला. प्रातर्विधि आटोपून दुकानावर जाण्याच्या तयारीने तो घराबाहेर पडत आहे, हें पाहताच हेमांगिनी त्याच्या जवळ जाऊन म्हणाली, “ अतिशय मारल्यामुळे कृष्णाला चांगलाच सडकून ताप आला आहे. त्याला आज मी आपल्याजवळ आणून ठेवते! ”

काय असेल तें असो, पत्नीचे वरील वाक्य श्रवण करतांच विपिन मनांतल्या मनात अत्यंत विरक्त होऊन रुष्ट स्वरांत म्हणाला, “ त्याला येथे आणण्याचे काय कारण ? तो आहे तेथेच बरा आहे; राहूदे त्याला त्याच घरीं! ”

पतीचे हे उत्तर ऐकताच हेमागिनी स्तंभितच झाली! तिच्या विनतीला कालच रात्रीं पतीकडून समति मिळाली असता, आता ह्या प्रकारचें उत्तर कां मिळावें, हेंच तिला कळेना! ती आश्चर्यप्रदर्शक स्वरांत म्हणाली, " म्हणजे? त्याला आपल्या घरी आणून ठेवण्याबद्दल काल रात्रींच ना वचन दिलेंत?"

मस्तक हालवीत अवज्ञायुक्त स्वरात विपिन म्हणाला,—" हो—पण तो असा आहे तरी कोण, की त्याच्याकरिता एवढा सर्व खटाटोप सहन करावा? काय सबध त्याचा आणि आपला? तू तरी मला तऱ्हेवाईकच दिसतेस!"

काल रात्री, पत्नीची प्रकृती अत्यंत वाईट आहे असें पाहून, तिला तात्पुरतें समाधान वाटावें या हेतूने विपिनने तिच्या म्हणण्याला आपली समति दर्शविली होती. आज सकाळी तिची प्रकृती ताळ्यावर आलेली पाहताच, आपले खरे मत उघडपणे तिच्या समोर माडण्यात त्याला काही हरकत वाटली नाही. कोपऱ्यांतली छत्री हाती घेऊन, बाहेर जाता जाता तो म्हणाला, " उगाच भलताच वेडेपणा करू नकोस! दादाचा स्वभाव अगोदरच भारी तापट आहे; त्यात पुन्हा असें कांही तरी——"

हेमागिनी शात परतु दृढ स्वरात म्हणाली, " त्याचा स्वभाव वाटेल तसा तापट असला, म्हणून काय झाले? ते त्याचा खून थोडाच करणार आहेत? मी त्याला येथे घेऊन येणार! पाहते या साऱ्या जगांत मला कोण परावृत्त करू शकते ते! कालपर्यंत मला दोनच मुले होती,—कालपासून तीन झाली असेंच मी समजते. मी कृष्णाची आई आहे! पाहते माझे कोण काय करते ते!"

" ठीक आहे. पाहू या, कसे काय होते ते!—" असे बोलून विपिन पुन्हा दाराकडे वळला. परतु इतक्यात हेमागिनी त्याच्या मार्गाला रोध करून त्याला थाबवून म्हणाली, " या घरी त्याला आणू द्यावयाचे नाही, असा आपला दृढ निश्चय झाला आहे का?"

वरील प्रश्नाचे सरळ उत्तर देण्याचे टाळून, विपिन रागीट मुद्रा करून रुष्ट स्वरांत म्हणाला, " चल, चल,—एके बाजूला हो. मला बाहेर जावयाला उशीर होत आहे! उगाच असा वेडेपणा करण्यात अर्थ नाही!" असें म्हणून तो तडक बाहेर निघून गेला.

तो निघून जाताच, हेमागिनीनेंही मनांतल्या मनांत कांहीं तरी निश्चय ठरविला. शिवाला हाक मारून ती म्हणाली, " शिवा, एक गाडी पाहून आण बघूं! मला आज माझ्या माहेरी जायचे आहे!"

आंगणात असलेल्या विपिनच्या कानांवर हे शब्द पडले. तो दुकानाकडे जाण्याचे न थांबविता, मनांतल्या मनांत हंसून म्हणाला, "अस्स! आतां हें शेवटचे ब्रह्मास्त्र वाटते!"

नवीनबाबूच्या घराबाहेरील सोप्याच्या एका बाजूला एका फाटक्या सतरंजीवर कृष्णा पडून राहिला होता. तापामुळे त्याचे सर्वांग फणफणत होते! ठिकठिकाणी मारामुळे उठलेले वळ व हिरवेनिळे डाग स्पष्टपणे दिसत होते. शारीरिक वेदनांबरोबरच हृदयाच्या वेदनाच्या दुःखामुळे आच्छन्नवत् होऊन तो निश्चेष्ट पडला होता! इतक्यात हेमागिनीच्या मुखावाटे उच्चारलेले शब्द त्याच्या कर्णपथावर आदळले,—"कृष्णा!"

हेमागिनी आपल्याला येऊन हांक मारणार, हे जणू काय कृष्णाला पूर्वीपासूनच अवगत असून, तो या प्रसगाकरिता तयारच होता! हाक कानीं येताच, त्यानें आपले आरक्त नेत्र उघडले, व सतरजीवर उठून बसून तो म्हणाला, "कोण, ताई?" बोलता बोलता त्याच्या मुखमडलावर सलज्ज स्मिताची मोहक छटा पसरू लागली! हेमागिनीच्या आगमनामुळें, त्याला त्याच्या शारीरिक व मानसिक व्यथेचा अजीबात विसर पडला! आनदानें त्याचे सर्व हृदय उचंबळून आले! जणू त्याला कोणत्याच प्रकारची पीडा होत नाही, अशा भावाने तो पट्कन उठून उभा राहिला, व सतरजीवरील केर हाताने झाडीत झाडीत हेमागिनीला म्हणाला,—"बसा!"

हेमागिनीचे नेत्र अश्रूनी डबडबले होते. त्याचा हात धरून आपल्याजवळ ओढून प्रेमाने त्याला कुरवाळीत ती म्हणाली, "आता बसायला वेळ कुठे आहे बरे बाळ? चल, ये माझ्याबरोबर! आज मला, माझ्या बाबांकडे नेऊन तुला पोचते केलेच पाहिजे! चल!"

"ठीक आहे,—चला!" असें म्हणून कृष्णाने आपला फाटका सदरा व टोपी चढविली, व जवळच असलेले फाटके धोतर खाद्यावर टाकून, कोंपऱ्यात पडलेली आपली मोडकी वेताची काठी हातात घेऊन तो हेमागिनीबरोबर जाण्याकरिता तयार झाला!

विपीनच्या घरासमोर दोन बैल जोडलेली, प्रवासाच्या तयारीनें सज्ज असलेली एक धमणी उभीच होती. हेमागिनी कोणाशी काहींएक न बोलता कृष्णाला बरोबर घेऊन धमणीत जाऊन बसली. हुकूम होतांच हांकणाऱ्या इसमानेंही

बैलाच्या पाठीवर चाबकाचा फटकारा उडविला ! हेमांगिनीची गाडी चालूं लागली !

गांवाच्या बाहेर कांहीं दूर गेल्यानंतर, मागें सुरू असलेली हांकाहांक कानीं आल्यामुळें गाडी हाकलणाऱ्यानें बैलाचा कासरा आंवरला ! थोड्याच वेळांत ज्याचें सर्व शरीर घामानें डबडबलें आहे, उन्हांतून धावत आल्यामुळे ज्याचें मुख आरक्त झाले आहे, धावतां धावतां दम लागल्यामुळें ज्याच्या मुखावाटे शब्द निघण्याची मारामार पडत आहे, असा विपिन गाडीशेजारी येऊन उपस्थित झाला, व भयचकित स्वरात हेमागिनीला म्हणाला—"हे काय ? तू निघालीस कोणीकडे ? "

हेमांगिनी कृष्णाकडे बोट दाखवून म्हणाली, "याच्या गांवीं !"

" परत केव्हा येणार ?"

गंभीर व दृढ कठस्वरांत हेमागिनीनेंउत्तर दिले, " परमेश्वर जेव्हा परत आणील तेव्हां !"

" म्हणजे ?"

पुन्हा एकदां कृष्णाकडे अगुलीनिर्देश करून हेमागिनी म्हणाली, " कधीं काळीं कुठेंतरी माझ्या मनाप्रमाणें जर याला एखाद्या ठिकाणीं आश्रय मिळाला, तरच मी एकटी पुन्हा घरी परत येईन ! नाहीतर याला बरोबर घेऊनच मला राहिलें पाहिजे !"

हेमांगिनीची मुद्रा व कंठस्वर पाहून विपिनला मागील एका प्रसगाची आठवण झाली. याच्या गांवातील एक गरीब शेतकरी काहीं कर्जासंबंधानें विपिनच्या तावडींत सांपडला होता. कायद्याच्या दृष्टीने त्या शेतकऱ्याची शेतजमीन वगैरे सर्व जप्त करून त्याला रस्त्यावरचा भणग बनवून मोडणे अगदीं रास्त व शक्य होतें. परंतु विपिनच्या या इच्छेच्या आड हेमागिनीची मोठी धोंड उभी राहिल्यामुळें, त्याचा ह्या बाबतींत अगदींच नाइलाज होऊन त्याला त्या जमिनीचा नाद सोडून देणें भाग पडलें होतें ! आज, विपिनला त्या प्रसंगींच्या हेमांगिनीची पुन्हा स्मृति झाली ! आरक्त नेत्र दाखवून थोडेंसें गुरकावतांच नम्रपणें पाय चाटूं लागणाऱ्या साधारण स्त्रीप्रमाणे हेमागिनी नाहीं, हे त्याला एका क्षणार्धातच चागले पटलें. तो नम्र स्वरांत तिला म्हणाला , " बरें. आतां झाल्या प्रकाराबद्दल मला तूं क्षमा कर ! त्याबद्दल मनात काहीं न ठेवतां परत घरीं चल !"

पूर्वीच्या भावांत किंचित्‌ही फरक होऊ न देतां, हेमांगिनी हात जोडून याला म्हणाली, “ असले भलतेच शब्द मुखावाटे काढून मला पापपंकांत लोटू ये ! आपणच मला क्षमा करावयाला पाहिजे ! परंतु माझे कार्य माझ्या इच्छे-माणें तडीस गेल्याशिवाय मला घरीं परत येता येणार नाहीं, ह्याबद्दल माझा ाइलाज आहे ! ”

विपिननें किंचित् कालपर्यंत पत्नीच्या त्या शांत, गंभीर, दृढनिश्चयी मुखचर्ये-कडे पाहिलें, व गाडीच्या आत वांकून कृष्णाचा डावा हात आपल्या हातांत घेऊन हणाला, “ कृष्णा, आतां तूच आपल्या ताईची समजूत घाल, व तिला परत घरी ेऊन ये !—मी वाटल्यास येथे शपथेवर सागतों—माझ्या जिवात जीव असे ोंपर्यंत तुम्हा उभयता बहिणभावामध्ये कोणीही विच्छेद घडवून आणूं शकणार ाही ! चल बाबा, चल तुझ्या ताईला घेऊन परत घरी ! ”

# प्रपंचकथा

## ( द्वितीय खंड. )



### “ गर्व-निर्वाण ”

सूर्यास्त होऊन थोडाच काळ लोटला होता. पृथ्वीतलावर अंधकाराची अंधुक छाया पसरू लागली होती. अशा वेळीं इन्दुमतीनें आपल्या पतीच्या खोलींत प्रवेश केला. तिच्या वेशभूषेवरून, ती कोठे तरी बाहेर जाण्याच्या तयारीनें सिद्ध झाली असावी, असें दिसत होते. टेबलाशीं उभे राहून तिनें प्रश्न केला, ‘ कशाचे वाचन चालले आहे ? ’

नरेन्द्राच्या हातांत एका मासिकाचा अंक असून, तो वाचनात अगदीं गढून गेला होता. पत्नीचे शब्द कानीं पडतांच पुस्तकावरून त्यानें आपली दृष्टि काढली. क्षणभर पत्नीच्या मुखाकडे स्थिर दृष्टीने पाहिल्यानंतर त्याने मासिकाचा अंक तिच्या हातीं दिला.

इन्दूनें अंक हातीं घेऊन नरेन्द्र वाचीत असलेल्या पृष्ठाकडे आपली दृष्टि वळविली. भ्रू-धनुष्य किंचित् जास्त वाकवून विस्मयप्रदर्शक स्वरात ती म्हणाली, “ अस्स ! ही कविता प्रसिद्ध झाली वाटते ? चांगले आहे, कविता रचीत बसणें विशेषसें वाईट नाहीं. अगदीच निरुद्योगीपणात काळ घालविण्यापेक्षा हा उद्योग करीत बसणे वावगें नाहीं ! म्हणतात ना, ‘ स्वस्थ बसण्यापेक्षां बिगार बरी ! ’ त्यातलेंच हें ! पाहूं दे, कोणत्या मासिकात प्रसिद्ध केली आहे ती ! काय ? “ सरस्वती ? ” “ स्वप्रकाश”कारानी घेतली नाही वाटते ? ”

नरेन्द्राची शांत दृष्टि व्यथेमुळे म्लान झाली.

इन्दूनें पुन्हा प्रश्न विचारला, “ ‘ स्वप्रकाशा’ने कविता परत पाठविली ? ”

नरेन्द्राने शुष्क स्वरात हळूच उत्तर दिले, “ तेथे पाठविलीच नाहीं ! ”

“ का बरे ? एकवार पाठवून पहायचें तरी होते ! ‘ स्वप्रकाश ’ म्हणजे ‘ सरस्वती ’ नाही ! उच्च प्रतीच्या वाङ्मयाची मार्मिक परीक्षा करण्याची योग्यता फक्त ‘ स्वप्रकाशा’च्याच अंगी आहे आणि म्हणूनच मी त्याव्यतिरिक्त इतर

मासिके मुळीच वाचीत नाहीं ! " यानतर काहीं काळपर्यंत इंदू स्वस्थ उभी होती. थोड्याच वेळांत, किंचित् हसून ती पुन्हा म्हणाली, " बरं ! स्वत· लिहिलेल्या कविता स्वतःच अगदीं अत करणपूर्वक वाटेल तेवढा वेळपर्यंत वाचीत बसावयाला माझी काही हरकत नाही. पण आज आहे शनिवार. आजच मला, वन्सना त्यांच्या घरून आपल्याबरोबर घेऊन सिनेमा पहावयाला जायचे आहे. कमल घरात एकटीच झोपी गेली आहे. थोडे लक्ष असू द्यावें ! नाहीतर काव्याच्या भराऱ्या मारणे सुरू असताना सर्व सृष्टीबरोबर तिचाही विसर पडायचा ! जाते मी ! "

नरेन्द्रानें अंक मिटून टेबलावर ठेवीत म्हटले, " जा."

इन्दू खोलीच्या बाहेर पडली. परंतु इतक्यात पतीच्या गभीर निश्वासाचा ध्वनि तिच्या कानी आला. त्याबरोबर तिचे पाऊल थबकले. ती लगेच परत आली व पतीसमोर उभी राहून म्हणाली, " जेव्हा पहावे, तेव्हा असेच. कोणतीही गोष्ट मी आपल्या इच्छेप्रमाणे करावयाला गेले, की आपले हे असे निश्वास ठेवलेले ! ह्याचे कारण तरी एकदा कळू द्यावे, म्हणते मी ! असे कोणते दु ख, व्यथा देत आहे ते एकदां कळलें, म्हणजे बाबाना पत्र लिहून त्याचा काही उपाय तरी करता येईल मला ! "

नरेन्द्र काही न बोलता तिच्या मुखाकडे पहात होता. त्याच्या अत·करणात कांही तरी खळबळ चालली असून ती मुखावाटे व्यक्त करावी अशी त्याची इच्छा असावी असें त्याच्या मुद्रेवरून व्यक्त होत होते ! परंतु बराच वेळ झाला तरी त्याच्या तोंडातून एक शब्दही बाहेर येईना ! पत्नीला काही उत्तर न देतां त्यानें आपली मान खाली घातली !

नरेन्द्राची मामेबहिण विमला ही इन्दूची बालमैत्रीण होती. हिचे सासर याच गावीं असून, नरेन्द्राच्या घरापासून जवळच ती राहत असे. तिचे घर येताच इन्दूची गाडी उभी राहिली. इन्दू खालीं उतरली, व तिने त्वरितगतीनें विमलेच्या खोलीत प्रवेश केला. सिनेमा सुरू होण्यास फारसा विलब नसल्यामुळें इन्दू विशेष घाईंत होती ! विमलेकडे दृष्टि जातांच ती कांहीशा विस्मित आणि विरक्त स्वरात म्हणाली, " हे हो काय वन्स ?—अजूनपावेतो तुम्ही आपले लुगडेदेखील बदलले नाहीं ! किती बर उशीर हा !—तुम्हाला माझा निरोप कळला नाहीं कीं काय ? "

विमला सलज्ज हास्य हांसून शातपणें म्हणाली, " तुमचा निरोप कसा बरें कळणार नाहीं मला, वहिनी ? पण, आज बाई थोडासा उशीरच होईल आपल्याला निघायला. इतक्यात कुठे थोडें बाहेर फिरायला जायचे झालें आहे;—परत यायला फारसा उशीर लागायचा नाहीं म्हणा! परतु त्यापूर्वी आपल्याला कसें बरें जातां येईल ? "

इन्दूला विमलचा फार राग आला. परंतु तिनें तो उघडपणे प्रगट केला नाहीं. तिला टोमणा मारण्याच्या हेतूनें तिने खोचून प्रश्न केला, " प्रभूची आज्ञा मिळाली नाहीं वाटतं अजून ? "

विमलेच्या सुदर मुखावर स्निग्ध मधुर हास्याची छटा पसरल्यामुळे तें जास्तच सुदर दिसू लागले. त्या मुखमंडलावर विलसणाऱ्या हास्याच्या लहरींनीं तिच्या हृदयप्रदेशावर सुद्धा अमल बसविला. तिला दुःख व्हावे या हेतूने इन्दूने विचारलेल्या प्रश्नामुळे तिला वाईट न वाटता उलट अत्यत आनद झाला असावा असे दिसले. तिने हसत हसत उत्तर केले, " तस नव्हे. अजूनपर्यंत दासीचा अर्जच मुळी पेश झालेला नाही! अर्ज सादर केल्यानतर नामजूर होणार नाहीं त्याबद्दल खात्री आहे म्हणा! "

आपला विषदग्ध बाण फुकट गेला, एवढेंच नव्हे, तर त्याचा परिणाम आपल्या इच्छेच्या अगदीं उलट झाला, हे पाहून इन्दू जास्तच विरक्त झाली! ती रुष्ट स्वरातच म्हणाली, " मग अर्ज पेश करायला एवढा उशीर कां ? तुमच्याकडे निरोप तर मी केव्हाच रवाना केला होता! "

" त्या वेळीं परवानगी विचारायचें धैर्यच मला झाले नाहीं बाई, वहिनी! ऑफिसमधून परत येताच सांगायचें झाले डोके दुखतें आहे म्हणून! मग बाई कशी बरं भलतीच गोष्ट काढायची त्या वेळीं ? मी विचार केला, की फराळ वगैरे आटोपून चित्ताला थोडीशी स्थिरता आली म्हणजे मग हळूच गोष्ट काढावी. पण तुम्ही तरी एवढी घाई कां बरे करता ? अजून खेळ सुरू व्हायला किती तरी वेळ आहे! बसा ना थोडा वेळ ? परत यायला आता फारसा विलंब नाही! "

" तुम्हाला काय म्हणावें, हेच मला समजत नाहीं बाई, वन्सं! माझ्याकडून असा हलगर्जीपणा झाला असता, तर लाजेनें मला अगदीं मेल्यासारखे झालें असतें. पण तुम्हाला त्याबद्दल काहीं सुद्धा वाटत नाही. उलट तुम्ही आपल्या आनंदानें हंसत आहात! बरें, घरांत मोलकरिणीला किंवा नोकराला सांगून ठेवून गेलं, तर नाहीं का चालण्यासारखें ?"

विमला भयभीत होऊन म्हणाली, " म्हणजे? तसे केले, तर घरांत पुन्हां पाऊल टेवू देणार नाहीत मला! साऱ्या जन्मांत पुन्हा तोंड देखील दाखवायला जागा राहणार नाहीं!"

हे ऐकून इन्दू आश्चर्याने स्तंभित झाल्यासारखी दिसली. तिच्या मताप्रमाणें पाहता, जी गोष्ट अपराध म्हणून सुद्धा गणली जाणे शक्य नव्हतें, अशा एका क्षुल्लक बाबीवरून साऱ्या जन्माचे मातेरे होण्याचा प्रसग ओढवेल, असें विमलेला वाटते तरी कसें, हेच तिला कळेना! ती क्रोधपूर्ण स्वरात म्हणाली, " पुन्हां घरात पाऊल टेवू देणार नाहीत? काय म्हणून? कोणत्या कायद्याप्रमाणे? तसे करण्याचा त्याना काय अधिकार आहे?"

विमलने नितात सहजभावाने उत्तर दिलें, " का बरें? पती म्हणजे स्त्रीचा स्वामी! त्यानी वाटेल ते केले, तरी तो त्याचा अधिकार आहे! त्याबद्दल त्याना कोण दोष देऊ शकेल? आपल्या इच्छेबरहुकूम पत्नीशी वागत असलेल्या पतीला, तो करीत असलेल्या जुलमापासून कोण परावृत्त करूं शकेल? "

" जुलमी पतीला ताळ्यावर आणण्याचा अधिकार राजाला आहे--तो अधिकार कायद्याला आहे! पण ते मेल एक असो! मी तुम्हाला अस विचारते वन्स, कीं, स्वत च्या तोडाने स्वत.ला 'दासी' म्हणवून घेण्यात तुम्हाला थोडासुद्धा कमीपणा वाटत नाही कसा? पती म्हणजे मोगल बादशहा, अशी का तुमची समजूत आहे? आणि स्त्री म्हणजे त्याने विकत घेतलेली गुलाम--दासी? आपल्याच मुखाने स्त्रीला एवढ्या हीन तुच्छ पदवीवर नेऊन बसविण्यांत तुम्हाला गौरव का वाटतो? "

इन्दूच्या जिवाचा अगदी सताप झाला होता. परतु ते पाहून विमलला फार आनद वाटत होता. ती आपली शातवृत्ति किंचित्ही ढळू न देता हास्यमुखानें म्हणाली, " मी आहे बाई आपली मूर्ख आणि वेडगळ! मला तिकडच्या चरणाची दासी म्हणवून घेण्यातच धन्यता वाटते! पण माझी एक गोष्ट राहू द्या एकीकडे! मी तुम्हालाच असे विचारते, की आता तुम्ही ज्या येथे आला, तें दादाची परवानगी घेतल्यावाचूनच का?"

" परवानगी? आणि ती काय म्हणून घ्यायची! याकरितां परवानगी विचारायाची आवश्यकता काय, तेच मला समजत नाहीं. पुरुषाना स्वतःच्या इच्छेप्रमाणें वर्तन करतां येते; त्याना आपल्या स्त्रीची अनुज्ञा घेण्याचे काहींच कारण नसते!

मग स्त्रीने तरी या जुलमाच्या जोखडाखालीं मान काय म्हणून वाकवायची? त्यांना बाहेर जायचें असलें, म्हणजे ते माझ्या अनुमतीची अपेक्षा करतात का? 'मी अमुक ठिकाणीं जातों.' एवढे कानावर घातलें कीं संपलें! त्याचप्रमाणें मी सुद्धा, आज 'मी सिनेमा पहावयाला जात आहें,' असें त्यांना कळवून निघून आलें!" यानंतर किंचित् काळपर्यंत निस्तब्ध राहून इन्दुमती पुन्हा काहींशा उद्दीपित स्वरांत म्हणाली "आतां, एवढें? खरें आहे, कीं तिकडच्याप्रमाणे शांत स्वभाव फारच क्वचित् आढळतो! माझ्याप्रमाणे भाग्यशाली स्त्रिया फारच थोड्या सापडतील! माझ्या कोणत्याही इच्छेच्या आड सहसा येणें होत नाहीं! परंतु माझ्या दुर्दैवानें अशा ठिकाणी न पडता, जर एखाद्या अत्यंत अविवेकी बुद्धीच्या हट्टी पतीशी माझी जन्माची गांठ पडली असती, तरी देखील मीं आपला आत्मसम्मान केव्हाही कमी होऊं दिला नसता! तुमच्याप्रमाणे मी आपल्या हक्काचा विसर स्वतःला केव्हाही पडूं दिला नसता! वन्स, स्त्री म्हणजे पतीच्या हातांत हात घालून त्याच्याबरोबर संसारयात्रा पार पाडणारी पतीची सहचारिणी,–सहधर्मचारिणी! ती पतीनें विकत घेतलेली दासी नव्हे! या गोष्टीचा विसर पडल्याकारणानेंच आपल्या देशांतील स्त्रीजात आज एवढ्या निकृष्ट अवस्थेला येऊन ठेपली आहे! पतीच्या चरणीं लोळण घेणाऱ्या आपल्या स्त्रीजातीची आज अगदी तुच्छ अशा खेळांतील बाहुलीपेक्षा जास्त किंमत नाहीं! स्वतःचा सम्मान स्वतः राखण्याचा प्रयत्न केला नाही, तर दुसरे तुम्हाला कवडीकिंमतीला सुद्धां विचारणार नाहीत! आणि मी असें विचारतें, की आत्मसम्मानाचा इतका विसर पडलेल्या आपल्या स्त्रीसमाजाला पुरुषवर्गानें त्यांना योग्य असा मान द्यावा तरी कां? तिकडचा स्वभाव अगदी देवासारखा; पण तरीसुद्धा, ते म्हणजे माझे स्वामी, व मी स्त्री म्हणूनच त्यांची दासी, हा विचार कधीसुद्धा त्यांच्या हृदयांत प्रवेश करू द्यावयाला मी अवकाश देत नाही! माझा देह स्त्रीचा असला, तरी त्यांत सुद्धां परमेश्वराचें अधिष्ठान आहे ह्या गोष्टीचा मला कधींही विसर पडत नाहीं—व त्यांना देखील मी याचा विसर पडूं देत नाही!"

हा सर्व भडिमार विमला मुकाट्यानें ऐकून घेत होती. काही वेळानंतर तिनें एक लहानसा निःश्वास सोडला. परंतु त्यावरून तिला आपल्या वर्तनाबद्दल लज्जा वाटली असावी, असें मुळीसुद्धा दिसले नाहीं! ती पूर्ववत् शांत स्वरांत म्हणाली, "मला तुमच्या भाषणाचा अर्थच कळत नाहीं बाई, वहिनी! पत्नीने पतीकडून

जबरदस्तीनें आत्मसंभ्रम वसूल करावयाचा म्हणजे काय, हें मला समजत नाहीं! मला फक्त एवढें समजतें, कीं पती हा स्त्रीचा देव. त्याच्याशिवाय स्त्रीला अन्य गति नाहीं! त्याच्या चरणीं आत्मविसर्जन करण्यातच स्त्रीचा खरा मान आहे! पण यायच झालं वाटतं परत,—थांबा ह वहिनी, ही मी आलेंच परवानगी विचारून इतक्यात!" असें म्हणून विमलनें द्रुतगतीनें प्रस्थान केलें. तिच्या मुखावर मदस्मिताची मधुर आभा झळकत होती!

तें मंद स्मित इंदूच्याही दृष्टीस पडलें! परतु त्यामुळें तिच्या अतःकरणांत आनंदाचा उद्भव होण्याऐवजी, तिचें सर्वांग क्रोधानें जळफळू लागलें!

* * * *

सिनेमा पाहून परत येत असता, त्या उभयता स्त्रिया आपआपल्या विचार-मालिकेत पूर्णपणें गुरफटून गेल्या असाव्या असे दिसत होतें. कोणीही एकमे-कीशी मुळीमुद्धां संभाषण न करता, मुकाट्यानें गाडींत बसून होत्या. एकाएकीं त्या शाततेचा भग करून इन्दू म्हणाली, "वन्स, परवानगी मिळाली नसती, तर तुम्हाला माझ्या बरोबर येता आले नसते, नाही का?"

विमला बाहेर पहात अन्यमनस्कभावाने न जाणें कशाच्या चिंतनांत गढून गेली होती, इन्दुमतीचा प्रश्न कानी येताच तिने हळूच उत्तर दिले, "अहं!"

"म्हणूनच, मला वाटतें वन्सं मी जेव्हांतेव्हा येऊन तुम्हाला अशी पकडून घेऊन जाते. यामुळें, कदाचित् तुमच्या घरातील मडळीला—विशेषतः तुमच्या यजमानाना फार राग येत असेल, नाहीं का?"

तिच्याकडे मुख वळवून विमला म्हणाली, "तसें असतें, तर मी स्वतःच तुमच्याबरोबर कशाला आलें असतें? परतु मलाच उलट अशी भीती वाटते, की तुम्ही वारवार अशा माझ्याकडे येतां, त्यामुळे दादा तर मनांतल्या मनांत माझ्यावर रागावत नसेल ना?"

इन्दू साभिमानपणें म्हणाली, "तुमच्या दादांचा स्वभाव तसा नाहीं! आपल्या अधिकारकक्षेच्या बाहेर ते कधींच पाऊल ठेवीत नाहींत! त्याखेरीज, माझ्या-मुळें कोणाबद्दल त्याच्या मनात विरक्ति उत्पन्न होईल, अशी स्पर्धा स्वप्नांत मुद्धां त्यांना स्पर्श करूं शकत नाहीं, त्याबद्दल माझी पूर्ण खात्री आहे!"

यावर विमला सरासरीं दोन मिनिटेपर्यंत काहीं बोलली नाहीं. त्यानतर एक गंभीर निःश्वास टाकून, मृदुस्वरांत ती म्हणाली, "वहिनी, दादाचे तुमच्यावर

किती जिवापाड प्रेम आहे! परंतु मला वाटतें, तुम्ही...........! " तिच्या मुखावाटे बाहेर पडणारा प्रत्येक शब्द, तिच्या हृदयाच्या खोल—अत्यंत खोल अशा अतर्भागांतून निघत असावा, असें दिसत होते!

या उभयतां मैत्रिणींच्या आजच्या भेटींत, आतां कोठें पहिल्यादाच इन्दूच्या ओष्ठावर हास्याची लकेर चमकली. ती म्हणाली, "तुमच्या दादाबद्दल जें तुम्ही सांगता, तें मी नाकबूल करीत नाहीं. परंतु हें बोलल्यानंतर, माझ्या-सबधानें तुम्ही अर्धवट बोलून जी शका प्रगट केली, ती काय म्हणून? तुमच्या अतःकरणातील गोष्ट काय आहे, ती मला सागायची नाहीं का?"

"दादाबद्दल, तुमच्या हृदयांत वसत असलेल्या प्रेमांत सदेह-जनक असे काय आहे, तें मला सागतां येत नाही. तरी माझ्या मनाला आपले असें वाटते, कीं.................!"

"तसे का वाटते, ह्याचे कारण तुमचे तुम्हाला जरी स्पष्टपणे कळत नसलें, तरी ते मला कळलें आहे! पति-प्रेमासबधीच्या तुमच्या कल्पनेपेक्षा माझी कल्पना फार निराळी आहे, हेंच ते कारण! तुमच्याप्रमाणे, पतीच्या चरण-धूळींत निरतर लोळत पडण्यातच स्त्री-प्रेमाची खरी सार्थकता आहे, असे मला वाटत नाही, म्हणून तुम्हाला माझ्या पति-प्रेमाबद्दल सदेह वाटतो! वन्स, स्त्रीच्या आत्मसम्मानाच्या ज्या माझ्या कल्पना आहेत, त्या मागें टाकून माझ्या प्रेमानें वर डोके उचलू नये अशीच माझी परमेश्वराजवळ प्रार्थना आहे! माझ्या स्वाधीनसत्तेचे, माझ्या समान हक्काचें उल्लघन करणाऱ्या प्रेमाबद्दल माझ्या अतः-करणात नेहमी आत्यतिक घृणाच वास करीत राहील!"

विमलेच्या शरीरावर थरारून रोमांच उभे राहिले; परंतु हें इन्दूच्या ध्यानांत आले नाहीं!

कांही वेळपर्यंत स्तब्ध राहून विमलेकडून उत्तर मिळण्याची अपेक्षा केल्या-नतर इन्दू पुन्हा म्हणाली, "तुम्ही काहीच बोलत नाही, वन्स! कशाबद्दल विचार चालला आहे एवढा?"

"काही नाही. परमेश्वराजवळ प्रार्थना करीत होते की, दादाचें तुमच्यावर आहे तसेंच प्रेम अव्याहत टिको म्हणजे झालें! कारण, तुम्ही वाटेल तें म्हणालां, तरी माझी अशी दृढ समजूत आहे की, स्त्रीच्या दृष्टीनें पाहिले असतां, तिच्या पतीच्या प्रेमापुढे तिला अखिल विश्व—ब्रम्हांडसुद्धां कवडीमोल असतें!"

मुहूर्तकालपर्यंत मौन धारण केल्यानंतर विमला पुन्हा बोलूं लागली, " तुमचा आत्मसम्मान, आणि समान हक्क म्हणजे काय, हेंच मुळीं मला कळत नाहीं ! मी तर त्याच्या चरणीं माझ्या सर्वस्वाचें दान करूनच स्वर्गसुखाची जोड करून घेतली आहे ! ह्याव्यतिरिक्त स्त्रीला सुखाचा अन्य मार्ग आहे असें मला वाटतच नाहीं ! मी तुम्हाला अगदीं सत्य तेंच सागतें वहिनी, माझ्या बाबतींत तर मला माझी अशी इच्छाच उरली नाही ! त्याची इच्छा तीच माझी इच्छा, त्याच्या सेवेंतच माझे अखिल समाधान...........! "

" बस्स !—पुरे करा ! पुरे करा ! "

हे शब्द कानीं येताच विमला दचकून गप्प बसली ! इन्दूच्या कंठस्वरांत तिरस्कार अगदीं पूर्णपणे भरला होता. ती उद्दीपित भावानें विमलेकडे वळून, घृणापूर्ण स्वरात म्हणाली, "आपल्या समाजातील स्त्रीवर्गासबधाने तुमची कल्पना तरी काय आहे, वन्स ? आपल्या स्त्रिया म्हणजे मातीच्या किंवा मेणाच्या बाहुल्या आहेत, असे का तुम्हाला वाटते ? त्यांना प्राण नाही, आत्मा नाहीं—काहीं नाही ! आईबाप सांगतील त्या पुरुषाच्या सहवासांत राहून, त्याच्या मर्जीला येईल त्याप्रमाणे त्याच्या ससाराचा खेळ रगवायचा—त्याची इच्छा असेल त्याप्रमाणे वर्तन ठेवायचे ! ज्या त्या बाबतीत त्याची इच्छा म्हणजे परमेश्वराची आज्ञा समजून तिच्याप्रमाणें वागावयाचे ! हेंच तुमच्या मताप्रमाणें स्त्री-जीवनातील सर्वस्व ! मी तुम्हाला असें विचारते कीं, एवढें सर्व सहन केल्यानतरही स्त्रीला कोणत्या सुखाचा लाभ होतो ? तुमच्या मताप्रमाणें आदर्श स्त्रीला, माझ्यावर माझ्या पतीचे आहे त्यापेक्षा जास्त प्रेम, तिच्या पतीकडून मिळविता येईल का ? वन्स, प्रेमाचे माप घेण्यास योग्य असें एखादें यत्र अस्तित्वात नाही;—नाहीं तर तुम्हाला प्रत्यक्ष दाखविले असतें—जाऊं द्या ती गोष्ट;—परतु माझें दैव असें फळाला येण्याचे मूळ कारण काय ते आले का लक्षांत ? तें हेंच, कीं, मी स्वतःला तुमच्याप्रमाणे अगदीं तुच्छ लेखीत नाही ! तुमची ती कंगाल वृत्ति मी मस्तकावर धारण करून वर्तन करीत नाहीं ! तुम्हाला काय सागू वन्स, पुष्कळ वेळा, मला तिकडच्या शांत, निस्पृह स्वभावाचा फार, फार राग येतो ! का बरे ते प्रत्येक बाबतींत माझ्या इच्छेप्रमाणेंच वागतात ? एखादे वेळीं तरी त्यांनीं माझ्या मनाविरुद्ध वर्तन करावयाचें असतें, म्हणजे मग मला हें स्पष्टपणें दाखविण्याची संधि मिळाली असती, की त्यांना क्षुल्लक वाटणारा जीवसुद्धां मनुष्यकोटींतीलच असतो ! पुरुषाप्रमाणे स्त्रीला सुद्धां, आवडनिवड, रागअनुराग,

प्रेम, तिरस्कार, इत्यादि मनोविकार असतात! त्यांच्याप्रमाणें तिलाही अंतःकरण असतें, हृदय असतें, इच्छाशक्ति असते! तिला देखील पतिप्रेमाची जोड करण्याकरितां आत्ममर्यादा सोडतां येणे शक्य नाही!—पण हें काय? तोंड फिरवून तुम्ही हंसता आहा काय म्हणून अशा?"

अत्यत प्रयासानें हसू आवरून विमला म्हणाली, "कुठें? मी हंसत नव्हतें!"

"नाही कसे? अजूनसुद्धा तुमच्या ओठावर हास्य दिसत आहे! काय झालें तुम्हाला एवढें हसू यायला?" इन्दू म्हणाली.

यापुढे आपले मनोविकार इन्दूपासून लपवून ठेवण्याचें विमलला कांहीच प्रयोजन वाटले नाही! ती मोकळेपणानें हंसत म्हणाली, "वहिनी, मला बाई तुमच्या बोलण्याचें भारीच हसू येते! अहो, अशा गोष्टी बोलणे आपल्या बायकाच्या जातीला बरे तरी दिसते का? तुमचे नशीब थोर, म्हणून तुम्हाला माझ्या दादासारखा देवपुरुष लाभला! त्याच्या पदरी पडला आहात, म्हणून ह्या एवढया गोष्टी सुचताहेत!—"

इन्दूनें क्रुद्धस्वरात, आतुरतेने मध्येच जिज्ञासा केली, "नाही तर?—काय झालें असते?"

"नाहीं तर तुम्ही असे कधी बोलता ना!"

"ही तुमची चूक आहे! वन्स, मी तुम्हाला पुन्हा सांगते, की ही तुमची चूक आहे! सर्वच स्त्रिया तुम्हासारख्या नाहीत, हे तुम्ही विसरता! भिक्षापात्राचे अवलंबन करण्यात प्रत्येकाला भूषण वाटते अशी तुमची समजूत असेल, तर वन्स, ती तुमची चूक आहे! आत्मगौरव म्हणजे काय याचे ज्ञान असणाऱ्या स्त्रियासुद्धा ससारात आहेत!"

इन्दूचे भाषण चालू असताना विमलेच्या मुखावरील हास्यछटा हळू हळू नाहीशी होऊ लागली. शेवटी ती गभीरभाव धारण करून शुष्कस्वरात म्हणाली, "नाही, तुम्ही म्हणता तें मी विसरले नाही!"

"खात्रीनेच तुम्हाला त्याचा विसर पडला आहे." इन्दू पूर्ववत् दीप्त स्वरात म्हणाली. "नाही तर तुम्ही तसें कधींच बोलला नसता! यापुढें चागलें ध्यानात असू द्या, की ज्याना भिकारी जिण्याबद्दल तिरस्कार वाटत असून स्वकष्टार्जित मिळकतीवर जगणेच श्रेयस्कर वाटते, अशा मनोवृत्तीची माणसेंसुद्धा जगात असूं शकतात!"

विमला व्यथित भावानें म्हणाली, "पुरे झाल्या आतां या गोष्टी, बाई वहिनी! —हे पहा आमचे घर आलेंच! या, थोडा वेळ बसा नि मग जा!"

"नको आता. मला देखील घरीं जायचें आहे!" असें म्हणून तिनें कोच-मॅनला गाडी पुढे हाकण्याबद्दल हुकूम केला!

"बरें आहे तर मग. येतें मी! मी विचारीत होतें असे दादाला सांगा!"

"बरे आहे!"

[ २ ]

"माझ्याजवळचे सारे पैसे संपले. घरखर्चाकरता आणखी रुपये पाहिजेत!"

पत्नीची ही मागणी ऐकून नरेन्द्राला बरेच आश्चर्य वाटलें. तो इन्दूकडे वळून विस्मयव्यंजक स्वरात म्हणाला, "म्हणजे? इतक्यात दोनशे रुपये संपले?"

"नाही तर काय? मी खोटे का सागते आहे? कीं लपवून ठेवले आहेत मीं रुपये?" कपाळावर आठ्या चढवून इन्दू रुष्टस्वरात म्हणाली.

अधिक द्रव्याबद्दल ही मागणी ऐकून नरेन्द्राच्या हृदयात भयानें धडकी भरली! आणखी द्रव्य आणावयाचें कोठून? इन्दूला रुपये द्यायचे कसे? असे विचार त्याच्या अंतःकरणात उत्पन्न होत असता, त्याची छाया त्याच्या मुखप्रदेशावरही दिसत होती! त्याच्या मुद्रेवर होणारे विकार इन्दूच्या दृष्टोत्पत्तीस आल्याखेरीज राहिले नाहीत. परंतु तिनें त्याचा अगदी भलताच अर्थ केला! नरेन्द्राने आपल्या जवळ खर्चासाठी दिलेले दोनशे रुपये संपले, ह्या आपल्या सांगण्यावर त्याचा विश्वास बसत नाही, असे तिला वाटले! ती रुष्टस्वरात नरेन्द्राला म्हणाली, "माझ्या बोलण्यावर विश्वास बसत नसेल, तर आजपासून मला एक वही करून द्यावी, तींत सारा हिशेब टिपून ठेवीत जाईन!—पण तसें तरी कशाला हवे! पैसे मला देऊंच नये मुळी! जो काही खर्च करावयाचा असेल, तो सर्व आपल्याच हाताने होऊं द्यावा!—म्हणजे पैसे चोरीला जाण्याचे भयही राहणार नाहीं, आणि संशयी दृष्टीपासून माझेही रक्षण होईल!" असें बोलून तिनें एकदा भेदकदृष्टीने नरेन्द्राकडे पाहिले! त्याच्या मुखावरील गाढ छाया आंतरिक वेदनेमुळे गाढतर झाली!

नरेन्द्र मंद स्वरात म्हणाला, "तुझ्यावर माझा अविश्वास नाहीं, असें मी कधीं बोललों?—परंतु—!"

"परंतु काय? विश्वास आहे असेंही नाहीं, हेंच ना? ठीक आहे. आठवेल तेवढा हिशेब लिहून आणून देते! अहाहा!—किती सुखाचा माझा हा संसार!"

क्रोधयुक्त स्वरांत असें बोलून, ती रागानें पाय आपटीत खोलीच्या बाहेर निघून गेली. परंतु दुसऱ्या क्षणींच पुन्हा परत येऊन म्हणाली, " पण हिशेब द्यायचा तरी काय म्हणून ?–मीं पैसे संपले म्हणून खोटे सागितलें नाहीं ! माझ्या मामेबहिणीचे लग्न झालें, त्या वेळी अहेरांचा खर्च झाला पन्नास रुपयाच्या वर. कमलचे कपडे–बारा रुपये.–त्या दिवशी सिनेमा पहावयाला गेलें होते, त्याचा खर्च सरासरीं दहा बारा रुपये ! किती झाले एकदर ? त्याखेरीज, ह्या दहापधरा दिवसात झालेला घरखर्च ! आणि, मी विचारते, खर्च खर्च तरी काय असा अवाढव्य आहे ? फार झालें, तर महिन्याच्या काठी तीन चारशे रुपड्या ? पण तेवढे खर्च करायचेसुद्धा जिवावर यावे, म्हणजे आश्चर्यच नव्हे का ? माझ्या दादाच्या घरीं महिन्याकाठी कमीत कमी आठशें रुपये लागतात नुसत्या घरखर्चाला ! त्या खेरीज, क्लब आहे, वर्तमानपत्रे आहेत, आणखी हजार भानगडी आहेत ! पण तेथे नाही कधीं अशी पैशाबद्दल कुरकुर होत ! मी खरोखर सांगते, असेच जर नेहमी राहणार असेल, तर यापुढें या घरात दिवस काढणे मला अशक्य होईल ! तसेंच असेल, तर एकदां स्पष्टपणे सागून टाकावे ! दादाची बदली आता मेदिनी-पूरला–जवळच आला आहे. मी आपली उचलते पोरीला, नी जाते निघून त्याच्याकडे ! म्हणजे माझ्या मनालाही शाति मिळेल, आणि आपल्याही मनाप्रमाणे होईल !–पुरे झाली मेली ही दिवसरात्रीची कटकट ! "

नरेन्द्र बराच वेळपर्यंत खाली मान घालून मुकाट्याने हे मर्मभेदक वाक्प्रकार सहन करीत होता ! थोड्या वेळानंतर त्यानें मान वर उचलली, व इन्दूकडे न पाहताच तिला उद्देशून म्हणाला, " सध्या मजजवळ पैसे नाहीत ! पाहतों तिसऱ्या प्रहरी कोठें व्यवस्था जमल्यास—! "

" म्हणजे ? याचा अर्थ काय ? व्यवस्था जमली नाहीं, तर उपास काढावे लागतील; असेच की नाही ? पण आता हा त्रास माझ्याच्याने सहन करवत नाहीं ! ऐकलें का ? मी उद्याच मेदिनीपूरला जाणार ! आणि ऐकायचे असेल, तर माझें आपल्यालाही असें सागणे आहे, की हा दलालीचा व्यवसाय या सोडून, आणि दादाच्या वतीने एखादी चागली नोकरी पहा कोठें तरी ! तसें झालें, म्हणजे पुढची ही ददात तरी नाहींशी होईल ! जो धंदा आपल्याला करतां येत नाहीं, त्यांत दिवस घालविण्यांत काय अर्थ आहे ? त्यामुळें कोणालाच सुखप्राप्तीची आशा नाहीं ! "

नरेन्द्रानें कांहींच उत्तर दिलें नाहीं ! इन्दू यापुढें आणखी बरेंचसें बोलणार होती. परतु इतक्यांत नोकरानें आंत येऊन शंभूबाबू आल्याची वर्दी दिली. त्याच्या पाठोपाठ येत असलेल्या शंभूबाबूचा पदध्वनिसुद्धा ऐकू येऊ लागला. त्यासरशीं इन्दू आत चालती झाली ! परंतु ती आंत न जाता, काय गोष्टी चालल्या आहेत, त्या ऐकण्याकरिता दाराआड उभी राहिली !

शभूबाबू हे एक प्रख्यात सावकार होते. नरेन्द्राचे वडील वारले, त्या वेळी या सावकाराजवळून काढलेले बरेचसे कर्ज, फेडण्याकरिता म्हणून नरेन्द्राच्या स्वाधीन करून गेले होते ! ते कर्ज फेडण्याकरितां तगादा लावण्याच्या हेतूनें शंभूबाबू पुष्कळ वेळां आपल्या शुभागमनानें नरेन्द्राचे घर पवित्र करीत असत ! आजदेखील नरेन्द्राचें भाग्य असेच उदयास आलें होते ! ते स्वभावत च मृदुभाषी होते. सम्मानपूर्वक आसन ग्रहण केल्यानतर हळूहळू त्यानीं नरेन्द्राला बऱ्याचशा उपदेशाच्या गोष्टी ऐकविल्या, त्या अशा, की त्या पुनर्वार श्रवण करण्याचा प्रसग येण्यापूर्वी, अत्यत मोठ्या निर्लज्ज मनुष्यानें सुद्धा आपले मस्तक गहाण ठेवून त्याच्या कर्जाऊ घेतलेल्या रकमेची व्यवस्था करण्याकरिता मागे पुढे पाहिलें नसते ! शभूबाबूचा उपदेश सुरू असतां, नरेन्द्र मुकाट्यानें खाली मान घालून बसला होता ! कांहीं वेळानतर शभूबाबूनीं प्रस्थान केलें. त्याबरोबर इन्दू पुनः आत आली, व म्हणाली, “ हे गृहस्थ कोण ?

“ शभूबाबू. ”

“ कशाकरिता आले होते ते ? ”

“ त्याचे काही पैसे देणे आहे, ते मागण्याकरता ! ”

“ ते मला कळले. पण कर्ज काढले काय म्हणून ? ”

एकदर प्रकार तिला समजावून सागण्याच्या हेतूनें नरेन्द्र तिच्या प्रश्नाचे सरळ उत्तर न देतां, म्हणाला, “ बाबा एकाएकीं वारले,–तेव्हा—”

इन्दू अत्यत रुक्ष स्वरांत म्हणाली, “ जगातील एकूण एक माणसाचे देणे मागें ठेवून गेले आहेत की काय मामजी ? ते आता फेडायचें कोणीं ? तुम्हीं ? आणि हें कर्ज फेडण्याचा मार्ग ?

ह्या सर्व प्रश्नांचे उत्तर एका वेळी देतां येणें शक्य नव्हतें. इन्दूचीही तशी अपेक्षा नव्हतीच !–थोड्याच वेळानंतर ती पुन्हा म्हणाली, “ बाबा एकाएकी वारले. त्यामुळें इस्टेटीची निरवानिरव करता आली नाहीं, हे म्हणणें मला मान्य

आहे. परंतु आपलें माझ्याशीं लग्न लागलें तें तर एकाएकीं लागलें नाहीं ना? त्या वेळीं, मागचा पुढचा नीट विचार करावयाला हवी तेवढी संधि होती ना? मग कां बरें हा सर्व प्रकार माझ्या बाबाना कळविण्यात आला नाहीं? बरे, तें एक असो. परंतु, लग्न झाल्यानतर आजपर्यंत माझ्या जवळ तरी याबद्दल गोष्ट काढणें योग्य नव्हते का? लोकांमध्यें आपल्याबद्दल धर्मभीरु म्हणून फार ख्याति आहे! हाच वाटतें आपला धर्मभीरुपणा? प्रत्यक्ष धर्मपत्नीची अशा प्रकारे फसवणूक करणें, हें सर्व धर्मशास्त्रातच सागितले असेल, नाही का?" असे बोलून युद्ध-घोषणा केल्याप्रमाणे तिनें आपली सरोष दृष्टि पतीच्या मुखाकडे लावली!

परंतु नरेन्द्राचा स्वभाव तरी किती शांत आणि सहनशील! प्रत्यक्ष पत्नीकडून अपमानयुक्त वाक्बाणाचा एवढा निष्ठुर प्रहार होत असून सुद्धा, त्यानें किंचित्‌ही अस्थिरता प्रगट केली नाहीं. कारण परमेश्वराने त्याला अत्यत निरुपाय परिस्थितींतच जन्माला घातले होते होईल तो आघात निमूटपणे सहन करण्याखेरीज त्याला गत्यतर नव्हते! प्रत्याघात करावयाचा कोणाच्या बळावर? अनन्यगतिकत्वामुळें पूर्णत्वास पोचलेली नपुसक सहनशक्ति, तीच काय ती त्याची एकमात्र आधारभूत शक्ति होती! प्रतिकूल परिस्थितीने दीन बनविलेल्या दुर्दैवी लोकांना स्वतःच्या अश्रुजलाशिवाय दुसऱ्या कशाचा आधार आहे?

अपमानाच्या तीव्र वेदना काहीं काळपर्यंत त्याच्या हृदयांत मुका गोंधळ घालून मग आपोआप शात होत असत! परतु आज दुर्दैवानें, अपमानाचे दारुण आघात एकामागून एक त्याच्या हृदयावर हल्ला करू लागल्याकारणानें, त्याचे चित्त स्थिर होण्याला अवकाश मिळाला नाही! शभूबावूंच्या अत्युग्र शब्दाच्या ज्वालेत होरपळत असणारे त्याचें अत करण थोडे तरी शात होण्यापूर्वीच त्यावर इदूच्या भाषणाचा तीव्र प्रहार सुरू झाला! अग्नीत पडलेल्या या घृताहुतीमुळे त्याचा कोपाग्नि भडकला! काहीं तरी तीव्र उत्तर देऊन इन्दूनें केलेल्या अपमानाबद्दल थोडी तरी भरपाई करावी, असें मनांत येऊन त्या प्रकारचे शब्द त्याच्या अगदी ओठाशीं आले! परंतु इतक्यांत, सवयीमुळे कमकुवत बनलेल्या त्याच्या निःसत्त्व मनोवृत्तीनें पुन्हा उलट खाल्ली! दुबळ्या पायावर उभारलेली कठोर शब्दाची कमकुवत इमारत एका क्षणातच खालीं गडगडली! क्षीण स्वरात तो फक्त एवढेच म्हणाला, " बाबाच्यासंबंधीं असे शब्द उच्चारणें तुला उचित वाटतें काय?"

" नाहीं—असें बोलणें योग्य नव्हतें! परंतु माझ्या भाषणाबद्दलच्या योग्यायोग्यतेसबंधानें सध्या प्रश्न उपस्थित झालेला नाहीं. मूळ प्रश्न आहे या कर्जाबद्दल!

ही सर्व भानगड पूर्वीच बाबांच्या दृष्टोत्पत्तीस कां आणली नाहीं? मला अगोदर या प्रश्नाचा खुलासा पाहिजे आहे!"

"इन्दू, मी तुझ्या वडिलापासून कोणतीही गोष्ट लपवून ठेवली नव्हती! त्यांना हें सर्व पूर्वीपासूनच ठाऊक होतें! त्याखेरीज ते बाबांचे बालपणापासून मित्र असल्याकारणानें, बाबासंबधी प्रत्येक गोष्ट त्यांना पूर्णपणें माहित होती! त्या-बद्दल तू मला दोष देऊं शकत नाहीस!"

"अस्से! एकदरींत बाबानींच मला उघड्या डोळ्यांनीं या विहिरींत ढकललें म्हणायचें!"

व्यथा असह्य होऊन नरेन्द्राच्या मुखावर लाली चढली! असे शब्द हिंदू स्त्रीच्या मुखावाटे बाहेर पडणे शक्य आहे, असे त्याला वाटेना! इन्दूनें प्रगट केलेला रोष खरा नसून, आपल्याला तसा निव्वळ भास झाला असेल, असेंही त्याला एक क्षणभर वाटल्यावाचून राहिले नाही! त्याने आपली दृष्टि इन्दूच्या मुखाकडे वळविली; परतु तेथे त्याला काय दिसले कोणाला ठाऊक, त्यानें आपली मान खाली वळविली! तिने उच्चारलेल्या प्रत्येक शब्दाची सत्यता पटविणाऱ्या तिच्या मुखाकडे पाहताच त्याच्या शरीरावर रोमाच उभे राहिले!

या ठिकाणी, या प्रेमळ (?) दंपत्याच्या गतकालीन इतिहासाबद्दल दोन शब्द लिहिणे अयोग्य होणार नाहीं! ही उभय कुटुंबें बरेच दिवसापासून एकमेकाशेजारी राहात असत. बरेच दिवसाच्या निकट परिचयामुळे त्यांमध्यें प्रेमभावाची बरीच वृद्धि झाली असून एक प्रकारची कौटुंबिक आत्मीयताही उत्पन्न झाली होती! त्याच वेळी इन्दूचा नरेन्द्राशीं विवाह स्थिर झाला होता. खरे पाहिलें असता हा विवाह झाला त्याच्या किती तरी दिवस अगोदरच घडून आला असता. परतु इन्दूचे वडील स्त्रीशिक्षणाचे चाहते असून बऱ्याच अशीं प्रागतिक मताचे असल्याकारणाने, आपल्या मुलीचे लहानपणीच लग्न करणे त्याना योग्य वाटले नाही. त्यानी तिला अविवाहित ठेवून उच्च शिक्षण घेण्याकरिता कलकत्त्यास ठेवण्याचे ठरविलें! त्याप्रमाणे इदू आपल्या आईबापासह कलकत्त्यास राहून उच्च शिक्षणाचा लाभ घेऊं लागली.

काही वर्षानतर इन्दूचे शिक्षण पूर्ण झालें. यावेळी तिचें वय १८ वर्षांचें होतें. या सुमारास पुन्हा तिच्या लग्नाबद्दल प्रश्न उपस्थित झाला! मध्यंतरी नरेन्द्राच्या कौटुंबिक परिस्थितींत बराच फेरफार घडून आला होता. सांपत्तिक दृष्टया त्याची परिस्थिति बरीच खालावली असून त्याच्या वडिलांवर बरेंचसें

कर्जही झालें होतें. दुर्दैव चोहींकडून एकाच वेळीं उचल खातें म्हणतात, तें नरेंद्राच्या बाबतींत अगदीं पुरेपूर खरें ठरलें ! व्यापारी जगांत आपली पत पूर्ववत् कायम ठेवून, कर्जाचा बोजा डोक्यावरून खालीं काढण्याच्या प्रयत्नांत त्याचे वडील गुतले असतां, एके दिवशीं अकस्मात त्यांच्या हृदयाची क्रिया बंद पडून त्यांचें देहावसान झालें ! नरेन्द्र जगांत उघडा पडला ! बापाच्या कारकीर्दींत झालेल्या कर्जाची फेड करून स्वतःच्या पोटाचाही उद्योग करण्याकरितां त्यानें आपला पूर्वापार चालत आलेला दलालीचा धदाच चालू करण्याचें ठरविले ! त्याच्या सुदैवाने या धंद्यांतील ज्ञान त्याला त्याच्या वडिलाच्या हयातींत चांगलेंच मिळालें असल्याकारणानें, लवकरच त्याचा जम चागला बसला. व्यापारी वर्गांतही त्याची पत बरीच वाढली असून त्याच्या प्राप्तीचे प्रमाणसुद्धा समाधानकारक होतें !

याच सुमारास इन्दू आपल्या सर्व कुटुबासह परत आली ! इन्दू नरेन्द्राला द्यायची, ही गोष्ट फार वर्षापूर्वींच जवळ जवळ नक्की ठरून गेले होते ! त्यामुळे अगदीं बाळपणापासून याच कल्पनेचा परिपोष अतःकरणात करीत आलेल्या इन्दूला नरेन्द्राकडे पतीपेक्षा निराळ्या भावनेनें पाहता येणे शक्यच नव्हतें ! इतकेच नव्हे, तर, ही कल्पना तिच्याशीं इतकी एकजीव झाली होती की, यापुढें तिच्या लग्नाबद्दल पुन्हा वाटाघाट करण्याचें प्रयोजन काय हेच तिला कळेना ! पूर्वीच्या मानाने आतां नरेन्द्राची खालावलेली परिस्थिति लक्षात घेऊन, आपल्या मुलीचे दुसरीकडे जमविण्याचा पोक्त विचार इन्दूच्या पित्याच्या मस्तकात डोकावूं लागला होता ! परंतु या बाबतींत कन्येचे मत ठाम पाहतांच, यापुढे जास्त ढवळाढवळ करणे योग्य नाहीं, हे त्याना स्पष्टपणें कळून आलें. त्यांनी नरेन्द्राला बोलावून, त्याचे मत विचारले ! वडिलानीं आपल्या हयातीत ठरवून ठेवलेल्या योजनेबद्दल त्याचे प्रतिकूल मत असणे शक्यच नव्हते ! एका शुभ मुहूर्तावर नरेन्द्र व इन्दू यांचा मगलविवाह उरकून टाकण्यांत आला !

यानंतर थोड्याच दिवसानी इन्दूचे वडील आपल्या स्वर्गस्थ मित्राच्या भेटीकरितां निघून गेले, व या कुटुंबाचा भार सर्वस्वीं तिच्या भावाच्या अंगावर पडला !

भूतकालांतील ह्या सर्व गोष्टींचा इन्दूला इतक्यांतच विसर पडला असेल, हें नरेन्द्राला खरे वाटे ना ! परंतु उच्च शिक्षण प्राप्त करून घेतलेल्या इन्दूच्या मनःस्थितींत बरेंचसें स्थित्यतर घडून आलें होतें ! पाश्चात्य शिक्षणपद्धतीमुळे कोमल

अंतःकरणावर होणारे वाईट परिणाम, संसार व समाज यांबद्दलच्या नसत्या भ्रामक समजुतींच्या व मतांच्या रूपानें तिच्या हृदयांत खोल रुतून बसले! लक्ष्मीची पूर्ण कृपादृष्टि असलेल्या वडिलांच्या सोनेरी छत्राखाली राहत आलेल्या, व भलत्याच शिक्षणामुळे वाढीस लागलेल्या तिच्या स्त्रीहृदयातील आकांक्षा, संपत्तीच्या अभावीं अतृप्त राहू लागल्या! ह्या अतृप्त आकांक्षांचें भूत मधून मधून कलहाचें रूप धारण करून ह्या पतिपत्नीमध्ये मनोमालिन्य घडवून आणू लागले! ह्याचा एक मासला, म्हणजे वर दिलेला प्रसंग! नरेन्द्राशींच लग्न करण्याबद्दल दाखविलेल्या हट्टीपणाबद्दल आता इन्दूला पश्चात्ताप तर होत नाहींना? असा विचार नरेन्द्राच्या अंतःकरणात उत्पन्न झाला! इन्दूने केलेल्या विधानाबद्दल एक अक्षरही न उच्चारता तो खाली मान घालून बसून राहिला!

इन्दूही पुढे काही बोलली नाही. निर्वाक् होऊन बसलेल्या पतीकडे एकवार तीव्र दृष्टि-निक्षेप करून ती चालती झाली. जाताना ती अगदी ध्वनि न करताच गेली–अशाच प्रकारे ती यापूर्वी पुष्कळदा त्याच्या खोलींतून निघून जात असे–परंतु आजचे तिचें हे प्रयाण नरेन्द्राला फार जाणवलें! आपल्या हृदयातील एक अत्यंत कोमल भागावर इच्छापूर्वक दारुण आघात करून ती कठोरपणे निघून गेली असे त्याला वाटले! पत्नीच्या वर्तनाबद्दल त्याला फार वाईट वाटले! तो जात्याच कोमल मनोवृत्तीचा असल्याकारणानें तर त्याला झालेला प्रकार फारच जाणवला! त्याने किंचित् मान वर उचलून पत्नीच्या निष्ठुर पदक्षेपाकडे दृष्टि लावली! ज्या वेळेस ती दृष्टिआड निघून गेली, त्यावेळी त्याने एक गंभीर—अत्यंत गंभीर—निश्वास सोडला, व निर्जीवाप्रमाणे तेथेच त्यानें अंग टाकलें! निष्प्रेम आयुष्यात पदोपदीं अनुभवास येणारा संसाराबद्दलचा मिथ्या भास आज सत्यस्वरूपात त्याच्यासमोर येऊन उभा राहिला. एका निमिषमात्राच्या अल्प अवधींत त्याला दिसून आले की, मानवी अंतःकरणाला आशेच्या व अज्ञानाच्या मायापाशात गुंतवून ठेवणारा हा सर्व पसारा निव्वळ क्षणस्थायी आहे;—एवढेंच नाही तर तो निव्वळ मिथ्या भास आहे!—त्याच्या भावनाप्रधान हृदयाच्या सर्व शक्ति एकवटून त्याला वाटू लागले की, या जगात सत्य आणि चिरंतन शक्ति जर असेल तर ती म्हणजे प्रेम! तिच्या अभावीं संसाराचा पसारा म्हणजे भ्रम होय! तेच प्रेम आज त्याच्यापुरते नष्ट झाल्याकारणाने त्याचा प्रेमावरचा विश्वासही पार उडून गेला! त्याला वाटू लागले कीं, हें घरदार, स्त्रीकन्या, स्नेहप्रेम वगैरे सर्व गोष्टी, म्हणजे मरुभूमीत दृष्टोत्पत्तीस येणाऱ्या मरीचिकेप्रमाणेच भ्रममूलक आहेत!

[ ३ ]

" दादा ? "

" कोण ? विमल ? ये, ताई ये. बैस अशी, केव्हा आलीस तूं ? " असें म्हणत म्हणत नरेन्द्र शय्येवर उठून बसला! त्याच्या मुखावरील व्यथाभाव तो लपविण्याचा प्रयत्न करीत असतानादेखील विमलच्या दृष्टीतून निसटूं शकला नाही!

" कसे काय ताई ? बरेच दिवस झाले, तुझी भेट झाली नाहीं! प्रकृती वगैरे बरी आहे ना ? घरीं सर्व मंडळी खुशाल आहेत ना ? "

स्वतः अशा दारुण यातना भोगीत असूनही दुसऱ्याच्या खुशालीबद्दल चौकशी करणाऱ्या नरेन्द्राच्या अतःकरणाचा थोरपणा पाहून विमलेचे नेत्र भरून आले! ती हळूहळू येऊन त्याच्या शेजारीं बसली, व म्हणाली, " दादा, तूं आजारी आहेस ही गोष्ट हा वेळपर्यंत तू मला कळविली नाहीस, याचे कारण काय ? एकमेकाच्या इतके जवळ राहत असूनसुद्धा अशी स्थिति; मग दुसऱ्या गावीं पडले असते तर काय केले असतेस, देव जाणे! "

" अः! उगाच लहानसहान गोष्टीबद्दल मोठा बाऊ करणे मला पसत नाहीं! मी काही फार आजारी नाही, तुला कळवून घाबरून सोडावयाला! आजार म्हणजे नेहमींचाच,-हे इथे छातींत दुखते आहे थोडेसे, झाले——! "

विमलेने पदराने अश्रु पुसले. जड स्वरांत ती हळूहळू म्हणाली, " हे थोडेंसेंच का आहे ? तुझ्या चर्येवरून मला दिसत नाहीं वाटते ? अथरुणावर नीट उठून बसता देखील येत नाही; घरातल्या घरात चालणे फिरणे देखील बंद पडलें आहे, तरीसुद्धा काळजी करण्यासारखें काही नाहींच का ?—बर, डॉक्टर काय म्हणाले ? "

" डॉक्टर ? डॉक्टरचे काय प्रयोजन ? तूं वेडी आहेस ताई! अग माझें दुखणे दोन दिवसात आपोआपच बरें होईल! त्याला डॉक्टर कशाला हवा! तूं उगाच काळजी करतेस! "

" म्हणजे ? म्हणतोस तरी काय तूं हे दादा ? या थराला प्रकरण आले, तरी तूं अजून डॉक्टरलादेखील बोलावले नाहीस! काय बरें म्हणावे या हलगर्जीपणाला! नक्की किती दिवस झाले तुला आजारी पडून ? "

एक क्षीण हास्य हसून नरेन्द्र म्हणाला, " काही फार दिवस झाले नाहींत! सरासरी सात आठ दिवस झाले असतील! "

" सात आठ दिवस ! म्हणजे, हा सर्व प्रकार आपल्या डोळ्यांनीं पाहून मग वहिनी गेल्या वाटते ! "

" नाही, नाहीं ! तसें मुळींच नाहीं. माझी पूर्ण खात्री आहे, कीं माझ्या आजाराबद्दल तिला काहीसुद्धा कळलेलें नाहीं ! ती गेली, त्या दिवशीदेखील माझे रोजप्रमाणे व्यवहार चालूच होते ! द्दः ! तुझी तिच्याबद्दल भलतीच समजूत झालेली दिसते ! अग, किती झाले, तरी ती स्त्री आहे ! पतीशीं किती जरी भाडण झालें, तरी अशा स्थितीत जाणून सवरून त्याला टाकून जाणे, कोणत्याही स्त्रीला शक्य नाहीं ! "

" अस्स ! एकदरीत वहिनी रागावून निघून गेल्या आहेत तर मग ! "

" नाही, तसा प्रकार नाहीं ग ! तुला ठाऊकच आहे, तिला येथे किती त्रास सहन करावा लागतो तो ! ती म्हणजे श्रीमताची लेंक ! गरिबीच्या संसारातील कष्ट सहन करण्याचा तिला अभ्यास नाही ! त्या कारणामुळेंच आताशा तिची प्रकृतीही बरी नव्हती ! म्हणून ती गेली. नाही तर पतीची अस्वस्थ प्रकृती पाहून कोणत्या स्त्रीचा राग टिकून राहणे शक्य आहे, साग पाहू ? "

विमला आपले अश्रु आवरून कठिण स्वरात म्हणाली, "दादा, आम्हा स्त्रियाना काहींसुद्धा अशक्य किंवा असाध्य नाही ! पुरुषाना अशक्य वाटणारी गोष्ट आम्हा स्त्रियाच्या बाबतींत अगदी सहजसाध्य ठरू शकते ! आता, हेंच पाहीनाम ! तुझा आजार या थराला येऊन ठेपला, तरी सुद्धा मला त्याची गधवार्तादेखील नव्हती ! बहीणभाऊ एका गावांत—एका हाकेच्या अंतरावर राहात असता, हे शक्य आहे असे कोण बरे म्हणेल ? पण तेसुद्धां माझ्या बाबतीत खरें ठरलेच ना ? अरे भोलानाथ, गाडी तयार आहे का ?"

"सईस घोड्याला पाणी पाजीत आहे, इतक्यांत तयार होईल गाडी ! " भोलानाथने येऊन कळविले !

"काय ? इतक्यातच जाणार कीं काय तूं परत ? तुला येऊन फारसा वेळ झाला नाहीं ! अजून सध्याकाळ व्हायला देखील कितीतरी अवकाश आहे. मग का बरे घरी परत जाण्याची एवढी घाई ? बैस थोडा वेळ आणखी, जाशील मग ! "

" नको दादा. सध्याकाळ झाल्यानंतर मग थडीबिंडी वाजू लागेल एखादी ! त्यापेक्षां अगोदरच निघालेले बरें ! भोलानाथ, गाडी अगदीं दाराशींच आणून उभी करायला साग, बाहेरच्या फाटकाशीं नको उभी ठेवूंस म्हणावे !"

"कां बरें ? आज गाडी फाटकाच्या आत आणण्याचें काय कारण ?"

"आंतच आलेली बरी ! तुझी प्रकृती ही अशी क्षीण झालेली ! फाटकापर्यंत पायीं चालत जाण्याचे श्रम तुला कसे बरें सहन होतील ?"

"म्हणजे, मला घेऊन जाणार कीं काय तू आपल्याबरोबर ! वेडी कुठली ! अग या येवढयाशा गोष्टीचा एवढा थोरला बाऊ करण्याचें कारण काय ? हें तर माझें नेहमींचेंच चाललें आहे ! एक दोन दिवसांतच मी चांगला खडखडीत बरा होईन ! त्याबद्दल एवढी काळजी करण्याचें काय बरे कारण ?"

" कांहीं हरकत नाहीं ! तू लवकर बरें व्हावे, अशीच माझीही इच्छा आहे ! आणि त्याकरिताच मी तुला माझ्याबरोबर घेऊन जाणार ! मी यापुढे तुझी हयगय होऊं देणार नाहीं ! माझा एकुलता एक भाऊ अगदी उघड्या डोळ्यानीं हातचा जाऊं देणे, हें कसें बरें शक्य आहे ? ह चल. ही पहा, गाडी दाराशीं येऊन उभी राहिली !—घे हे ब्ल्याकेट, आग चागले चोहोबाजूनीं झांकून घे, बरें का; नाहीं तर थडीबिंडी लागायची एखादी ! अगोदरच प्रकृती ही अशी झालेली ! ह. भोलानाथ, नीट साभाळून गाडीत नेऊन बसीव, बरं का ! हर हर ! तूं इतका क्षीण झाला असशील, अशी मला कल्पनादेखील नव्हती ! या वेळीं तर डोळयांत तेल घालून तुला जपले पाहिजे ! "

" तू मला घेऊन जाशील, असे जर मला अगोदर वाटले असतें, तर मीं निरोपच धाडला नसता तुझ्याकडे ! काय बरे म्हणावे तुझ्या या वेडेपणाला ? "

कांहीं वेळपर्यंत त्याच्या मुखाकडे दृष्टि रोखून पाहिल्यानतर विमला किंचित् रुष्टस्वरांत म्हणाली, " तुझें शहाणपण तुझ्याजवळच राहूं दे ! मला सागूं नकोस ! मी तुला घेऊन जाते, याबद्दल तूं मला दोष देतोस, पण तूंच सांग पाहूं, अशा स्थितींत तुला येथे एकटे टाकून देऊन मी घरी कशी बरें जाऊं ? "

नरेन्द्रानें एक लहानसा निश्वास सोडला ! विमलेच्या मर्जीप्रमाणे वागण्यास आपली अनुमति आहे, असे दर्शवून तो म्हणाला, " ठीक आहे तर मग ! चला जाऊं या ! "

× × × ×

" दादा ? "

" काय ? "

" ताबडतोब निघून येण्याबद्दल वहिनीला आजच तार पाठविण्यास कांहीं हरकत आहे का ? "

हे शब्द कानीं येतांच नरेन्द्र एकाएकीं व्यस्त होऊन म्हणाला, " नको, नको. तसें करण्याची कांहींच आवश्यकता नाहीं ! "

" कां बरे ? आवश्यकता नाहीं असे कां म्हणतोस ? मेदिनीपूर कांहीं येथून फार लाब आहे असें नाही. येऊ दे तिला काहीं दिवसाकरिता ! मग इच्छा असल्यास पुन्हां परत जातां येईल ! "

" नको ग ताई ! खरोखरच तिची प्रकृति बरी नाहीं ! ती तेथें दोन दिवस सुखात राहिली म्हणजे तेवढेंच तिला बरें वाटेल ! येथे बोलावून तिच्या अस्वस्थ मन:स्थितींत माझ्याबद्दलच्या काळजीची आणखी भर टाकण्यांत काय अर्थ आहे ?" यानतर थोडा वेळ थांबून नरेन्द्र पुन्हा विमलेकडे वळून म्हणाला, " आतां मीं अगदीं माझ्या अत:करणांतील गोष्ट तुला सागतों ! ती येऊन तरी विशेष असें काय करणार आहे ? माझी अशी दृढ भावना आहे कीं, मी जर बरा होणार असेन, तर तो तुझ्याजवळ राहूनच होईन ! दुसऱ्या कोणाच्याही परिचर्येचा माझ्या प्रकृतीवर काहीसुद्धा परिणाम होणे शक्य नाही ! जाऊ दे त्या गोष्टी ! बरें, पण ताई, मी तुझ्याबरोबर येणार हे गगनबाबूना ठाऊक आहे का ? " गगनबाबू हें विमलच्या पतीचे नाव होतें.

" तुझें आपले भलतेच कांहीतरी ! आफिसातून घरीं परत येण्याची वेळ तरी झाली आहे का ? "

" मग कसे ?"

" 'मग कसें' काय ? त्यांत तुला एवढा प्रश्न पडण्याचे काय कारण ? आपण घरी जाताच सारा प्रकार प्रत्यक्षच दिसेल ! त्यात काय आहे ? "

नरेन्द्र पुन्हा अथरुणावर पडून म्हणाला, " विमल, तुझ्या घरीं मला येतां येणार नाही ! "

आश्चर्यचकित होऊन विमलेनें प्रश्न केला, " माझ्या घरीं तुला येतां येणार नाहीं ? आणि ते काय म्हणून ?"

" गगनबाबूंची समति नसतांना--! "

सर्व काळजी एकदम दूर झाल्यामुळे एक दीर्घ निश्वास टाकून, विमला किंचित् हसून म्हणाली, " हात्त्याच्या ! एवढेच ना ? मला वाटले काय कारण आहे, नि काय नाहीं ! पण दादा, मला वेडी म्हणतां म्हणतां, तू स्वतःचा वेडेपणा मात्र चागलाच सिद्ध केलास ! अरे, माझें आणि तिकडचे मत कधींतरी वेगवेगळें असणें

शक्य आहे का? एका घरांत एका कुटुंबात निरनिराळीं मते कशीं बरे राहतील! चल, ऊठ! यापुढे असे तर्कवितर्क काढणे, म्हणजे माझा अपमान आहे असें मी समजेन!"

"काय? तुझा अपमान?" अथरुणावर पुन्हा उठून बसत बसत नरेन्द्र म्हणाला, "पण ताई, तुझी खात्री आहे ना, तुम्हा उभयतांमध्यें या बाबतींत दोन मतें पडणें शक्य नाहीं अशी?"

त्याच्या शरीराभोंवतीं काळजीपूर्वक ब्ल्यांकेट गुंडाळून, त्याला पलंगावरून खालीं उतरण्यास मदत करीत करीत विमला सहास्यमुखाने म्हणाली, "होय!"

* * * *

"दादा, आज कसें वाटतें आहे तुला? कालच्या औषधाचा काही परिणाम झाला का? छातीत दुखणें आता कसें आहे?"

हातात असलेला मासिकाचा अंक एकीकडे ठेवून नरेन्द्र विमलेकडे पाहून म्हणाला, "कोण, ताई? ये, बैस अशी! औषध फारच चागले लागू पडलेलें दिसते! कालपासून छातीतील दुखणे अजिबात थाबलें आहे! पूर्वीपेक्षा शरीरांत शक्तीसुद्धा पुष्कळच आली आहे! ताई तुला एक गोष्ट विचारूं का?"

"काय?"

"तू रागावणार तर नाहींस ना?"

"मी रागावेन? आणि ते काय म्हणून?"

"माझे म्हणणे एवढेच की, आता माझी प्रकृती पूर्णपणें सुधारली आहे! ह्या गेल्या आठवड्यांत मीं तुम्हाला दिले तेवढे कष्ट पुरे झाले! आता मला घरीं परत जाण्याची परवानगी पाहिजे आहे!"

"इतक्यातच घरीं परत जाण्याची गोष्ट पुन्हा काढूं नकोस! तुला वाटतें तसा तूं अजून पूर्णपणे बरा झाला नाहींस! अशा स्थितीत तूं घरीं परत जाऊन काय करणार? तेथे तुझ्या औषधपाण्याची व्यवस्था पहावयाला कोण आहे? बरें, पण तें राहूदे मेलें, दादा! पण, काय रे, वहिनीला माहेरीं जाऊन आज उणे पुरे वीस दिवस झाले,—या वीस दिवसात तिनें तुला एकसुद्धा पत्र पाठविलें नाहीं, हें कसें?"

"वाः! नाहीं कसें? तिचीं मला दोन पत्रें मिळालीं! एक तेथे गेल्यानंतर धाडलेलें;—आणखी दुसरें एक कालच आलें! मींच उत्तर धाडलें नाहीं!"

आतांपर्यंत नरेन्द्राच्या मुखावर दिसत असणारा उत्साह, त्याच्या पत्नीबद्दल भाषण सुरू होतांच, पार मावळलेला दिसत होता !

नरेन्द्राच्या मुखमडलावरील उदासीनतेची छाया विमलेच्या मुखावरही पसरू लागली ! तिने नरेन्द्राला कांहींच म्हटले नाहीं ! तें पाहून नरेन्द्रालाही वाईट वाटल्यावांचून राहिले नाहीं ! तो लज्जेनें कुठित होऊन, आपले मनोविकार विमलेपासून लपविण्याचा विफल प्रयत्न करीत म्हणाला, "तसें पाहू गेल्यास मेदिनीपुरचे हवा पाणी येथल्यापेक्षां फार चागले आहे ! तेथे गेल्यानतर तरी तिच्या प्रकृतीस कांहीं स्वस्थता प्राप्त होईल असे मला वाटलें होते; परंतु तिच्या पत्रावरून तसा कांहींच बोध होत नाही ! थडी, खोकला—परवांचे दिवशीं थोडासा ताप आल्यासारखेही वाटलें. त्या स्थितींत असतांनाच तिनें हें पत्र लिहिलें होते— "

"त्याकरतांच आज एवढया तातडीनें तिकडे मनी-ऑर्डर रवाना केली वाटतें ?"

नरेन्द्र अधिक लज्जित होऊन म्हणाला, "नाही, तसें काहीं नाहीं ! तिच्याजवळ हातखर्चाला काहीच द्रव्य नव्हते ! पत्रांत लिहून कळविलें होतें की, मेदिनीपुराजवळच एक देवीचे स्थान आहे, तेथे दरवर्षी मोठा उत्सव होत असतो. त्या वेळी बऱ्याच लाबलांबची मंडळी तेथे येत असून मोठी यात्रा भरत असते ! यदा तिच्या भावाच्या घरची सर्व मंडळी त्या यात्रेस जाणार आहेत. तेव्हां तेथे त्याच्या समागमे गेल्यानतर, त्याच्या इतमामाप्रमाणे आपल्याला देखील खर्च करावयाला नको का ? तिचे म्हणणेही अगदीं यथार्थच होतें, तेव्हां दिले थोडेसे पैसे पाठवून झाले !—पण काय ग ताई, तुला नाही वाटतें कधी तिचें पत्रबित्र येत ?"

"हो, हो ! येत नाहीं तर काय ! काल मलादेखील एक चार पानांचे लाबलचक पत्र आले आहे !"

"असें का ?" काहीं एक विविक्षित विचार मनांत उत्पन्न होऊन नरेन्द्र कांहींशा आतुरतेनें म्हणाला, "मला वाटलेच, ती तुलासुद्धां पत्रें धाडीत असेल असें ! पण कालच्या पत्राचे उत्तर देतांना, माझ्या......!"

"तूं कांहीं काळजी करूं नकोस दादा;—मी तिच्या पत्राचें उत्तर लिहिले, तरी त्यांत तुझ्या या आजारासंबधी एक अक्षरसुद्धा लिहिणार नाही ! त्याबद्दल तूं अगदीं निर्धास्त रहा ! माझा वेळ तरी कुठें असा वर आला आहे, याप्रमाणे नष्ट

करायला ? " इतकें बोलून विमला खोलीच्या बाहेर चालती झाली! तिच्या अत:करणांत काय च ललें होतें, देव जाणे!

सायकाळच्या वेळीं उघड्या खिडकींतून, आकाशावर पसरलेल्या म्लान छायेकडे पहात, नरेन्द्र म्लान-वदनानें कोणत्या तरी विचारांत गढून गेला होता! त्याच्या चर्येवरून पाहतां, आकाशावरील संध्याकालीन कृष्णवर्ण धूसर छाया त्याच्या हृदयाकाशावरही पसरली असून सारी जीवनकला म्लान करीत असावी असा भास होत होता! तो आपल्या विचारांत इतका गुग झाला होता की, विमलेला खोलींत येऊन बराच वेळ झाला, तरी त्याच्या ते ध्यानांत आलें नाहीं! शेवटीं विमलेनेंच पुढे होऊन प्रश्न केला, "दादा, कशाबद्दल विचार चालला आहे एवढा?"

हे शब्द कानी येताच नरेन्द्र दचकला! चोरी करीत असताना घर-मालकाने अनपेक्षितपणे समोर येऊन उभें रहावे, म्हणजे ज्याप्रमाणे चोराची स्थिति होते, अगदी तशीच स्थिति या वेळी नरेन्द्राच्या मनाची झाली होती! आपल्या मनातील गूढ भावाचा प्रभाव मुद्रेवरून शक्य तेवढा कमी करण्याचा प्रयत्न करून तो विमलेला म्हणाला, "काहीं नाहीं, ताई! विचार कशाचा करायचा?"

"तरी पण?" आपल्या तीक्ष्ण दृष्टीनें त्याच्या हृदयाचा ठाव काढण्याचा प्रयत्न करीत विमला म्हणाली.

"मनांतल्या मनात परमेश्वराजवळ प्रार्थना करीत होतों, कीं तुझे हे सुखाचे दिवस असेच चिरकालपर्यंत टिकून राहोत!" तिच्याकडे न पाहतां पुन्हा आकाशाकडे दृष्टि वळवून नरेन्द्र म्हणाला.

विमलेनें जवळ येऊन त्याच्या पायावर मस्तक ठेवलें! नतर हळूच नरेन्द्राची दृष्टि टाळून, नेत्रातील अश्रु-बिंदु पुसून टाकून, ती त्याच्या जवळच एका खुर्चीवर बसली!

नरेन्द्र कांहीं वेळानें पुन्हा तिच्याकडे मुख वळवून म्हणाला, " काय ग ताई, मघाशीं तूं एकाएकीं रागावून निघून गेलीस, तें काय म्हणून? राग येण्याजोगें काय बरें कारण घडलें त्या वेळीं?

त्या प्रसंगाची आठवण होऊन विमला उत्तेजित भावानें म्हणाली, " कारण दुसरें कांहीं नाहीं. मला कोणत्याही प्रकारचा अन्याय सहन होत नाहीं, हेंच तें कारण! दादा, तू तरी असा...? "

" 'असा' काय, साग पाहू ? " तिला शात करण्याच्या उद्देशानें नरेन्द्र म्हणाला, " ताई, तू माझ्याबद्दल तेवढा आपलेपणानें विचार करतेस ! पण त्याच दृष्टीने तू एकदा इन्दूकडे पहा पाहू ! तिला सुखांत ठेवणे हे माझे कर्तव्य होते. माझे कर्तव्य योग्य रीतीनें मला कधी पालन करता आले का ? "

मुळींसुद्धा शात न होतां, पूर्वीप्रमाणेंच उत्तेजित स्वरांत विमला म्हणाली, " तू म्हणतोस त्याप्रमाणे पतीनें पत्नीला सुखात ठेवणें हें जसें त्याचे कर्तव्य आहे, त्याप्रमाणेच तसे सुखी होण्याची पात्रता आपल्या अगीं आणणे, हे पत्नीचेंही कर्तव्य आहे ! पण मी म्हणतें, इन्दूला असे दु:ख तरी कोणते आहे ? सुखा-बद्दलची कल्पना मनात बाळगतांना तिच्या योग्यायोग्यतेबद्दल विचार करावयाला नको का ? तिला असा कोणत्या गोष्टीचा अभाव आहे ? मी तर असें विचारतें, की तिच्याप्रमाणे भाग्यशाली स्त्रिया किती सापडतील ? दादा, सुखप्राप्ति व्हावी अशी इच्छा असल्यास स्त्रीने आपल्या सौभाग्याला मस्तकावर धारण करा-वयाला पाहिजे; नाहीं तर.. ...! "

परंतु वाक्य पूर्ण होण्यापूर्वीच लज्जेने विमलेचें मुख अवनत झाले !

भगिनीच्या सर्वांगावर आपल्या स्नेहपूर्ण स्निग्ध दृष्टीचें मगलसिंचन करीत नरेन्द्र एका क्षणानतर म्हणाला, " ताई, लाजू नकोस ! मी विचारतों त्या प्रश्नाचें सरळ निर्भीडपणे उत्तर दे. तुझें आपल्या पतीशी भाडण बिंडण होते किंवा नाही ? खरें खरे उत्तर दे, बरे का ! "

सलज्ज सस्मित वदनाने विमला म्हणाली, " तिकडून सागायचे झाले वाटते तुला असे ? "

नरेन्द्र मृदु हास्य करून म्हणाला, " अ ह ! गगनबाबूनीं नाही मला सांगि-तले असें. मीच आपला तुला विचारीत आहे ! "

विमला आरक्त मुखानें म्हणाली, " तुम्हा पुरुषाबरोबर तटाभांडण कोण करू शकणार ? कधी काळीं प्रसग उपस्थित झालाच, तर मग शेवटी हातांपाया पडून, नाक घांसून—पण हे काय, कोण आहे तें दाराजवळ ? "

" कोणी नाही, मी आहें ! " गगनबाबूनी हसत हंसत आत प्रवेश करीत म्हटलें. " हं चालूद्या, चालूद्या ! भाषण अर्ध्यांतच कां थाबविलें ! सांगा कीं भाडण झाल्यास शेवटीं कोणाला नाक घांसावे लागतें तें ! —कोणतीही गोष्ट अशी अर्धवट ठेवणे बरें नाहीं. हं चालूं द्या ! "

"लोकाच्या गोष्टी दाराआड उभें राहून ऐकणाऱ्या सज्जनांच्या प्रश्नांचे उत्तर दिलेंच पाहिजे असा निर्बंध नाहीं ! " असें बोलून, कृत्रिम कोपाच्या पडद्याखालीं मुखावर पसरलेलें हास्य लपविण्याचा प्रयत्न करीत, विमला द्रुत गतीनें निघून गेली ! नरेन्द्राने एक सुदीर्घ निश्वास सोडला. तो पुन्हा उशीला पाठ टेकून अंथरुणावर बसत आहे, इतक्यात गगनबाबू त्याच्याकडे वळून म्हणाले, " कसें काय ? आज प्रकृतीचें मान कसें आहे ? "

"ठीक; आतां मी अगदीं खडखडीत बरा झालो आहें ! आतां घरीं परत जाण्याकरता मला तुमची परवानगी पाहिजे आहे ! यापुढें तुम्हाला त्रास देण्यात कांहीं अर्थ नाहीं ! " नरेन्द्र म्हणाला.

" इतक्यांत घरीं परत जाणार ? छट्! भलतेंच कांहीं तरी ! अहो, तुमच्या बहिणीच्या सहवासात मनुष्य जितके दिवस घालवील, तितकीं वर्षे त्याचें आयुष्य वृद्धिंगत होते, ही गोष्ट आहे का तुम्हाला ठाऊक ? "

" नाही. ही गोष्ट मला आजच प्रथम कळते आहे. तरी पण, मला तिच्या सत्यतेबद्दल मुळीसुद्धा संशय नाहीं ! " नरेन्द्र हसून म्हणाला.

दोन्ही नेत्र विस्फारित करून गगनबाबू म्हणाले, " अहो, तुम्हाला अजून अनुभव नाही, म्हणून असे बोलता ! परंतु माझ्या बाबतीत तर ही गोष्ट सप्रमाण सिद्ध झाली आहे. म्हणून माझा तिच्यावर एवढा विश्वास आहे ! तुम्हाला अगदीं खरें तेंच सांगतो मी, नरेन्द्रबाबू, असें रत्न या संसारात दुर्लभ आहे ! मला तें सांपडलें, हे मी माझें महद्भाग्यच समजतो ! वास्तविक पाहता, माझे दैव कधीं-काळी असें उदयाला येईल अशी स्वप्नातसुद्धा मला शंका आली नव्हती !—पण हे काय, मी हे सर्व वेड्यासारखा तुमच्याजवळ काय सांगत सुटलों आहे ! पाहिले ? माझे जेव्हा तेव्हा अगदीं अस्से होते बघा ! तिच्याबद्दल गोष्ट निघाली कीं मला मग कशाचेही भान राहत नाही !—जाऊ द्या ! याच कारणाकरिता मी तुम्हाला सांगतो, की इतक्यात घरीं जाण्याचे नाव काढू नका ! असें घर सोडून गेलांत, तर स्वर्गात सुद्धा तुम्हाला आराम वाटणे अशक्य आहे, काय समजला ?"

विमला काही फार लांब गेली नव्हती. जे कृत्य केल्याबद्दल तिनें आपल्या पतीवर सज्जनपणाचा आरोप केला होता, तेच गर्हित कृत्य स्वतः आचरणात आणतांना तिला कसलीही शंका आली नाही ! खोलींतील पडद्या आड उभी राहून ती सारे संभाषण ऐकत होती; एवढेच नव्हे, तर संधि साधून, मधून

मधून हळूच त्या उभयतांकडे डोकावून पाहण्यास देखील कमी करीत नव्हती ! या वेळीं तिनें हळूच मान बाहेर काढून नरेन्द्राकडे पाहिलें. त्याचें मुख एक क्षणभरच उद्दीपित दिसून, पुन्हा दुसऱ्या क्षणीच उदासीनतेमुळें म्लान दिसू लागलें !

[ ४ ]

यानंतर सरासरी पधरा दिवसांनी, इन्दू कमलला घेऊन मेदिनीपुराहून परत आली. स्त्री आणि कन्या या उभयताची शरीरप्रकृती उत्तम आहे असे पाहून नरेन्द्राला फार बरें वाटलें. त्याच्या शीर्ण पांशुवर्ण मुखावर आनदाची उज्वल आभा चमकूं लागली. प्रेमभरानें कन्येला हृदयाशीं धरून तिला कुरवाळीत त्यानें इन्दूला विचारलें, " कसें काय ? तुझी प्रकृती तर आतां बरी आहे ना ? "

" होय. बरी आहे. का बरे ? "

" ताप आला होता असे तुझ्या पत्रांत वाचल्यापासून माझ्या अतःकरणांत काळजीनें सारखें ठाणे दिले होते ! आतां तर अगदीं पूर्णपणे प्रकृती ताळ्यावर आली आहे, असे वाटतें ना ? "

" नाही तर काय डॉक्टरला बोलावणे पाठविणार ? "

नरेन्द्राचें सहास्य मुख एकदम मलिन दिसूं लागलें ! तो अप्रतिभ होऊन म्हणाला, " तसें नव्हे ! सहज विचारलें, एवढेंच ! "

" कोरडी विचारपूस करण्यात काय हांशील आहे ? पाहिलें, तर, पैसे पाठविण्याबद्दल पत्र धाडले तेव्हां पन्नास रुपड्या पाठवून दिल्या ! बाकी पत्रामागून पत्र पाठविण्याचा सारखा क्रम सुरू होता ! प्रत्येक पत्रात–प्रकृति कशी आहे?—तब्येतीला नीट जपत जा.—मुळीसुद्धा हयगय होऊं देऊं नकोस ! मी आतां लहान पोर का आहें, असा जेव्हा तेव्हां उपदेशाचा भडिमार चालू ठेवायला ? आणि पाठवून पाठवून पाठविले किती, तर सारे पन्नास रुपये ! ते मला दादाकडून मिळाले नसते कीं काय ? जास्त नव्हते, तर तेवढे तरी रुपये पाठविले कशाला म्हणते मी ? त्यामुळें साऱ्या माणसाच्या देखत खालीं मान घालण्याचा प्रसंग आला माझ्यावर ! सारा दिवस थट्टेला दुसरा विषय नव्हता अगदीं !"

नरेन्द्राचे म्लान मुख जास्तच म्लान झालें ! " खालीं मान घालून अस्फुट स्वरांत तो म्हणाला, "काय करूं? जास्त रुपयांची व्यवस्था होऊं शकली नाहीं ! म्हणून— !"

" व्यवस्था झाली नाहीं, तर फक्त तसे कळवूनसुद्धा चाललें असतें ! मग हे तरी कशाकरितां पाठविले ! झाली आता पुन्हां त्याच पूर्वक्रमाला सुरवात ! आज हें नाहीं, उद्या तें नाहीं;—आज हें पाहिजे, उद्या ते पाहिजे ! इतके दिवस होतें दादाच्या घरीं, तेंच बरे होतें ! येथे येऊन जीव पुन्हां सापडला या चक्रांत ! शिव शिव ! वास्तविक, श्रीमतांच्या मुली गरिबांच्या घरी पडण्यासारखें महत्पाप संसारांत दुसरें नाहीं !" असे बोलून, आपल्या भाषणाची सत्यता पतीला पूर्णपणें पटवून देऊन इन्दू दुसरीकडे निघून गेली !

सरासरीं दीड महिन्याच्या वियोगानंतर पतिपत्नींची हीच प्रथम भेट !

बाहेर आल्यानतर, कांहीं वेळ इंदू इकडे तिकडे भटकून आपल्या शय्यागृहांत शिरली ! पाहते, तों घरांतील इतर खोल्यांप्रमाणे, या खोलीतही साफसूफ करण्यांत आलें असून, सर्व सामान नीट व्यवस्थितपणे मांडण्याचे कार्य चालू होते !

काम करीत असलेल्या मोलकरणीला इन्दूनें प्रश्न केला, " काय ग, ही सारी व्यवस्था कोणाकरता चालली आहे ?"

नवीनच नोकरीस राहिलेली मोलकरीण म्हणाली, " आपण येणार म्हणून !"

"काय ? मी येणार म्हणून माझ्याकरितां ही सर्व तयारी चालली आहे ?"

"होय बाईसाहेब. मालकाचा तसाच हुकूम आहे ! आपल्याला घाणेरडेपणा किंवा अव्यवस्था मुळीसुद्धा सहन होत नाहीं—म्हणून आज तीन दिवस झाले—"

इन्दूचे अत.करण गर्वाने भरून आलें. आपल्या आवडीनिवडीकडे एवढें बारीक लक्ष पुरवून आपल्या स्वागताची तयारी चालू असलेली पाहून तिला एकप्रकारचा अभिमान वाटला. तरी पण, तसे काही न दाखवितां, ती अगदीं सहजभावानें मोलकरणीकडे वळून म्हणाली, "खरे आहे ते ! घरात घाण कोणाला सहन होईल ? तेव्हां हें बरेच झाले—!"

"होय बाईसाहेब ! बरें झालें. वर, खालीं, झाडून पुसून अगदीं स्वच्छ झालें आहे !"

"बरें आतां तूं त्या राम्याला हांक मार पाहूं एकदां. म्हणावें, बाजारांत जाऊन थोडी फळफळावळ विकत घेऊन ये !"

" तें सर्व मघाच आणून ठेवलें आहे ! आज सकाळींच मालक स्वतः बाजारांत गेले होते ! येतांना, त्यांनीं सारें कांहीं आणलें आहे !"

"असें का ? आंबे आणले आहेत ? आणखी द्राक्षें ?"

"हो ! हो ! ते सारें कांहीं आणलें आहे ! ही पहा घेऊन आलेच मी !" असे म्हणून मोलकरीण निघून गेली विरक्तीमुळे उद्भवलेला मेघ, अनुकूल वारे वाहताच, मुखपटलावरून उडून गेला ! आपल्याबद्दल एवढी काळजी बाळगणाऱ्या पतीबद्दल आता तिचा पूर्वीचा ग्रह बदलून त्याच्याबद्दल निराळें मत उत्पन्न झाले ! थोड्या वेळापूर्वी तिच्या दृष्टीसमोर आलेलें पतीचें मलिन मुख आतां तिच्या अत श्वक्षू पुढे उभें राहून, तिच्या हृदयात कालवाकालव होऊ लागली ! त्याच्याशी केलेल्या कठोर वर्तनाचा तिला आता पश्चात्ताप होऊ लागला !

सर्व स्थिरस्थावर झाल्यानतर, थोड्या वेळाने इन्दूनें नरेन्द्राच्या खोलींत हंसत मुखाने प्रवेश केला ! पाहते, तों नरेन्द्र डोळ्याला चष्मा लावून, टेबलावर वाकून लेखनात अगदीं गढून गेला होता ! इन्दू म्हणाली, "कशाचे लेखन चालले आहे एवढे ? कविता का आहे ?"

नरेन्द्र तिच्याकडे दृष्टि वळवून म्हणाला, "अ हं ! कविता नाही !"

"मग काय आहे दुसरे ?"

"काही नाही, ते आपले उगीच कांहीं तरी......!"

असें म्हणत म्हणत, त्याने टेबलावरील इतस्तत पसरलेले कागद नीटपणें गोळा करून टेबलाच्या खणात ठेवून दिले !

इन्दूच्या प्रसन्न मुखमडलावर पुन्हा मेघ जमू लागले. ती किंचित् विकृत स्वरात म्हणाली, "असे आहे, तर मी म्हणतें या भलत्याच भानगडींत अशी उरस्फोड मेहेनत करण्यापेक्षा, हे दु खकष्ट नाहीसे होतील असा दुसरा एखादा उद्योग केलेला काय वाईट ? मेदिनीपुरास दादाच्या हाताखाली पुष्कळ चागल्या चागल्या नोकऱ्या आहेत !" असे बोलून ती पतीच्या मुखाकडे तीक्ष्ण दृष्टीनें पाहू लागली ! 'दादाच्या हाताखालची नोकरी' म्हणजे, इन्दूच्या हातांत असलेलें, नरेन्द्राला प्रहार करावयाचे नेहमींचे तीक्ष्ण शस्त्र ! नरेन्द्राच्या मानी अतःकरणाला ही कल्पना अत्यत तापदायक होते, हे तिला पूर्णपणे ठाऊक होतें, म्हणूनच या प्रसगीं तिने आज त्या शस्त्राचा उपयोग केला ! परतु आज, या आघातामुळे उत्पन्न होणाऱ्या वेदनेचे चिन्ह त्याच्या मुद्रेवर कोठेच आढळेना ! नरेन्द्राने अगदीं शातपणे उत्तर केले, "नोकरी करणारीं माणसेंसुद्धा तेथे हवीं तेवढी आहेत !"

हे अगदीं अनपेक्षित उत्तर ऐकून इन्दूचा क्रोध भडकला ! पूर्वी कधींच दृष्टीस न पडलेले नरेन्द्राचें हे धाडस पाहून, कांहीं काळपर्यंत ती स्तभित होऊन

स्तब्धपणे उभी राहिली; नंतर तीव्र स्वरात म्हणाली, " तें मलाही ठाऊक आहे! नोकरी करायला तेथे माणसे आहेत, आणखी येथे नाहीत वाटतें! आजकाल बऱ्याबद्दल सांगितलेल्या गोष्टी रुचत नाहीतसे दिसते! घरात अठरा विश्वे दारिद्र्य भरलें असता, एका कोपऱ्यात बसून दिवसरात्र कविता खरडीत बमण्यास लाज कशी वाटत नाही मनाला, कोणाला ठाऊक? " असे म्हणून, रागाने पाय आद-ळीत ती बाहेर निघून गेली!

ही भेट नंबर दोन!

* * *

" आ? हे कोण? वहिनी? केव्हा झाले आगमन? "

" परवा दोन प्रहरी! "

" परवा दोन प्रहरीं! मग एवढया घाईघाईनें आज संध्याकाळी दर्शन दिलेंत? वा:! फार चांगलें! नको बाई वहिनी! प्रेमाचा असा जबरदस्त पूर वाहूं देणें चांगले नाही! ओढा थोडा कमीच करायला हवा! " विमला हसत हंसत थट्टेने म्हणाली!

इंदूने गंभीरपणा कायम ठेवून उत्तर दिले, " पत्र धाडलें, त्याचे उत्तरदेखील लिहावयाला वेळ मिळत नाही तुम्हाला; मग माझा एकटीचाच ओढा किती दिवस-पर्यंत टिकाव धरू शकणार? वन्स, या गोष्टी म्हणजे परस्परावर अवलंबून असतात! "

विमलनें आश्चर्यचकित होऊन प्रश्न केला, " म्हणजे मी धाडलेले तुमच्या पत्राचे उत्तर तुम्हाला मिळालें नाही? "

इन्दू म्हणाली, " अ! तसे उत्तर मिळून न मिळाल्यासारखेच, दुसरे काय? अहो, चार पानाच्या पत्राचे उत्तर, काहीं नाही तरी निदान चार ओळीत तरी द्यायला पाहिजे होते? "

विमला काहींशी अप्रतिभ होऊन म्हणाली, " काय सांगूं बाई वहिनी, त्या आजारी माणसाची सेवाशुश्रूषा करतां करताच मला पुरेवाट झाली होती बाई! वेळ कसा तो मुळीदेखील मिळत नव्हता! इकडे माझ्या घरी पहावे, तर दादा हा असा भयंकर आजारी! तो थोडासा बरा होतो न होतो, तोच आमच्या त्या पलीकडच्या घरात आलेला नवा भाडेकरी—त्याची अगदीं आत्यंतिक अवस्था! अशा स्थितींत तुमच्या पत्राचें लांबलचक उत्तर लिहायला मला वेळ कुठून सांपडणार, तुम्हीच सांगा पाहूं? "

इन्दूला विमलेच्या या भाषणाचा काहींच अर्थ कळेना! ती वेड्यासारखी तिच्याकडे नुसती पहातच राहिली! नरेन्द्राच्या आजारासंबंधानें ती अजूनसुद्धां पूर्ण अज्ञानातच होती!

परतु विमलेनें इन्दूच्या मनस्थितीकडे मुळींसुद्धां लक्ष दिले नाहीं. ती आपलें भाषण पुन्हा सुरू करून म्हणाली, "तुम्हाला काय सागू वहिनी, तो मंगळवारचा दिवस माझ्या आठवणींतून कधींही नाहींसा होणे शक्य नाही! दादा सात आठ दिवसपर्यंत एकटाच, अगदी असहाय अवस्थेत घरीं अत्यवस्थ होऊन पडला होता! त्याचा निरोप येताच मी तातडीनें त्याच्याकडे गेले, पाहते तो काय? त्याला अथरुणावरून उतरतां येणेदेखील जड वाटूं लागलें होतें! त्याची अशी दुर्दशा पाहताच मी ताबडतोब त्याला येथे घेऊन आलें. येथे आल्यानतर दोनच दिवसानतर त्याच्या छातींतील दुखणें असें वाढले म्हणतां, कीं त्या वेळी आम्हा सर्वांच्या तोंडचे पाणी पळालें अगदीं! दैवयोगानें, अगदी त्याच दिवशीं तिकडे त्या अबिका बाबूचा आजारही अगदी पराकाष्ठेला पोहोचला होता! त्याच्या घरात त्याच्या एक बायकोखेरीज दुसरा मनुष्यप्राणी नाही! आणि ती तरी काय? अगदींच पोरसवदा! त्या दिवशी या दोघां रोग्याची शुश्रूषा करतां करता आमची कोण तारांबळ उडाली म्हणतां वहिनी! ती सबंध रात्र आणि दुसरा दिवस मिळून घरातील एकाही माणसाच्या डोळ्याला डोळा नाही, कीं पोटांत घांसभर अन्न नाहीं! फोमेन्ट करता करता हात कसे आंबून गेले होते अगदीं! आम्हा सर्वांच्या सुदैवानें त्या प्रसगातून दोघेही सुखरूपपणें निभावले बाई! पण, मी तुम्हाला खरच सागते वहिनी! खरी सती—साध्वी म्हणावें त्या अबिकाबाबूंच्या पत्नीला! म्हणावयाला ती एवढीशी अजाण पोर आहे, परंतु पती आजारी असताना त्याच्याकरता तिनें सोसलेले कष्ट आठवले, म्हणजे तिची कमाल वाटते अगदीं! मला तर असे वाटते, कीं, तिचे पुण्य आडवे आलें म्हणूनच या प्रसगांतून तिच्या पतीची धडपणें सुटका झाली! नाहीं तर डॉक्टरांची आणि वैद्याची काय प्राज्ञा होती! छे, छे, छे! तो प्रसग आठवला, म्हणजे अजूनसुद्धा अगावर शहारे येतात अगदीं!"

"हे अबिकाबाबू कोण?"

"कोणाला ठाऊक; तिकडे लांबच्या कोठल्या एका खेडेगांवांत त्यांची मूळ वस्ती आहे! आजार जास्त वाढला, आणि तेथें औषधपाण्याची काहींच व्यवस्था

नाहीं,—तेव्हां ते येथे येऊन राहिले ! त्या पलीकडच्या—आमच्याच घरी ते भाड्यानें येऊन राहिले आहेत ! घरात त्या बायकोखेरीज दुसरें कोणी नाहीं;–पैशाच्या दृष्टीनेंसुद्धां त्यांची स्थिति मोठीशी समाधानकारक नाहीं !—अशा स्थितींत—"

तिचें भाषण पूर्ण न होऊ देतां, इन्दूनें मध्येंच प्रश्न केला, " तुमच्या दादाची प्रकृती फारच अस्वस्थ झाली होती वाटतें ? "

विमला ओष्ठाधर आकुञ्चित करून म्हणाली, " त्या रात्री तर बाई माझ्या तोडचें अगदीं पाणीच पळालें होतें बघा ! दैवानेंच खैर केली, नाहींतर काय प्रसग ओढवला असता देव जाणे ! हेच पहा ना, या औषधाच्या बाटल्या किती जमल्या आहेत त्या, ह्या कपाटांत ! एक नाही, दोन नाहीं—तीन तीन डॉक्टर एका वेळीं औषध देत होते ! परमेश्वराचीच कृपा, म्हणून सर्व काही यथास्थितपणे पार पडलें ! पण ह्या सर्व भानगडी तुम्हाला दादानें पत्रांतून कळविल्या असतीलच !"

इन्दूनें मान हालवून, अन्यमनस्क भावानें उत्तर दिले, " अ, ह ! पत्रात या संबधी काहीं उल्लेख नव्हता ! "

विमलनें प्रश्न केला, " मग काय, आता मी सांगितले तेव्हाच कळले वाटतें तुम्हाला ? "

इन्दूने पूर्ववत् उत्तर दिलें, " हो. "

विमलेने पुन्हा नरेंद्राच्या आजाराबद्दल हकीगत सागावयाला सुरवात केली. ती म्हणाली, " मी सुरवातीलाच तुम्हाला तार करणार होतें. म्हटले मेदिनीपूर कांहीं येथून फार लांब नाही ! फार फार झाले तर दोन अडीच तासाचा प्रवास ! तेव्हां म्हटलें, तुम्ही अगदीं सहज येऊं शकला असता ! त्याच्या प्रकृतीला थोडा आराम वाटल्यानतर, वाटल्यास तुम्हाला पुन्हा परत जाता आले असतें ! परंतु दादा कांहीं केल्या मला तार पाठवूं देईना ! त्यामुळे माझा अगदीं नाइलाज झाला बघा, वहिनी ! " नंतर किंचित् हसून ती पुढे म्हणाली, " त्याला तुम्हीं कोणती मोहिनी घातली आहे, काही कळत नाही बाई ! तुम्हाला अगदी किंचित् सुद्धां त्रास झालेला त्याला पाहावत नाही ! त्याच्या आजाराबद्दल वार्ता ऐकून तुमच्या चित्तास अस्वस्थता वाटेल, या एका कारणाकरताच त्याने तुम्हाला तार पाठविण्याची मला मनाई केली !-पण जाऊं द्या त्या गोष्टी !-ईश्वराने शेवट गोड केला, यांतच सारें कांहीं मिळविलें !-नाही तर—"

विमलेचे हें भाषण सुरू असतांना, इन्दूच्या हृदयांत कांहीं निराळीच खळबळ सुरू होती! अगदीं जिवावरचा आजार गेला असतांना सुद्धा नरेन्द्राला तिला बोलावणे आवश्यक वाटले नाहीं, हा आपला अपमान झाला असे तिला वाटलें! अशा प्रसगी, पतीनें प्रत्यक्ष पत्नीला दूर ठेवणे, हे कशाचें निदर्शक आहे, ते न कळण्याइतकी इन्दू मूर्ख नव्हती! विमलेच्या भाषणाचा शेवटचा भाग कानी येऊन ती रुक्ष स्वरात म्हणाली, "नाही तर काय झालें असते वन्स? आजार बरा होण्याकरता माझी आवश्यकता भासली नाहीं!—तो बरा झाला नसता, तरीसुद्धां माझी आवश्यकता वाटण्याचें काय कारण होतें?" इतके बोलून ती उठली, व औषधाच्या कपाटाजवळ जाऊन त्यात ठेवलेल्या सपूर्ण किंवा अर्धवट रिकाम्या बाटल्या एक एक उचलून, त्यावर लिहिलेलीं औषधाचीं नावे वाचू लागली!

परतु हे काय? आजपर्यंत कधींही न घडलेली गोष्ट आज कां बरे घडून आली? त्यामुळे हातांतील बाटलीवर लिहिलेले औषधाचें नाव तिला दिसेना! पुन्हा पुन्हा एकच विचार तिच्या अत करणात गोंधळ घालू लागला! तिच्या पतीच्या जिवावर एवढें मोठें सकट येऊन निघूनसुद्धा गेले, तरी तिला त्याचा पत्ता लागू नये, याचा काय अर्थ? नरेन्द्राने तिची अशी उपेक्षा का केली? ती त्याची कोणीच नाही का? ती स्वतः आजारी असल्यामुळे, आपल्या आजाराबद्दल बातमी कळवून तिच्या चित्तात व्यग्रता उत्पन्न करणें योग्य नाही, असा विचार करून, त्याने तिला ही गोष्ट कळविली नसावी, असे म्हटलें, तरी तिचा ह्या गोष्टीवर विश्वास बसेना! एवढ्या मोठ्या सकटाबद्दल वार्ता न कळविण्याइतकी ती आजारी नव्हती हे खास! बरें, तसें म्हटले तर ती बरी झाल्यानंतरसुद्धा तिला नरेन्द्राकडून कितीतरी पत्रे आलीं होती. त्यापैकीं एकाही पत्रांत याबद्दल नामनिर्देश नाहीं, हें कसे? विस्मृति म्हणावी, तर फारतर एकदोन वेळां! प्रत्येक पत्र लिहिताना स्वतःच्या आजारासबंधी उल्लेख करण्याचें स्मरण राहिले नाहीं, हे तिला संभवनीय वाटेना! बरे. ते एक असो! काहीं कारणामुळे ही गोष्ट तिला तिच्या माहेरीं कळविण्यात आली नसेल! परतु ती परत आल्यानतर तरी तिला याबद्दल बातमी कळविणे आवश्यक होतें किंवा नाहीं? तिला येथें येऊन आज तीन दिवस झाले; या तीन दिवसात केव्हा तरी नरेन्द्रानें हे तिला कळवावयास पाहिजे होते!

इन्दूच्या तीव्र अभिमानाचा सूर विमलेच्या कानीं आल्याखेरीज राहिला नाहीं! तरी तिच्याकडे मुद्दाम दुर्लक्ष केल्यासारखें करून ती म्हणाली, "त्या बाटल्या उलटपालट करून काय पाहतां आहांत वहिनी? मी सागितले त्यावर तुमचा

विश्वास बसत नाहीं वाटत ! तसें असेल, तर खुशाल परीक्षा करून पहा; त्या बाटल्या माझ्या वतीनेंच साक्ष देतील, याबद्दल मला तिळमात्र संशय नाहीं. बरें चला. राहू द्या त्या बाटल्या आतां ! तो बघा चहा तयार झाला ! चला, या. "

" चला. " असें म्हणूनें इन्दूनें हळूच अश्रुबिंदु पुसून टाकले व तिच्या शेजारीं येऊन उभी राहिली !

चहापान झाल्यानंतर कांहीं वेळानें, विमला मुद्दामच, इन्दूला टोमणा मारण्याच्या हेतूनें म्हणाली, "मी तुम्हाला सांगते, ती आपली एक क्षुल्लकच गोष्ट आहे वहिनी ! दादाच्या त्या आजाराच्या वेळचीच गोष्ट ! ह्या एकाच घरात दोन रोगी; परंतु दोघेही अगदी दोन टोंकाला ! उभयतांच्या मन स्थितीत एका काडीइतकें तरी साम्य असेल, तर शपथ ! दादा अगदी मरायला टेकला, तरी त्याबद्दल गंधवार्तासुद्धा तुम्हाला कळू नये, याबद्दल त्याची कोण खटपट !— कारण, त्यामुळे तुम्हाला उगाच काळजी उत्पन्न व्हायची. अगोदरच तुमची तब्येत नादुरुस्त ! आणि तिकडे पहावें, तों अंबिकाबाबू एक क्षणभरसुद्धा पत्नीला नजरेआड होऊ देत नव्हते ! त्याची अगदीं अशी पूर्ण खात्री होती, कीं, एकदां त्यांची पत्नी दृष्टीसमोरून दिसेनाशी झाली, कीं मग त्याचे प्राण शरिरात राहणें शक्य नाहीं ! अहो, इतर गोष्टी तर राहू द्या बाजूला, परंतु तिने स्वतःच्या हातानें पाजल्याखेरीज ते औषधच मुळी घेत नव्हते !—असा प्रकार तुमच्या कानीं कधी आला होता का वहिनी ? तिकडच्या स्वभावाबद्दल तुम्ही सर्वच माझी नेहमीं थट्टा करता, परंतु या बाबतींत अंबिकाबाबू म्हणजे सर्वांचे मुकुटमणी शोभतील ! पतीची शुश्रूषा करता करता बिचाऱ्या पोरीचे हाड न हाड खिळखिळे होऊन, तोंडावर प्रेतकळा आली आहे अगदीं !"

" हूं. " म्हणून इन्दू उठून उभी राहिली. ती म्हणाली, " बरें आहे वन्सं, पुन्हा एखादे दिवशी आले, म्हणजे तुमच्या त्या सती-साध्वीला मुद्दाम भेटून पुष्कळ वेळपर्यंत गोष्टी बोलत बसूं, हवें तर ! पण आज आता फार उशीर झाला !—ती बघा गाडीदेखील केव्हाची येऊन उभी आहे ! येते मी आता !'

"जरा थांबा, कुंकू लावतें ! पण पुन्हा केव्हा तरी लवकरच यायला विसरू नका हो ! माझी पूर्ण खात्री आहे, तिची भेट घेऊन तुम्हाला आनंद वाटल्याखेरीज कधीही राहणार नाहीं ! मग याल ना ?"

" हो. हो. अगदीं अवश्य येईन !" कपाळाला कुंकू लावीत असतां इन्दू म्हणाली, " पाहूं या, तिच्याजवळून मला कांहीं शिकता येणे शक्य आहे का ?

इन्दू जाऊन गाडींत बसली! तिच्या मुखावर गभीरता पसरली होती. तिच्या पतीनें तिच्याबद्दल दाखविलेल्या प्रेमळ आस्थेपेक्षा, अबिकाबाबूचा स्त्रैण पागलपणाच आज तिला विशेष आवडत होता! अबिकाबाबूंच्या निरीह आतुरतेपुढें नरेन्द्राची सहानुभूति तिला कमी वाटू लागली!

[५]

यानंतर दोन दिवसानीं विमलेची व इन्दूची पुन्हा भेट झाली. त्या प्रसंगीं बोलतां बोलतां, अत्यत विरक्त होऊन इन्दू म्हणाली, " मी माझें खरें मत सांगू का वन्स? तुमच्या दादानें लग्न करण्यात चूक केली, असेच मला वाटतें! अबिकाबाबूनीं सुद्धां लग्न करण्यात मोटासा शहाणपणा दाखविला असें मला वाटत नाहीं!"

विमला म्हणाली, " का बरे?"

" कारण हेंच, की स्त्रीचे प्रतिपालन करण्याची क्षमता अगी असल्याखेरीज पुरुषानें लग्न करणे म्हणजे महत्पाप होय!"

हें उत्तर ऐकून विमलेच्या अत:करणावर अगदी मर्मांतिक आघात झाला! इन्दूवर तिचें खरोखरच अत करणपूर्वक प्रेम होतें! पति-पत्नीयोगासबधी तिचीं आत्यतिक तीव्र मतें तिला आवडत नसत, व वेळ आली म्हणजे ती तिचा प्रतिवाद करण्यासही मागें पुढें पाहत नसे! इतकेंच नव्हे, तर कित्येकदा तिला इन्दूचा अत्यंत रागसुद्धा येत असे. तरी पण या सर्वांच्या मुळाशी तिच्या अतःकरणांत वसत असलेले इदूबद्दलचें प्रेमच होते! त्याच इन्दूच्या मुखावाटे आज असे भलतेच शब्द निघालेले ऐकून तिला फार वाईट वाटले. कांहीं वेळानंतर ती रुक्ष स्वरांत म्हणाली, " नुसत्या वादाखातर, तुमचें म्हणणे अबिकाबाबूच्या बाबतींत खरें आहे, असे एकवार मी कबूल करीन! परंतु तसें झाले तरी, त्यांच्या पत्नीनें कर्तव्यपालन करू नये की काय? आमरणपर्यत पतीची सेवा करीत राहणे हाच तर पत्नीचा सत्य धर्म आहे! त्याप्रमाणे वर्तन करण्यात तिची चूक आहे असें तुम्हाला कां वाटतें?"

" पत्नीधर्माबद्दल तुमची व्याख्याच मुळी मला योग्य वाटत नाही! पुरुषानें अन्याय्य आचरण करावे, ज्या गोष्टी करण्याचा त्याना काहीं अधिकार नाही, त्या अगदी खुशाल कराव्या,—आणि त्याचे दुष्परिणाम भोगायला मात्र स्त्रियानीं आपली मान पुढें द्यावी? हा कोठला न्याय? एकाच्या पापाबद्दल दुसऱ्याला काय म्हणून प्रायश्चित्त? वन्स, तुम्ही इग्रजी शिकलां नाही—या बाबतींत तुम्ही निराळ्या

दृष्टीनें कधीं नीट विचार केलेला नाहीं, म्हणून तुम्हाला माझीं मतें चमत्कारिक वाटतात! परंतु तुम्ही थोडा विचार करून पहा, म्हणजे माझ्या बोलण्याची सत्यता तुम्हाला पटल्याखेरीज कधींही राहणार नाहीं! अहो, कर्तव्यपालनाची जबाबदारी स्त्रीपुरुषाच्या जोडीपैकीं जेवढी एकावर तेवढीच दुसऱ्यावरही असते, हें नाकबूल करून चालायचें नाहीं! कर्तव्यपालन होईल, तर दोन्ही बाजूंनीं होईल; नाहीं तर अजीबात होणार नाहीं! हे तत्व आपल्याला पटावे अशी इच्छा पुरुषांच्या मनात केव्हाही उत्पन्न होत नाही, कारण तसें करतांना त्याच्या स्वार्थाचा प्रश्न आडवा येतो! आणि ही जाणीव आपल्या अतःकरणात उत्पन्न होत नाहीं, म्हणूनच अबिकाबाबूंच्या पत्नीप्रमाणें, स्त्रिया स्वतच्या जिवाकडे न पाहता पतीची सेवा करतात!"

किंचित् कालपर्यंत तिच्या मुखाकडे पाहून विमला म्हणाली, " वहिनी, दे वाण घे वाण करताना बाजारात लागू पडणारे रुक्ष कायदे, जिवाभावाच्या प्रेमससारातही खरे ठरवूं पाहणे योग्य होणार नाही! तसें करण्याचा प्रयत्न करणें, म्हणजे आपल्या हृदयाची अनुदारता व्यक्त करण्यासारखें आहे! स्त्रीला पतीची सेवा करण्यात कष्ट पडतात,–दु:ख होते, असें का तुम्हाला वाटते? वहिनी, अबिकाबाबूंच्या पत्नीच्या शारीरिक क्लेशाचा तुम्ही विचार केला, परंतु त्यामुळे उत्पन्न होणाऱ्या तिच्या हृदयातील आनदलहरींचा खळबळाट तुम्हाला ऐकू आला नाहीं!"

" तो ऐकू यावा अशी माझी इच्छाही नाहीं!"

" पतिप्रेम म्हणजे काय, ह्या गोष्टीची ओळख पटावी, अशीदेखील तुमची इच्छा नाहीं वाटत?"

" नाही! —वन्स, ती ओळख करून घ्यावी, अशी माझी खरोखरीच इच्छा नाही! मला त्या गोष्टीचा अगदीं कंटाळा आला आहे! आला तेवढा अनुभव पुरे, असें वाटू लागले आहे! आता त्या प्रेमाची ओळखही नको, आणि तो संसारही नको! कर्तव्याला बेभान न होतां, एकदाचा आयुष्याचा शेवट गाठला म्हणजे मिळविली!"

विमला उभी होती, ती हें वाक्य ऐकून हळूहळू खालीं बसली! कांहीं वेळानें एक दीर्घ निश्वास टाकून ती म्हणाली, " असेंच भाषण पूर्वी एकदां तुम्ही माझ्याजवळ केलें होतें. परतु त्या दिवशीं जसा त्याचा अर्थ मला कळला नाहीं, तसा आजदेखील तो माझ्या ध्यानांत येत नाहीं! माझा दादा आपलें कर्तव्य योग्य

प्रकारे बजावीत नाही, हाच तुमचा आरोप! पण ह्याचा अर्थ काय, तो तुमचा तुम्हालाच ठाऊक! मला तर त्यापासून कांहीच बोध होत नाही! तुमचें बरेंचसें शिक्षण झाले आहे; किती तरी इंग्रजी पुस्तके तुमच्या वाचनांत आलीं असतील! तुम्हासारख्या विदुषीबरोबर वादविवाद करावा, हें मला शोभत नाहीं! तरी पण ज्या तत्त्वावर माझा अगदी दृढविश्वास आहे, तें तत्त्व आज पुन्हा एकदां सांगावें असे मला वाटते! पतीचें आचरण न्याय्य असो, अगर अन्याय्य असो, त्याच्या प्रेमाचा अव्हेर करण्याइतकी स्पर्धा कोणत्याही देशांतील स्त्रीच्या अगीं असणे मला संभवनीय वाटत नाही! माझे असे ठाम मत आहे, कीं स्त्रीने आपल्यावर असलेलें पतीचे प्रेम नष्ट होऊ देण्यापूर्वी जीव द्यावा हे फार बरे! तिला त्या-खेरीज जगात दुसरा तरणोपाय नाही! एकदा पतिप्रेम नष्ट झाल्यानतर स्त्रीनें जिवत राहणे, म्हणजें तिची निव्वळ विडंबना आहे!"

"मला मुळींच तसे वाटत नाही!"

"असें असणे शक्य नाही!" इतके बोलून विमला हसू लागली! एकाएकीं तिच्या मनांत आले, कीं हा वेळपर्यंत इन्दू आपली थट्टा करीत असून, तिच्या भाषणात सत्याचा लवलेशही नव्हता! तिने प्रगट केल्याप्रमाणे एखाद्या स्त्रीचीं मतें असू शकतील, ही कल्पना सुद्धां तिला शक्य वाटेना! ही निव्वळ थट्टा आहे, ह्या विचारानें तिच्या क्षुब्ध अंतःकरणाला बरीच शांतता प्राप्त झाली! विनोदा-खेरीज इतर संभाषणात कोणतीही स्त्री असे शब्द मुखावाटे उच्चारणार नाहीं, अशी खात्री पटून ती पुन्हा इन्दूकडे वळून हसत हसत म्हणाली, "तुमच्या साऱ्याच गोष्टी मुलखावेगळ्या आहेत बाई, वहिनी! बरं तर बरं; हे सारें माझ्या-जवळच बोललांत! एखाद्या तिऱ्हाइताजवळ असल्या गोष्टी सांगितल्या असत्या, तर त्यानें तुम्हाला काय म्हटलें असतें, देव जाणे! दादापुढें तरी तुमच्या ह्या विनोदाच्या प्रकाराला आळा घाला. नाहीं तर त्याला हे सारें खरे वाटून, एखादे वेळीं भलताच प्रसंग ओढवायचा! कारण पुरुषाची जात, वाटेल तशी बुद्धिवान असली तरी पण एखादे वेळीं...............!"

"काय?—एखादे वेळी काय?"

"दुसरें माणूस थट्टेनें बोलतें आहे की काय, हें त्यांना ओळखता येत नाहीं!"

"ते त्याचे त्यानीं आपले पहावें! दुसऱ्यानें काय करावे, आणि काय करूं नये, ह्या गोष्टीची उठाठेव मी कशाला करूं?"

" तुम्हाला ती उठाठेव करण्याचें काहीं कारण दिसत नसेल कदाचित, पण मला ते दिसते आहे. तुम्हाप्रमाणे मला या गोष्टीपासून अलिप्त राहता येत नाहीं ! "

" का बरे ? "

" तुम्ही रागावू नका वहिनी, पण मला जे वाटतें, तें मी मोकळ्या मनानें तुम्हाला सांगतें ! दादाच्या ह्या आजारापूर्वी—आणि तो आजारी असतांना सुद्धा—तुमच्यासाठी तो अगदी वेडा झाला होता ! तो स्वभावत:च अगदीं शात आणि गभीर वृत्तीचा असल्याकारणाने, आपल्या हृदयातील चचल मनोविकार सहसा प्रगट होऊं देत नाही ! परंतु मी त्याला अगदी लहानपणापासून ओळखतें आहें ! त्याच्या हृदयातील भावना माझ्यापासून फार दिवस लपून राहणे शक्य नाहीं ! पूर्वी म्हणजे, तुम्ही एक घटकाभर जरी त्याच्या दृष्टीआड झाला, तरी त्याच्या हृदयाला अगदी तळमळ लागून राहत असे;—पण काय झालें असेल ते त्यालाच ठाऊक, तुमच्या ठायी त्याचे तसे पूर्वीसारखे प्रेम आता राहिलें नसावें असें मला वाटते !"

इन्दूच्या मुखावर मलिनतेची कृष्णवर्ण छाया पसरली ! तिचे हृदय अगदीं शुष्क झाल्यासारखे होऊन आपला काहीं तरी अत्यंत मौल्यवान् जिन्नस हरपला, असे तिला वाटूं लागले ! तरीपण आपल्या हृदयावरील उदासीनतेचे पटल जोराने दूर सारण्याचा मुद्दाम प्रयत्न करीत, बळेच हसत हंसत ती म्हणाली, " वन्स, एवढा जंगी शोध तुम्ही लावला, याबद्दल तुम्हाला खरोखर धन्यवाद द्यायला हवेत ! तुमच्या दादांना सागा, म्हणाव त्याच्या वृत्तींत असा बदल झाला असला तरी मला त्याबद्दल कांहीसुद्धा वाईट वाटत नाहीं ! आणि माझें तुम्हालाही एक सागणे आहे. ते म्हणजे हेच कीं, माझे बरेवाईट मला स्वतःला चागले कळते. त्याबद्दल दुसऱ्याने नसती उठाठेव करून स्वत:ला शीण करून घेण्याचे कांही प्रयोजन आहे, असें मला वाटत नाहीं ! "

× × × ×

घरीं परत येऊन इन्दूनें पतीच्या खोलींत प्रवेश केला. नेहमींप्रमाणें आजसुद्धां नरेन्द्र आपल्या लेखन-व्यवसायांत गुंग होऊन गेला होता. इन्दूकडे लक्ष जाताच त्यानें लेखन थाबवून तिच्याकडे आपली जिज्ञासापूर्ण दृष्टि वळविली. इन्दूनें विचारलें, " मी मेदिनीपुरास असता तुम्ही फार आजारी होता म्हणे ? "

समोर असलेले कागद इकडे तिकडे चाळवीत नरेन्द्र म्हणाला, "नाहीं; आजारी नव्हतों तसा !—तें माझें नेहमींचें दुखणे पुन्हां उसळले होतें. एवढेंच ! "

" मग काय, डॉक्टरचा खर्च वांचविण्याच्या हेतूनें वन्संच्या घरीं जाऊन राहिला होता वाटते ? "

पत्नीच्या मुखावाटे निघालेलें हें अत्यंत कटु वाक्य श्रवणी पडतांच नरेन्द्राच्या हृदयावर कठोर प्रहार झाल्याप्रमाणे त्याला तीव्र वेदना होऊं लागल्या. एक क्षणभर, काय बोलावें तें न सुचून त्यानें आपली दृष्टि समोर पडलेल्या कागदाकडे वळविली. कांहीं वेळानें मोठ्या प्रयासानें आत्मसयमन करून तो शात स्वरात म्हणाला, " मी आपण होऊन तेथे गेलो नाही. विमल स्वतः येऊन, मी नको नको म्हणत असता, मला येथून घेऊन गेली ! "

नरेन्द्राने केलेल्या या खुलाशामुळें इन्दूचे समाधान झाल्यासारखे दिसले नाहीं ! तरीपण, तो प्रश्न तेथेच टाकून देऊन ती पुढे म्हणाली, " ते काही का असेना ? मला सागावयाचे ते एवढेंच, की, सरकारनें धर्मार्थ दवाखाने गोरगरिबाच्या उपयोगाकरिताच उघडले आहेत. ज्याच्या अगात पैसे खर्च करण्याची शक्ति नाहीं, त्यानीं त्या दवाखान्यात जाऊन रहावे, हे बरे. उगाच दुसऱ्यांवर भार टाकण्यात काहीं अर्थ नाही. "

बराच वेळ झाला, तरी नरेन्द्र टेबलावरून आपली दृष्टीही उचलीना, किंवा मुखावाटे एक शब्दही बाहेर काढीना ! इन्दूही यापुढे काही बोलली नाही. दारावरील पडद्याला एक जोराचा हिसका मारून ती बाहेर निघून गेली. त्या गडबडींत जवळच्या टेबलाला धक्का लागून, त्यावर ठेवलेले पुष्पपात्र खाली गडगडलें ! इन्दूला त्याकडे लक्ष देण्याचे कांहीं कारण वाटलें नाही ! मागे परतूनसुद्धां न पाहता, ती तशीच तडक निघून गेली !

सरासरीं पांच मिनिटांनंतर पूर्वीप्रमाणे पुन्हा एका हिसक्यासरशी पडदा एकीकडे सारून इन्दूने आत प्रवेश केला ! या वेळीं, तिचे आगमन लक्षात येऊन सुद्धां नरेन्द्रानें तिच्याकडे दृष्टि वळविली नाही ! इन्दू तीक्ष्ण स्वरात म्हणाली, " तुमच्या आजारासंबधीं वन्सं मला कळविणार होत्या; त्या वेळीं तुम्हीच त्यांना तसें करूं दिलें नाहीं. याचें कारण काय ? तुम्ही आजारी असतांना, मी तुमच्या जवळ असूं नये अशी तुमची इच्छा असण्याचें काय कारण ? मी येऊन, औषधाबरोबर विष मिश्रण करून तुम्हाला पाजीन, असा सशय आला म्हणून कीं काय ?"

मुख वर न उचलतां, अगदीं शांतपणे नरेन्द्र म्हणाला, " नाहीं. असा विचार माझ्या मनात आला नाहीं ! तुझी प्रकृति बरी नव्हती, म्हणून————! "

त्याला मध्येंच थांबवून इन्दू म्हणाली, " काय झालें होतें माझ्या प्रकृतीला ? येथील बातमी कळल्यानंतर सुद्धां मी आलें नसतें, असें निश्चयपूर्वक वाटण्यासारखें मीं काय कळविलें होतें माझ्या प्रकृतीबद्दल ? मी कांहीं मरायला टेकलें नव्हतें तेथे अगदीं ! मला बोलावण्यापासून वन्संना परावृत्त करण्याकरितां तुम्हीं त्यांना खोटेच कांहीं तरी सांगितले असलें पाहिजे ! आणि म्हणे मोठे———!" असें बोलत बोलत, ती ज्याप्रमाणे आली, त्याप्रमाणेच चालती झाली !

नरेन्द्रानें पुन्हा समोरच्या लिखाणाकडे आपली दृष्टि वळविली. परंतु त्याच्या दृष्टीसमोर काय दिसत होतें कोणाला ठाऊक ?

* * * *

बाहेर येऊन इन्दू डॉक्टरास म्हणाली, "गगनबाबूच्या घरी असतांना आपलाच औषधोपचार सुरू होता वाटतें ! " तिची मुद्रा अगदी म्लान दिसत असून तिच्या नेत्रांत उद्वेगाची छाया वास करीत असलेली स्पष्टपणे दिसत होती. तिच्या सुंदर मुखावर पसरलेली औदासीन्याची ही अवकळा पाहून कोणालाही तिची कींवच वाटली असती ! डॉक्टरसाहेबांनीं तिच्याकडे एकवार दृष्टिनिक्षेप करून, मस्तक-परिचालनाच्या द्वारेच तिच्या प्रश्नाला " होय. " असे उत्तर दिले !

इन्दू पुन्हां म्हणाली, " परंतु अजूनमुद्धा त्याची प्रकृति अगदी साफ बरी झाली आहे, असें मला वाटत नाहीं. सध्यां ते बाहेर गेले आहेत; दोन प्रहरीं घरींच राहतील. त्या वेळी एकदा येऊन त्याची प्रकृति पुन्हां एकदा तपासून पहाल, तर फार उपकार होतील ! ही आपली फी,—अगाऊच देऊन ठेवतें ! दोन प्रहरी आल्याखेरीज राहूं नका ! "

डॉक्टरसाहेबाना किंचित् आश्चर्य वाटलें ! त्यांना जास्त विचार करण्यास सवलत न देतां, इन्दू पुढें म्हणाली, " त्यांचा स्वभाव कांहींसा निराळाच आहे ! औषध उपचार, वैद्य डॉक्टर, वगैरेंचा त्यांना अगदीं मनापासून कंटाळा आहे. म्हणून. अगदीं नाइलाज होई तोंपर्यंत ते कधींही डॉक्टरकडे जात नाहींत ! म्हणून म्हणतें, आपण आपलें प्रिस्क्रिप्शन् ( Prescription ) मजजवळच पाठवून द्या, म्हणजे बरें पडेल. औषध घेण्याबद्दल त्यांनाही दोन उपदेशाच्या गोष्टी सांगितल्या, म्हणजे मग कदाचित् ते त्या गोष्टीला कबूल होतील ! "

" ठीक आहे. " असें म्हणून डॉक्टरसाहेब निघून गेले.

इतक्यांत गडी आंत येऊन म्हणाला, " वल्लभ सोनार आला आहे. "

" आला का तो ? 'ठीक आहे. घेऊन ये त्याला येथें." रामा गेला, अणि थोड्याच वेळानंतर वल्लभ सोनाराने आत प्रवेश केला. इन्दु म्हणाली, "वल्लभ, कांहीं कामाकरतां तुला आज मी मुद्दाम बोलावणे पाठविलें. तूं माझ्या विश्वासातला, म्हणून मी तुला हें काम सागत आहे. हे बघ, ह्या माझ्या बांगड्या आहेत ना ? ह्या आहेत अगदीं जुन्या घडणीच्या ! मला मुळीसुद्धा आवडत नाहींत त्या ! तेव्हा ह्या विकून, त्याच किंमतीत दुसऱ्या नवीन घडणीच्या बांगड्या घ्याव्या, अशी माझी इच्छा आहे. मग होईल का तुझ्या हातून माझे एवढें काम ? "

"हो हो, अगदीं खात्रीनें ! न व्हायला काय झालें ?"

" मग हे वजन करण्याकरितां तूं आपला कांटा आणला आहेस ना येतांना ? मोजून पहा बरे, काय वजन भरतें ते ?—पण हे बघ, ह्या बांगड्याचे पैसे मला उद्याच्या उद्या मिळाले पाहिजेत, वरें का ? जास्त उशीर करून चालायचें नाही !"

" कांही हरकत नाहीं. उद्याच देतों आणून याची किमत आपल्याकडे !"

बांगड्या हातांत घेऊन त्याकडे पहात पहात वल्लभ म्हणाला, ह्या तर नुकत्याच तयार करविलेल्या दिसतात ! आताच विकल्यास, पूर्ण किमत येणार नाहीं; थोड्या नुकसानींतच सौदा करावा लागेल !"

" कांहीं हरकत नाहीं, थोडी किमत कमी आली तरी. ही घडणच मुळीं मला आवडत नाहीं. कसेंही करून तू त्या विकून टाकच उद्यां, आणि हें बघ, ह्याबद्दल एक अवाक्षरसुद्धां त्याच्या कानी जाऊ देऊं नकोस, समजलास ना ?"

"ठीक आहे !"

वल्लभ पिढीजाद सोनार होता. त्याच्या धंद्यांतील चोरटें कसब वाडवडिलांपासून त्याच्या आंगीं अवतरलें होतें. घरांतील पुरुषांना कांहीं पत्ता लागू न देतां घरातील दागिन्यांची देवघेव करणें, हें त्याला नवीन नव्हतें. हंसत हंसत, हातांतील बांगड्या काळजीपूर्वक उपरण्यांत गुंडाळीत गुंडाळीत तो निघून गेला !

× × × ×

" डॉक्टरसाहेब, आज इतके दिवस झाले, आपलें औषध सुरू आहे. परंतु अजूनसुद्धां छातीत दुखणें होतें तसें आहेच ! त्यांत काहीं सुद्धा फरक पडलेला नाहीं !"

" म्हणजे ? नरेन्द्रबाबू तर तसें काहींच म्हणाले नाहींत."

" तो त्याचा स्वभावच आहे ! मी तुम्हाला सागत नव्हते का त्या दिवशीं ? माझी पूर्ण खात्री आहे, त्यांच्या छातीतील व्यथा अजूनसुद्धा सुरू आहेच !—नाहीं तर इतके दिवस औषध चालू असूनसुद्धा प्रकृतीत काहीच फरक वाटत नाहीं, हें कसे ?"

काही वेळपर्यंत विचार करून, चष्मा साफसूफ करून पुन्हा डोळ्यावर चढवीत डॉक्टरसाहेब म्हणाले, " हे पहा, मला असे वाटते, नुसत्या औषधाचा त्यांच्यावर कांही परिणाम होणार नाही ! त्याना कोठे तरी दुसरीकडे जाऊन हवापालट केल्याखेरीज गत्यतर नाही !"

" मग तसे त्यांना कां सागितले नाहीं आपण ?"

एके दिवशी मागेच मी ह्याबद्दल त्याच्याजवळ गोष्ट काढली होती. परंतु हवापालटाची कांहीं आवश्यकता आहे, असे त्याना वाटलें नाही !"

इन्दू रुष्ट होऊन म्हणाली, " त्यांना आवश्यकता वाटली नाही, म्हणून काय झालें ? ह्या बाबतींत त्याना काय समजणार ? आपण डॉक्टर; आपल्या सल्ल्याप्रमाणेंच प्रत्येक गोष्ट व्हायला पाहिजे !"

इन्दूचें हें आवेशयुक्त भाषण श्रवण करून वृद्ध डॉक्टरसाहेब किंचित् हंसत हसत तिच्या मुखाकडे पाहू लागले ! अवेळी दाखविलेल्या तीव्रतेची स्वतःलाच लाज वाटून इन्दू म्हणाली, " हे बघा डॉक्टरसाहेब, ह्याच्या आजारामुळे माझे चित्त फारच व्याकुळ झाले आहे. त्यामुळे एखादे वेळी मी भलतेंच बोलून जातें ! त्याबद्दल आपण मला क्षमा करावी ! आणखी, डॉक्टरसाहेब, मला असें वाटतें. आपण त्याना खूब भय दाखवावें, म्हणजे ते आपल्या म्हणण्याप्रमाणें वागायला तयार होतील !"

मुद्रा गंभीर करून मस्तक परिचालन करीत करीत डॉक्टरसाहेब म्हणाले, " अशा रोगांमध्यें भयाचें कारण तर नेहमींच असते ! "

इन्दूचें मुख पांढरें फटफटीत पडलें ! भयभीत स्वरांत ती म्हणाली, " खरेंच का डॉक्टरसाहेब, भिण्यासारखें कांहीं आहे ? "

तिच्या मुखाकडे पाहून, तिच्या प्रश्नाला उत्तर देण्याचें साहस डॉक्टरसाहेबां-कडून करवलें गेलें नाहीं. इन्दूचे नेत्र अश्रूंनीं भरून आले. अत्यत कातर स्वरात ती म्हणाली, “डॉक्टरसाहेब, मला आपण माझ्या वडिलाप्रमाणे आहात. माझ्यापासून कांहीं सुद्धां लपवून ठेवूं नका. मी तुमच्यासमोर पदर पसरतें, काय प्रकार आहे, तो सर्व सविस्तरपणें मला कळू द्या!”

नरेन्द्राच्या विकाराचे खरें स्वरूप काय ते डॉक्टरसाहेबाना सुद्धां नीटपणें समजलें नव्हतें. छातीतील दुखण्यापेक्षां कांहीं तरी निरळी व्यथा त्याला दुःख देत असावी, असें त्याना वारंवार वाटे; परंतु त्या व्यथेचें स्वरूप काय, हें त्यांना समजेना! भिण्यासारखें विशेष असें काहीं नाहीं, ही गोष्ट त्यानी नानाप्रकारें इन्दूला समजावून सांगण्याचा प्रयत्न केला, परंतु तिचें कांही केल्या समाधान होईना! भयाने तिच्या हृदयांत जे ठाणे दिलें, ते कायमचेच. डॉक्टरसाहेब निघून गेले; इन्दूही आपल्या खोलींत परत येऊन रडू लागली.

तिसऱ्या प्रहरी बराच वेळपर्यंत लेखनव्यवसाय केल्यानतर, लेखणी खालीं ठेवून, नरेन्द्र खिडकीजवळ उभा राहून समोरील दृश्याकडे शून्य दृष्टीनें पहात उभा होता. समोर पसरलेल्या विस्तीर्ण आकाशाच्या अफाट पोकळींत, लहान लहानसे मेघखड वायुलहरींवर इतस्तत· विहार करीत होते. त्यांना पाहून नरे-न्द्राच्या हृदयातही नाना विचारांचे मेघ उत्पन्न होऊन तेथे वास करणाऱ्या शांत-तेवर आपली मलिन छाया पसरू लागले. इतक्यात एकाएकी समोरच्या मेघा-वलीत, अगदीं अनपेक्षितपणे एक वीज चमकली. इन्दूने खोलीत प्रवेश केला, व नरेन्द्र बसला होता त्याच्या शेजारींच एका खुर्चीवर ती येऊन बसली. नरे-न्द्रानें एकवार तिच्याकडे पाहिले, आणि लगेच मान वळवून पुन्हां मेघाच्या लीलेकडे दृष्टि लावली. एक क्षणभरच तो मेघखड क्षतविक्षत करून चपला पुन्हां त्यामध्येच अतर्धान पावली होती.

बरेच दिवस झाले, इन्दूनें नरेन्द्राजवळ पैशाबद्दल मागणी केली नव्हती! आजचे तिचें आगमन ह्याच हेतूनें झालें असावें असें निश्चयपूर्वक वाटून त्याच्या अतःकरणात भयानें धडकी भरली! तिची मागणी कशी पुरवावी हा विचार भयप्रद स्वरूप धारण करून त्याच्या हृदयांत वावरूं लागला.

परंतु इन्दूनें त्याच्याजवळ द्रव्याची मागणी केली नाहीं. ती कोमल स्वरांत म्हणाली, “डॉक्टरसाहेब म्हणतात, औषधानें ज्या अर्थी फरक वाटत नाही, त्या अर्थी कांहीं दिवसपर्यंत दुसरीकडे एखाद्या चांगल्या हवेच्या ठिकाणीं जाऊन

राहिल्याखेरीज प्रकृति बरी होणार नाहीं! मग एकदां हा उपाय करून पहावा म्हणतें मी!"

नरेन्द्र खरोखरच दचकला! त्याचे नेत्र निराशेच्या दारुण आशकेनें अनिश्चित दिसणाऱ्या आनदानें नाचूं लागले! किती तरी दिवसांपूर्वी अज्ञानाच्या गाढ अधकारात गडप झालेले त्याच्या जीवनातील अमूल्य भांडार कोठून तरी त्याला हांक मारीत आहे असे त्याला वाटूं लागलें! त्याच्या हृदयांतील मृतप्राय आशा, पुन्हां टवटवीत दिसू लागली! इन्दूच्या ह्या कंठस्वराचें तर त्याला अगदीं विस्मरणच पडलें होते! त्यानें मान वळवून, हतबुद्ध झाल्याप्रमाणे एकवार तिच्या मुखाकडे पाहिले, आणि मनातल्या मनात कोणाला ठाऊक कशाचा शोध करूं लागला!

काही वेळपर्यंत उत्तराची अपेक्षा केल्यानतर, नरेन्द्र काहींच बोलत नाहीं असें पाहून इन्दू पुन्हां म्हणाली, " ऐकलें का? मला वाटतें, उद्याचे उद्या सर्व तयारी करून बाहेर पडावें! अशा बाबतींत उगाच जास्त उशीर करण्यांत अर्थ नसतो! एखादे प्रसगीं वाईट परिणाम व्हायचा! फार लाव जाण्याचे कांहीं कारण नाहीं. जवळपास एखादें उत्तम हवेचे ठिकाण पाहून डॉक्टरच्या सांगण्याप्रमाणे तेथे जाऊन राहू, झाले! बरोबर मी, कमल, आणखी एक मोलकरीण! जास्त नोकरचाकर बरोबर घेऊन खर्च वाढविण्यांत अर्थ नाहीं! रामा आपला जुना विश्वासू नोकर आहे, त्याच्या स्वाधीन इकडचें हें घरदार करून द्यायला मला कांहीं हरकत दिसत नाहीं! जेथे जाऊ, तेथे एक अगदीं लहानसें घर असले, तरी आपलें काम भागेल! मग आजच सामानसुमान बांधायला कांही हरकत नाहीं ना?"

कोणत्याही स्वरूपात का होईना, परंतु खर्चाचा प्रश्न पुढे उभा राहताच नरेन्द्राच्या उरात धडकी भरत असे! पैसे आणायचे कोठून? हा प्रश्न त्याच्या आजपर्यंतच्या आयुष्यात त्याला समाधानकारक रीतीनें सोडविता आला नाही! आज एकाएकीं ह्या स्वरूपांत पैसे खर्च करण्याचा प्रश्न त्याच्यासमोर उभा राहताच तो किंचित् विरक्त झाला! काहीशा रुष्ट स्वरांत त्याने प्रश्न केला, "येथे येऊन हा सारा उपद्व्याप करण्याकरिता या डॉक्टरला सागितलें होतें कोणीं? कोणाच्या बोलावण्यावरून येत असतो तो येथें?"

यावर इन्दू कांहीं उत्तर देणार, इतक्यात तिला अवसर न देतां नरेन्द्रच पुन्हां म्हणाला, " विमलला सांग, म्हणावें, माझ्यामागे डॉक्टरचा हा त्रास लावण्याची कांही आवश्यकता नाहीं! मी आतां चांगला बरा झालों आहें!"

असें! प्रच्छन्न स्वरूपांत राहून विमलाच डॉक्टरला पाठवीत आहे! तिलाच काय ती नरेन्द्राबद्दल काळजी!—तीच सर्वस्व!—इन्दूचा कांहीं संबंध नाहीं! इन्दूला वाईट वाटले. परंतु तसे बाहेर न दाखवितां, ती पूर्ववत् कोमल स्वरांतच म्हणाली, " परंतु अजून तरी प्रकृति पूर्णपणें दुरुस्त कोठें झाली आहे? अजून-सुद्धां छातींतील दुखणें थांबले नाही तें नाहींच!"

नरेन्द्र म्हणाला, " कोण म्हणतें नाहीं म्हणून? माझे दुखणे आतां अजीबात बंद झाले आहे!"

" मग अजूनपर्यंत त्याचें कांहीच चिन्ह शरीरावर दिसत नाहीं, हें कसे! देहाची ही दुर्दशा मला चांगली दिसते आहे. एकदा बाहेरगांवी जाऊन कांहीं दिवस हवा-पालट करून आल्यानें, दुसरें कांहीं झालें नाहीं तरी वाईट परिणाम तर होणार नाही ना?"

आजारामुळे नरेन्द्राचा स्वभाव अगोदरच थोडासा चिडखोर बनला होता. त्याची मनस्थिति एका अशा विवक्षित स्थळीं येऊन पोहोचली की, त्या ठिकाणी त्याची सहनशीलता नि.शेष झाली; तरी देखील, महा प्रयासानें एकदा आत्म-संयमन करून तो होईल तेवढया शात स्वरात म्हणाला, " बाहेर जाण्याचे माझ्या अंगी सामर्थ्य नाही. "

त्याची क्षुब्ध मनस्थिती न ओळखून, इन्दू हट्टीपणानें पुन्हां म्हणाली, " तें कांही नाहीं! आपला जीव तर वाचवायला पाहिजे ना? "

अशा प्रकारचा हट्टीपणा इन्दूच्या बाबतीत अगदींच नवीन होता! त्यापूर्वी नरेन्द्राला त्याचा कधींही अनुभव आला नसल्याकारणानें, आज त्यानें त्या गोष्टीचा अगदी भलताच अर्थ केला! आपल्या मनाला त्रास देण्याच्या हेतूनें तिनें शोधून काढलेला हा एक नवीन मार्ग आहे, असें त्याला खात्रीपूर्वक वाटूं लागलें! हा विचार मनांत येतांच त्याचा क्रोध भडकला! मोठ्या प्रयासानें बांधून ठेवलेलें धैर्याचें धरण एका क्षणांत छिन्नभिन्न होऊन गेले! तिच्याकडे पाहून उत्तेजित स्वरांत तो म्हणाला, " कोण म्हणतो माझा जीव वांचला पाहिजे असें? मी जिवत रहावें अशी माझी इच्छा नाहीं—नाहीं—नाहीं! शभरदां नाहीं! मी तुला साष्टांग नमस्कार घालतों हवा तर. परंतु माझी तुझ्याजवळ एवढीच प्रार्थना आहे कीं, आतां यापुढें तूं मला जास्त छळूं नकोस. झालें तेवढें पुरे झालें, असें अजूनसुद्धां तुला वाटत नाहीं का? तुझें समाधान होणार

तरी केव्हां ? माझ्या आयुष्यांतले जे थोडेसे दिवस उरले असतील, तेवढे तरी मला आतां निवांतपणें घालवू देशील, तर माझ्यावर तुझे फार—फार उपकार होतील."

आपल्या पतीच्या मुखातून कटु शब्द बाहेर निघू शकतात, हे इन्दूला कधीं स्वप्नांत सुद्धा वाटले नव्हते. आज त्याच्याचकडून तीव्र शब्दाचा हा कठोर वर्षाव एकाएकी झालेला पाहून इन्दू अगदीं हतबुद्धच झाली. काय बोलावें हेंच तिला सुचेना. परंतु तिची ही अवस्था नरेन्द्राच्या ध्यानांतच आली नाहीं. त्याचे भाषण पुन्हा सुरू झालें. "माझी पूर्ण खात्री आहे कीं, मी कोणत्या सकटग्रस्त परिस्थितींत दिवस काढीत आहे तें तुला चांगले ठाऊक आहे. तरी सुद्धां, तू मुद्दाम माझ्या मनाला त्रास देण्याच्या हेतूनेंच असे निरनिराळे उपाय अमलांत आणीत असतेस, हे सारे मला कळत नाही असे का तुला वाटते? कां बरें तू अशी हात धुवून माझ्या पाठीस लागली आहेस? मी तुझा अपराध तरी कोणता केला आहे असा? तुला काय पाहिजे, तें तरी एकदा कळू दे मला?"

इन्दू भयानें विवर्ण होऊन त्याच्या मुखाकडे नुसती पहात राहिली! तिच्या मुखावाटे एक शब्दही निघेना!

आरडाओरड, रागावणे, इत्यादि गोष्टी नरेन्द्राच्या बाबतीत सुद्धा अगदींच अस्वाभाविक होत्या! हृदयांतील खळबळ अशा प्रकारे ओकून टाकल्यानंतर, झालेल्या प्रकाराबद्दल त्याचे त्यालाच कसेसें वाटू लागलें! तो किंचित् शात होऊन खालच्या स्वरांत म्हणाला, "ठीक आहे, हवापालट करण्याकरितां बाहेर गांवीं जाणें आवश्यक आहे, हें मला कबूल आहे! परंतु जायचे कसे? खर्चाचे पैसे आणायचे कोठून? ह्या ससाराचा अवाढव्य गाडा रेटता रेटतांच तर माझे प्राण कठाशीं आले आहेत; आता आणखी पैसे मी आणू तरी कोठून?"

आत्मसंयमन म्हणजे काय, हें इन्दूला ठाऊक नव्हतें! कोणाच्याही समोर मस्तक नम्र करणे तिच्या अगदीं जिवावर येत असे! त्यापेक्षां मस्तक कापलें तरी बरें, असें तिला वाटे! परंतु आज नरेन्द्राच्या मुखांतून निघालेले एवढे तीव्र वाग्बाणसुद्धा तिनें मुकाट्यानें सहन केले! कारण त्याचा क्रोधावेश पाहून तिचें अंतःकरण भीतीनें थरारलें होतें! तीव्र शब्दांतच उत्तराला प्रत्युत्तर देण्याचें धैर्य तिला झालें नाहीं! नम्र कंठस्वरांत ती म्हणाली, "द्रव्य जवळ नसलें म्हणून काय झालें? बऱ्याच किंमतीचे दागिने तर आहेत ना आपल्याजवळ? तेच-!"

" होय. दागिने आहेत ! पण ते कोणाचे ? तुझे ! ते तुझ्या वडिलांनीं दिले आहेत तुला ! त्यावर माझा काय हक्क ? तुझ्या दागिन्यावर माझा काडीमात्रसुद्धां अधिकार नाहीं. ही गोष्ट माझ्यापेक्षा तुलाच जास्त चागली समजते ! मग कां बरें हा प्रश्न माझ्यासमोर काढतेस ? "

" ठीक, आहे, नको असतील, तर माझे दागिने घेऊं नयेत ! माझी हरकत नाहीं ! माझ्याजवळ रुपये आहेत, ते घ्यायला तर मागे पुढे पाहण्याचे काहीं कारण नाही ना ? "

" कोठून आले रुपये तुझ्याजवळ ? घरखर्चाकरितां दिलेल्या रकमेंतूनच वांचवून ठेवलेस का ? " नरेन्द्राने प्रश्न केला.

इन्दूनें आपल्या बागड्या विकल्या, त्याचे हे रुपये ! इन्दू कधीही मिथ्या भाषण करीत नसे ! असत्य बोलणे म्हणजे स्वतःचा अपमान करून घेणे आहे, असे तिचे मत होतें ! तरीसुद्धा, खरी गोष्ट स्वीकार केल्यास, नरेन्द्र ह्या द्रव्याचा उपयोग करण्याचें सुद्धां नाकारील, असा विचार मनांत येऊन, आज तिनें मिथ्या भाषण करण्याचा मनाशीं निश्चय केला ! दृष्टि खाली वळवून खोल स्वरात तिने नरें-द्राच्या प्रश्नाला उत्तर दिले, "हो."

हें उत्तर ऐकून नरेंद्राची चर्या कठोर दिसूं लागली. तो भयानक स्वरांत हळू हळू म्हणाला, " तसें असल्यास, आणखी दागिने तयार करण्याकरिता ते तुझ्या-जवळच असू देत. माझ्या काळजातील रक्ताचे पाणी करून मिळविलेले द्रव्य अशा प्रकारें नष्ट करूं देणार नाहीं मी ! इन्दू, इहजन्मात मीं कधी तुला एकसुद्धा कटु शब्द बोललो नाहीं—उलट तुझेच वाग्बाण मी निमूटपणे सहन करीत आलों आहें !—परतु त्या दिवशी तूच ना मला सागत होतीस, की तू कधींही मिथ्या भाषण करीत नाहीस म्हणून ? छिः—"

कमला दाराजवळून आईला हांक मारून म्हणाली, "आई, आत्याबाई आल्या आहेत."

" काय चाललें आहे वहिनी ? " असें म्हणत म्हणत विमलेनें आंत प्रवेश केला. तिच्या आगमनाकडे किंवा प्रश्नाकडे मुळीच लक्ष न देतां इन्दू उठली; आणि कमलेला नरेन्द्रासमोर आणून उभी करून, तिच्या गळ्यांतील पदकांची माळ एका झटक्यासरशी तोडून त्याच्यासमोर धरीत ती क्रोधभरानें म्हणाली, " मिथ्या भाषण करणें मला माहीत नव्हते. आपल्याजवळूनच मला त्याचा

पहिला धडा शिकण्याचा प्रसंग आला ! तरी सुद्धां, अजूनपर्यंत पितळेला सोनें म्हणून खपविण्याची माझी पाळी आलेली नाहीं, याबद्दल मला अभिमान वाटतो. जो मनुष्य प्रत्यक्ष आपल्या पत्नीला—आपल्या कन्येला अशा प्रकारें फसवूं शकतो, त्याने आणखी काय करायचे बाकी ठेवले आहे? दुसऱ्यावर मिथ्या-वादित्वाचा आरोप करण्याचा त्याला काय अधिकार? दुसऱ्याला उपदेशाच्या गोष्टी सागण्याचा आव आणण्यापूर्वी, थोडेसें स्वतःकडे पाहिले तर जास्त बरें होईल. "

ती तुटलेली माळ उचलून घेऊन नरेन्द्र म्हणाला, " कसें कळलें तुला, ही माळा खोटी आहे, हें? सोनाराकडून परीक्षा करवून पाहिलीस का? "

" ह्या आपल्या बहिणीलाच सागा परीक्षा करून पहायला ! " असें म्हणून इन्दूने आपले आरक्त नेत्र विमलेकडे वळविले.

विमला मागे सरून म्हणाली, " ते कार्य माझ्या कडून होणे शक्य नाही वहिनी. दादानें दिलेला दागिना खरा आहे किंवा खोटा आहे, ह्या गोष्टीची शाहानिशा सोनाराला बोलावून करून घ्यावी, इतक्या नीच थराला माझी बुद्धि अजूनपर्यंत येऊन पोहोचलेली नाही. "

नरेन्द्र इन्दूकडे वळून म्हणाला, " इन्दू, तुलासुद्धा मी एक दोन दागिने दिले आहेत. ते परीक्षा करून पाहिलेस का खरे आहेत किंवा खोटे ते? "

" पाहिले नाहींत, बाकी आता पहायला पाहिजेत "

" पहा. ते खात्रीने पितळेचे नाहींत. " नंतर भगिनीकडे मुख वळवून, ती तुटकी माळ तिला दाखवून नरेन्द्र पुढे म्हणाला, " ताई खरोखरच हे सोनं नाही, पितळच आहे. कमलच्या जन्मदिवशी तिची फसवणूक करून हा खोटा हार तिला देताना माझ्या पितृहृदयाला कोण वेदना झाल्या असतील, ह्याची कल्पना आणखी कोणाला जरी झाली नाही, तरी, ताई, ती तुला खास करतां येईल ! ताई, माझ्या मुलीला मी फसवू शकलो; परंतु पत्नीला फसविण्याचें साहस माझ्याच्यानें करवले नाहीं ! तिला दिलेले दागिने खोटे नाहीत !"

[७]

" वहिनी, तुम्हाला माझी शपथ आहे, तुम्ही माझें एवढें सांगणे ऐकाच ! एकदां जाऊन दादाची क्षमा मागा ! "

" का बरें ? मी कोणता अपराव केला आहे, म्हणून मी आपण होऊन त्यांच्या-जवळ जाऊन क्षमा—प्रार्थना करूं ? तुम्ही सांगता तसें माझ्या हातून घडणें अशक्य आहे ! "

" का बरे ? अशक्य आहे असें कां म्हणतां ? पतीच्या चरणी मस्तक नम्र करण्यात लाज वाटण्याचे काय कारण आहे ? त्यात कदाचित् तुमचा अपराध नसेल, ही गोष्ट मला मान्य आहे! परतु पतीची मर्जी सुप्रसन्न ठेवणे हें तर स्त्रीचे सर्वांत श्रेष्ठ कर्तव्य आहे असे तुम्हाला वाटते ना ? "

इन्दू म्हणाली, " नाही. मला तसेही वाटत नाही! परमेश्वराच्या न्यायासना-समोर उभे राहण्याचा प्रसग आला, म्हणजे त्या वेळेस खाली मान घालण्याचा प्रसग येऊं नये, अशा प्रकारचे वर्तन ठेवण्याचा प्रत्येकानें प्रयत्न केला, म्हणजे पुरे आहे ! परमेश्वराखेरीज दुसऱ्या कोणालाही भिण्याचें, किंवा प्रसन्न करण्याचें कांहीं कारण आहे, असे मला वाटत नाही ! "

विमला रागावून म्हणाली, " वहिनी, गोष्टी बोलणे सोपें आहे, परतु पुढे प्रसंग येऊन ठेपला, म्हणजे मग खरें सुख काय आहे ते कळेल ! एकदा वेळ गेली, म्हणजे मग कशाचाही उपयोग होणार नाहीं, हे पक्कें लक्षात ठेवा ! डोळे मिटून ठेवून भावी विपत्ति टाळता येत नसते ! दादा खरोखरच तुम्हावर फार रागा-वला आहे ! "

उदासभावाने, परंतु दृढपणे इन्दूने उत्तर दिले, " त्यांची मर्जी; त्याला मी काय करणार ? "

हे उत्तर ऐकून विमलेच्या अत.करणाचा चागलाच भडका उडाला ! ती पूर्वी-प्रमाणेंच रुष्ट स्वरात म्हणाली, " ज्या दिवशी तुमचा सर्वनाश उपस्थित होईल, त्या दिवशीच तुमचे डोळे उघडतील, वहिनी ! तुम्हाला दादाचा स्वभाव अजून-पर्यंत नीट कळला नाहीं, म्हणून तुमच्या ह्या साऱ्या गोष्टी आहेत ! पण मी तुम्हाला सागून ठेवतें, त्याचे हृदय जसें निरीह, तसेंच कठिणही आहे ! त्याच्या स्वभावाची एक बाजू तुम्ही पाहिली आहे; बाकी दुसऱ्या बाजूचा अनुभव अजून तुम्हाला आलेला नाही ! माझें ऐकायचें असेल, तर वेळींच सावध होऊन मी सांगते तसे करा. त्यांतच तुमचें हित आहे ! स्त्रीजातीला एवढा अभिमान शोभत नाहीं ! "

" काहीं हरकत नाही ! ती दुसरी बाजू कशी आहे, त्याचा एकवार अनुभव घेते; मग येईन वाटल्यास पुन्हा तुम्हाला विचारायला. "

इन्दूचे हे कठोर उत्तर ऐकून विमलला फार वाईट वाटलें. आपण अगदीं कळकळ्याने उपदेश करीत असता, तिनें आपल्याला असे उपहासात्मक उत्तर द्यावें, याबद्दल तिला तिचा रागही आला नाही असें नाही! तरी पण नरेन्द्राच्या भावी सुखाकडे लक्ष देऊन तिनें इन्दूच्या कठोर उत्तराचा आपल्या अत:करणावर कांही विपरीत परिणाम होऊ दिला नाही. ती काही वेळपर्यंत स्तब्ध बसली; नंतर एक दीर्घ निश्वास टाकून म्हणाली, " ईश्वर करो आणि त्याचा वाईट अनुभव तुम्हाला केव्हांही न येवो! पतीच्या प्रेमाचे कृपाछत्र असेच तुमच्या मस्तकावर अखंड राहो, अशीच माझी इच्छा आहे. कारण त्यातच स्त्रीचे खरें सौभाग्य वास करीत असते. परंतु मनुष्याच्या इच्छेप्रमाणेच सर्व गोष्टी घडत आल्या असत्या, तर ससारात दु:खाचे नावसुद्धा ऐकू आलें नसते. वहिनी, तुम्हाला माझ्या बोलण्याचा राग येतो; बाकी मला पुन्हां पुन्हां तुम्हाला सागावेसें वाटते की, तुम्ही अजूनपर्यंत दादाला नीट ओळखलें नाही. त्याच्या स्वभावाची ओळख तो आजारी असताना मला चांगली पटली आहे. एकदा त्याच्या हृदयाचें द्वार बंद झाले, म्हणजे मग ते पुन्हा उघडता येणें सभवनीय नाहीं."

ह्या वेळीं इन्दूनेंही आपले मुख गभीर केले. दृढ स्वरात ती म्हणाली, " नाहीं उघडता आलें—आत प्रवेश मिळाला नाही, तर बाहेरच राहीन! त्यात काय हरकत आहे? बंद असलेले दार उघडण्याकरिता त्याच्या पायाकडेही धाव घेणार नाही, किंवा तुम्हालाही माझ्या वतीनें दोन शब्द सागण्याकरिता हाक मारणार नाही, पण हे काय—रागावून जायला निघालात वाटतं?"

विमला उभी राहून म्हणाली, " रागाऊन नव्हे—वाईट वाटल्यामुळे जाते आहे. वहिनी, सख्ख्या बहिणीपेक्षा सुद्धां माझे तुमच्यावर प्रेम जास्त. म्हणून तुमच्याकरिता माझें हृदय कसें पिळवटून निघते आहे! दादाच्या मुखावाटे असे भाषण निघणे शक्य आहे, असें मी प्रत्यक्ष हजर नसते, तर मला स्वप्नातसुद्धा वाटले नसतें."

इन्दू रुक्षपणे किंचित् हंसून म्हणाली, " त्यांच्या मुखावाटे असें वक्तृत्व यापुढेंही केव्हां तुम्हाला ऐकण्याचा प्रसंग येणार नाहीं."

" वक्तृत्व करण्यात तुम्ही देखील कमी समर्थ आहा असें नाही! पण, तुमच्याप्रमाणे मलासुद्धा असा प्रसग पुन्हा केव्हाही येणार नाही असें वाटते! एकच गोष्ट पुन्हा पुन्हां सांगण्याचा त्याचा स्वभाव नाहीं!"

इन्दू पुन्हां हंसून म्हणाली, "तेंही खरेंच आहे! तरी पण एक आणखी फार मोठें कारण आहे, ज्यामुळें पुन्हां लाल डोळे करून माझ्याकडे पाहण्याचें साहस त्यांच्याकडून करवणार नाहीं. सांगूं का तें कारण कोणतें तें? बाबांनीं आपल्या मृत्युपत्रात माझ्या नांवानें दहाहजार रुपये लिहून ठेवले आहेत. हेच तें कारण! कसे काय वन्स? पायधरणी करण्याचे मला कांहीं कारण आहे, असें अजूनसुद्धां तुम्हाला वाटते का?"

विमलेचे मुख अगदींच म्लान झालें. तिच्या हृदयांतील अधुक आशाही इन्दूच्या वरील भाषणामुळे नष्ट झाली. ती अत्यत उदासभावानें म्हणाली, "वहिनी, उगाच लाल डोळे करून पाहण्याच्या गोष्टी कशाला हव्या? यापूर्वी कधी तरी तो तुमच्यावर रागावला होता काय?—पण जाऊं द्या त्या गोष्टी. त्याला ज्या स्थितींत एकटे टाकून तुम्ही मेदिनीपूरला निघून गेला होता, तें मला ठाऊक आहे. तरी देखील तुमच्याबद्दल निंदाव्यजक असा एकसुद्धा शब्द कधी त्याने उच्चारला नाहीं. उलट, साऱ्या गोष्टी हसतमुखाखाली, माझ्या जवळूनसुद्धा तो लपवून ठेवीत होता. तुम्ही त्याच्याशीं एवढया निष्ठुरपणे वागत असून सुद्धां, तो तुमच्यावर जिवापाड प्रेम करीत होता.—हे सर्व तुमच्या दहाहजार रुपड्याच्या मोहात गुतूनच का? वहिनी, श्रद्धेच्या अभावी प्रेम टिकून राहणे शक्य नाहीं. वहिनी, जी वस्तु आज तुम्ही मोठ्या दिमाखाने लाथाडून देत आहात, तिची खरी किंमत ती हरवल्यानतरच तुम्हाला कळेल, तोपर्यंत कळणार नाही. मग मात्र फार उशिरां झालेला पश्चात्ताप कांहीच उपयोगी पडणार नाही. माझी एवढी एक गोष्ट चागली लक्षात असूं द्या वहिनी,—माझा दादा, तुम्हाला वाटतो तसा नीच नाही!—जाते मी आता. ही पहा सध्याकाळ होत आली. उद्या परवाकडे वेळ मिळाला म्हणजे या तिकडे."

"बरें आहे." असें म्हणून इन्दू विमलला पोंचविण्याकरितां तिच्या मागोमाग दारापर्यंत आली. विमला पुढेच चालत होती. मागून इन्दू येत आहे हें, तिच्या लक्षात येऊनसुद्धा तिनें तसें दाखविलें नाहीं. ही गोष्ट इन्दूच्या लक्षातही आल्याखेरीज राहिली नाही. गाडींत बसल्यानतर, या उभयता बालमैत्रिणी एकमेकाचा हंसतमुखानें वारवार निरोप घेऊन परस्पराना पुन्हा येण्याबद्दल सप्रेम निमंत्रण करीत असत. आज गाडींत बसल्याबरोबर विमलेनें गाडीचे दार लावून घेतले. गाडी चालू झाली.

घरांत परत येऊन, इन्दूनें कमलला पोटाशीं घेतलें, व कोणाशीं कांहीं न बोलता, ती आपल्या खोलींत जाऊन निजून राहिली !

विमला निघून गेली; परंतु ती आपल्या खरतप्त गोष्टी मागे ठेवून गेली ! तिच्या शब्दाचा ताप किती प्रखर होता, त्याचा अनुभव इन्दूला आता जाणवूं लागला ! त्याच्या प्रचंड उष्णतेपुढें इन्दूच्या अहंकाराचा गगन-भेदी तुषार-स्तूप वितळूं लागला ! अहंकाराचें पटल नेत्रावरून दूर होताच, एक एक नवी गोष्ट तिच्या दृष्टोत्पत्तीस येऊं लागली ! त्या अहंकाराच्या घनीभूत जलस्तंभाखाली इतके चिखल, माती, आणि कठिण शिलाखड दडलेले असतील, असे तिला वाटले नव्हते !

एकाएकीं तिला वाटले, तिच्या हृदयाच्या खोल प्रदेशांतून तिला कोणीतरी जिज्ञासा केली, " इन्दू, जर नरेन्द्राने तुझा त्याग केला, तर कसे होईल ? त्याच्या जवळ जाण्याचा प्रयत्न केला असतां, तो तिरस्कारानें तुझ्याकडे पाठ फिरवून बसला, तर मग तुझी स्थिति कशी होईल ? "

इन्दूच्या सर्वांगावर थरारून कांटा उभा राहिला !

तिच्या अंतःकरणांतील खळबळीचा पत्ता लागला नाहीं, तरी शारीरिक हाल-चाल ध्यानांत येऊन कमलनें प्रश्न केला, " काय झालें आई ! "

इन्दूनें तिला गच्च पोटाशीं धरलें ! कमलचा एक पापा घेऊन ती म्हणाली, " काही नाहीं बाळ ! तुझ्या आत्याबाईच्या अंगीं दुसऱ्याला भय घालण्याचें एवढें विलक्षण सामर्थ्य असेल, असें मला वाटलें नव्हतें !"

" कशाबद्दल भय, आई ? " कमलनें विचारलें.

इन्दू पुन्हा तिचे चुंबन घेऊन म्हणाली, " कांहीं नाहीं ग; उगाच आपलें कांहीं तरी खोटें नाटें सांगून दुसऱ्याच्या उरात धडकी भरविण्याचा प्रयत्न करायचा, एवढेंच ! तें असू दे ! तू पाहून ये पाहूं, तुझे बाबा काय करताहेत ते ? अगदीं गुपचुप जा हं ! "

कमल आईची आज्ञा पालन करण्याकरिता निघून गेली ! आज दोन दिवस झाले, पतिपत्नींमध्यें संभाषण झालें नव्हतें ! थोड्याच वेळानंतर कमल परत येऊन म्हणाली, " बाबा निजले आहेत. "

" निजले आहेत ? बरें तर. तूं येथेच पडून रहा. मी जाऊन पाहून येते एकदां. " असें बोलून इन्दू बाहेर निघून गेली.

पतीच्या खोलीच्या दारावरील पडदा एकीकडे सारून तिनें हळूच आत डोकावून पाहिलें, तों खरेंच. कमलेनें सांगितलेली बातमीच खरी होती. नरेन्द्र एका

कोचावर वर तोंड करून पडला होता. पांच मिनिटेंपर्यंत त्याच्याकडे पहात इन्दू उभी राहिली. नंतर पुन्हां हळूच आपल्या खोलीकडे जावयास परत निघाली. पतीच्या खोलींत प्रवेश करण्याचें साहस आज तिला झालें नाहीं, याबद्दल तिला स्वतःबद्दल आश्चर्य वाटूं लागलें !

" कमल ?"

" काय आई ?"

" तुझ्या बाबांचे की नाहीं, कपाळ फार दुखतें आहे. जा बाळ, त्यांच्या-जवळ जाऊन बैस. आणखी हळू हळू कपाळ चेप हं ? जा."

कमलला आंत पाठवून, इन्दू स्वतः आडून आंत पिता-पुत्रीमध्यें चाललेल्या गोष्टी उत्कंठित चित्तानें ऐकूं लागली.

कमलेनें विचारलें, "बाबा, तुमचें कपाळ का दुखतें आहे ?"

नरेन्द्रानें उत्तर दिलें, "नाहीं. तुला कोणीं असें सांगितलें बाळ ?"

कमल पुन्हां म्हणाली, "आईनें तर मला सांगितलें, तुमचें कपाळ फारच दुखतें आहे म्हणून !"

नरेन्द्र काहीं कालपर्यंत कांहीं न बोलतां कन्येच्या मुखाकडे पाहूं लागला. नंतर तो म्हणाला, "तुझ्या आईला ठाऊक नाही."

पडदा एकीकडे सारून इन्दूनें सहजभावानें आंत प्रवेश केला. टेबलावर असलेल्या दिव्याची वात किंचित् कमी करून ती म्हणाली, "अगोदरच शरीर असें क्षीण झालेलें. अशा स्थितींत एवढे श्रम कसे सहन होणार ? जा बरं बाळ कमल, माझ्या खोलींतील कपाटांतून अमृतांजनाची बाटली आहे, तेवढी घेऊन ये पाहू ? आणखी हे बघ, परत येतांना रामाला सांग, म्हणावं बाजारांतून थोडासा बर्फ घेऊन ये लवकर. जा."

कमलला पाठवून देऊन इन्दू नरेन्द्राच्या उशाशीं जाऊन बसली. त्याच्या कपाळावरून हात फिरवीत ती म्हणाली. "कपाळ काय तापलें आहे हें ! हाताला चटके बसतात अगदी !

नरेन्द्र डोळे मिटून पडूनच होता. त्यानें मुखावाटे एक शब्दसुद्धां उच्चारला नाहीं. पूर्ववत् त्याच्या कपाळावरून हात फिरवीत फिरवीत इन्दू किंचित् खालीं वांकून सस्नेह स्वरात म्हणाली, "आज छातींतील दुखणें कसें आहे ?"

" पूर्वीसारखेंच ! "

" मग ? रागारागानें, दोन दिवस झाले, कांहीं औषध घेतलें नाहीं. अशानें रोग पुन्हां वाढला म्हणजे मग कसें बरें होईल ? "

नरेन्द्रानें डोळे उघडून तिच्याकडे पहात श्रान्तकंठांत उत्तर दिलें, " इन्दू, माझी प्रकृति बरी नाहीं; या वेळीं अगदीं निवांतपणें पडून रहावें अशी माझी इच्छा आहे. "

इन्दूच्या प्रेमळ प्रश्नाचें हें उत्तर !

इन्दू तडिद्वेगानें उठून उभी राहून म्हणाली, " ठीक आहे. माझीच चूक झाली मी आपण होऊन या खोलींत पाय दिला ही ! "

परत जातां जातां दाराशीं एकदम थबकून ती नरेन्द्राला म्हणाली, " आपले प्राण नष्ट करून मला शिक्षा करण्याची इच्छा असेल, तर ती आपली चूक आहे ! हें पत्र पाचून पहा—म्हणजे कळेल कीं, बाबा माझ्या नांवानें दहा हजार रुपये ठेवून गेले आहेत ! " असें बोलून तिने एक पत्र नरेन्द्राच्या अगावर फेंकलें, व ती स्वतः खोलीबाहेर निघून आली. पदरानें डोळ्यातील अश्रू पुशीत पुशीत ती कशी तरी आपल्या खोलींत आली, व आंतून दार लावून घेऊन जमिनीवर पडून राहिली !

कोणाचेंही कठोर भाषण सहन करण्याची तिला संवय नव्हती ! अपमान झाल्यानंतर आपला क्रोध आंवरणे तिला अशक्य होत असे ! पुष्कळ स्त्रियांच्या बाबतींत असेंच होतें ! तिच्या स्वभावांतील ह्या एका दुर्बलतेमुळेंच आजचा तिचा सर्व साधुसकल्प वृथा ठरला ! थोडें तरी आत्मसंयमन केलें असतें, तरी सुद्धां कदाचित् ही गोष्ट याच ठिकाणीं संपवावी लागली असती. परंतु परमेश्वराची म्हणा, इदूची म्हणा किंवा लेखकाची म्हणा पाहिजे तर—तशी इच्छा नव्हती. इन्दूनें केवढया आशेनें नरेन्द्राच्या खोलींत प्रवेश केला होता; परंतु तिच्या स्वभावामुळें तिचा सर्व उद्देश निष्फळ झाला ! ती करायला गेली काय, आणि करून आली काय ?

रामानें आणलेल्या बर्फाचें काय झालें ?

[८]

" कसें काय वन्सं ? कशाचें वाचन चालले आहे एवढें मन लावून ?–अग बाई, तुम्ही रडत होतां कीं ? डोळे कसे लालभडक झालेले दिसत आहेत ? "

अंबिकाबाबूंची पत्नी जवळ बसून ऐकत होती, आणि विमला पुस्तक समोर ठेवून वाचीत होती. इन्दूचा शब्द कानीं येतांच विमला पुस्तक बाजूला सारून हसत हंसत म्हणाली, "कोण, वहिनी ? या, बसा. दुर्गामणीच्या दुर्दैवानें तिला अनुभवाव्या लागणाऱ्या दुःखाबद्दल हृदय कसें विदीर्ण होतें बघा वहिनी ! आः !"

इन्दूनें जिज्ञासा केली, "ही दुर्गामणि कोण ?"

"म्हणजे ? ही दुर्गामणि कोण म्हणून मलाच उलट तुम्ही प्रश्न विचारतां म्हणजे नवल नाही का ? थट्टा करता वाटते आमची ! खरेंच, ज्या त्या वर्तमानपत्रांतून आणि मासिकांतून पुस्तकाबद्दल जी प्रशसेचीं पानेंच्या पानें लिहिलीं जात आहेत, ते अगदीं योग्य आहे, असें पुस्तक वाचल्यानंतर वाटल्याखेरीज राहात नाही बाई !"

दुर्गामणी हें एखाद्या व्यक्तीचें नांव नसून तें एका कादबरींतील एका पात्राचें नांव आहे, व या पुस्तकाबद्दलच गोष्टी चालल्या आहेत, हें पाहून इन्दूची उत्कठा बरीचशी शांत झाली. हात पुढे करून ती विमलला म्हणाली, "पाहू बरे, कोणतें पुस्तक आहे तें ?"

पुस्तक हातांत घेऊन, ती पहिलें पान उलटून पाहते, तों ग्रंथकार—तिच्या पतीचेंच नांव छापलेलें !—तें पान उलटून पुढील पानाकडे दृष्टि वळवून पाहते, तों तें पुस्तक विमलेला समर्पण केलेलें दिसून आले ! पुस्तकाचीं पानें इकडे तिकडे थोडा वेळ चाळून इन्दूनें पुस्तक खालीं ठेवलें. तिची मुद्रा गभीर दिसत असून, ती अतःकरणातील विषण्णता झाकण्याचा प्रयत्न करीत असावी, असा पाहणारास भास होत होता. पुस्तक लिहिलें, छापलें, प्रसिद्ध सुद्धां झालें तरी तिला त्याबद्दल एक अवाक्षर सुद्धा कळूं नये ना ! तिच्या मुखाकडे पाहतांच तिला एक सुद्धां प्रश्न विचारण्याचें साहस विमलला झालें नाहीं ! कांहीं वेळानतर इन्दू स्वतःच म्हणाली, "हें नाटके आणि कादबऱ्या वाचणें मला आवडतही नाही, आणि त्याकडे माझी प्रवृत्तिही नाहीं ! पण तें कांहीं का असेना, पुस्तक चांगलें झालें आहे, हे ऐकून समाधान वाटते."

इतक्यात अंबिकाबाबूंच्या घरचा नोकर आला, व तो आपल्या धनिणीला उद्देशून म्हणाला, "मालक विचारताहेत, आज त्यांचें म्यूझियम पाहण्याकरतां जायचें ठरले होते, तर जाऊ का, म्हणून." हा निरोप विमला आणि इन्दू समोर कळतांच तिला साहजिकपणे थोडी लाज वाटली. ती नोकरास म्हणाली, "नको. आज म्हणावें बाहेर थोडी थडी पडली आहे, आणि प्रकृती सुद्धां अजून व्हावी तशी बरी झालेली नाहीं. तेव्हां आज कुठें बाहेर जाऊं नये म्हणावें. जा."

नोकर निघून गेला. इन्दू आश्चर्यचकित दृष्टीने अंबिकाबाबूच्या पत्नीकडे पाहूं लागली. अशी विलक्षण गोष्ट तिनें साऱ्या जन्मांतसुद्धा कधीं ऐकली नव्हती!

अंबिकाबाबूचा नोकर परत जातो न जातो, इतक्यांत विमलचा नोकर भोला आत आला, व विमलला उद्देशून म्हणाला, " ऑफिसमधून निरोप आला आहे, की आज तेथे एक सुरेख मोठे कपाट लिलावात विकले जाणार आहे, तेव्हां आपल्या दिवाणखान्यात ठेवण्याकरिता तें घ्यायचें की काय ! "

विमला म्हणाली, " नको, विकत घेण्याचे कारण नाही, असा निरोप कळवायला सांग जा त्याला. म्हणावे दुसरे एखादें लहान कपाट घेतले, तरी चालेल!"

भोला निघून गेला. इन्दू जास्तच आश्चर्यचकित होऊन बसून राहिली. ह्या उभयता स्त्रियांच्या पतींनी त्यांना विचारलेल्या प्रश्नावरून त्यांच्या प्रभुत्वाबद्दल विशेष बोध होण्यासारखा नव्हता. ह्या स्त्रियांनीं जे निरोप आपापल्या पतीकडे रवाना केले, त्यावरून त्यांच्या दासीपणाचीही तिला कल्पना होईना! उलट, तिच्या अंतःकरणात स्वतःबद्दल विचार उत्पन्न होऊन ते एका दारुण निराशेने परिपूर्ण झालें! त्यांच्याशी आपली तुलना करून पाहताच, ती त्यांच्यासमोर अगदी तुच्छ भासूं लागली व्यथेनें तिचे सारे हृदय भरून गेले. पतीच्या सेवेत आपलें सर्वस्व अर्पण करून स्वतःला त्यांची दासी म्हणवून घेण्यात भूषण मानणाऱ्या ह्या दोन्ही स्त्रिया, वास्तविक पाहता आपल्यापेक्षा फार श्रेष्ठ आहेत हे तिला दिसून आले.

याच वेळेस विमलेनें तिला हळूच विचारले, " वहिनी, खरंच का तुम्हाला दादाच्या या पुस्तकाबद्दल कांही ठाऊक नव्हते? मला नाहीं बाई हें खरें वाटत!"

आपल्याला त्याबद्दल विशेष कांहींच वाटत नाहीं असे दाखवून इन्दू निष्काळजीपणे म्हणाली, " मला खरोखरीच त्याबद्दल काही एक माहिती नव्हती! त्याबद्दल मला हें आत्तांच तुमच्या येथे आल्यानंतरच समजले; आणि तुम्हाला खरें सांगायचे म्हणजे, ह्या बाबतींत मी विशेष पर्वाही करीत नाही. जेव्हा पाहावें तेव्हां सारखें लिहिणेच तर चाललेले असते. काय काय लिहिलें त्याचा रोजच्यारोज कोण शोध करीत बसतो! मला बाई आहे ह्या गोष्टीचा कंटाळा! बरें, पण जाऊ द्या त्या गोष्टी! मी उद्यां जाणार आहें माहेरीं; तेव्हा म्हटलें जाऊन भेटून यावें एकदां तुम्हाला!"

विमला उद्विग्न होऊन एकाएकीं म्हणाली, " नका, वहिनी तुम्ही माहेरीं जाऊं नका."

" कां बरें?"

"अजूनसुद्धां ह्या गोष्टी तुम्हाला समजावून सांगायला का हव्या, वहिनी? दुःखांत नाहीं तर नाहीं, पण सुखांत सुद्धां दादा तुम्हाला वांटेकरी करीत नाहीं, ही गोष्ट अजूनसुद्धां तुमच्या ध्यानांत येत नाहीं का? काय बरे तुम्हाला म्हणावें वहिनी! अहो तुमच्या पतीचें तुम्हावर असलेलें प्रेम जवळ जवळ नाहीसें होण्याच्या मार्गाला लागलें आहे, हें दिसून येत नाहीं का तुम्हाला?"

इन्दू एकाएकी रुष्ट होऊन म्हणाली, "वन्सं, एकदां नाहीं, मी तुम्हाला शंभरदा सांगितलें असेल, कीं मला ते प्रेम नको–नको–नको! मी आपली मेदिनीपुरास दादाजवळ जाऊन सुखांत दिवस कंठीन. ह्यापुढें माझी येथे येण्याची इच्छा नाहीं. मला पुन्हा आणण्याकरिता कोणी येण्याची तसदी घेण्याचें कारण नाहीं."

हें ऐकून विमलेलाही क्रोध चढला. ती क्रुद्ध स्वरांत म्हणाली, "ह्या असल्या गोष्टी, वाटल्यास पुरुषांच्या जवळ जाऊन सांगा; त्यांना त्या खऱ्या वाटतील! माझ्यासारख्या स्त्रीजवळ ह्या गोष्टी सागण्यात काहीं हाशील नाहीं. तुमच्या माहेरची माणसें फार श्रीमंत आहेत; तुमच्या वडिलानी तुमच्या नावाने संपत्ति ठेवल्याकारणानें तुमचा योगक्षेम सुखानें चालायला कांहीं हरकत नाहीं--हाच अभिमान वाटतो ना तुम्हाला? पण हें पूर्णपणें लक्षांत असू द्या कीं, परमेश्वर गर्वाचें घर खाली केल्याखेरीज सोडणार नाहीं. तुमचा हा वृथा अभिमान चिरकाळपर्यंत टिकून राहणे शक्य नाहीं. असा एक दिवस खात्रीनें उगवेल, कीं तुम्ही आज करीत असलेल्या चुकीबद्दल तुम्हाला पश्चात्ताप वाटेल. तुमचे डोळे उघडल्यानतर मग तुम्हाला दिसून येईल, कीं तुम्हीं आज करीत असलेली चूक किती भयंकर आहे तें, वहिनी! तुमचे नशीब चांगलें, म्हणून देवाच्या दयेनें तुम्हाला प्रत्यक्ष कुबेराची सपत्ति लाभली होती; परंतु दैवाला कोण हात देणार? तुमच्यासारख्या उधळ्या स्वभावाच्या स्त्रीच्या हातीं कुबेराची सपत्तिसुद्धां किती दिवस टिकून राहील?—आणि मला वाटतें, आता तुमच्या त्या संपत्तीपैकीं कांहीं उरलेलें नाहीं; तुम्ही सारेंच गमावून बसलां आहां."

नरेन्द्रानें लिहिलेलें पुस्तक अजूनसुद्धां विमलेच्या हातातच होतें. त्याकडे इन्दूची दृष्टि जातांच तिच्या अंतःकरणांत पुन्हा क्रोधाचा संचार झाला. विमलेला उत्तर देण्याकरितां ती म्हणाली, "अभिमान वाटत असल्यास तो लोकांना; आणि तसें पाहू गेलें, तर वन्सं, अभिमान वाटण्यास योग्य कारण मिळालें, तर तो कोणाला वाटणार नाहीं? पण तें जाऊ द्या. माझ्या दैवांत, माझा सर्वनाश व्हावा असेंच जर लिहिलें असेल, तर खुशाल होवो. त्याला कोण काय कर-

णार ? आणि त्याबद्दल तुम्हीही विचार करून स्वतःला शीण करून घेण्यांत काय हांशील ? वन्सं, या जगांत प्रत्येक जण आपापल्या नशिबानें येतो; त्याला तुम्ही काय करणार ? पण तुमच्या ह्या साऱ्या गोष्टी मी मुकाट्यानें ऐकून घेतें ही माझीच चूक आहे ! जाऊ द्या वन्सं. माझी आतां येथें राहण्याची इच्छा नाहीं—याउपर मी येथे थांबणार नाही. याचा काय परिणाम होणार असेल तो भोगण्यास मी तयार आहें. त्याबद्दल मला कोणाचा उपदेशही नको; किंवा कोणाशीं भांडत बसण्याचीही माझी इच्छा नाहीं ! "

यावर विमला काही बोलली नाहीं. तिच्या हृदयाला होणाऱ्या दारुण वेदना तिच्या तिलाच ठाऊक ! तरी पण, असा अपमान सोसूनही तिच्याशी जास्त तर्कवितर्क करणे विमलला बरे वाटले नाहीं.

इन्दू घरी जाण्यास निघाली. त्याबरोबर विमला पुढें होऊन म्हणाली, "थांबा थोडें वहिनी. मानानें तुम्ही माझ्यापेक्षा वडील आहात—तेव्हा एकदा नमस्कार करतें. "

* * * *

त्या दिवशी सूर्य अस्तास जावयाला बराच अवकाश असूनही सायंकाल झाल्याप्रमाणें चोहोकडे अंधकार दिसूं लागला होता. आकाश मेघाच्छन्न झालें असून गडगडाटामुळे आणि विद्युल्लतेच्या चकचकाटामुळें अंतरिक्षात बरीच गडबड उडून गेलेली दिसत होती. "जो गर्जेल तो वर्षेल काय ?" या पूर्वापार चालत आलेल्या म्हणीला हरताळ फांसून, विलक्षण गर्जना करीत असलेल्या त्या काळ्या कुट्ट मेघानीं मेदिनीपुरावर आपले जलधारारूपी शर वर्षून आक्रमण करण्यास सुरुवात केली ! यदृच्छेनें अंतरिक्षांत गिरक्या मारणारी बिचारी सौदामिनी, अंतरिक्षांतूनच आलेल्या ह्या हल्ल्यांचा प्रतिकार करण्याचें सामर्थ्य कोठून आणणार ? शरवर्षावानें जर्जर होऊन ती लवकरच मेघराजाला शरण गेली ! विजयोत्सवानें मत्त झालेल्या मेघांचें साम्राज्य मेदिनीपुरावर अविरतपणें सुरू झालें !

भावाच्या घरीं येऊन आपल्या चित्ताला समाधान वाटेल, असें इन्दूला वाटलें होतें; परंतु तिची आशा प्रत्यक्ष अनुभवानंतर विफल ठरली ! आपलें कांहीं तरी हरपलें आहे—इतरांपेक्षां आपण कोणत्या तरी बाबतींत क्षुद्र आहों, ह्या जाणिवेनें तिच्या अंतःकरणांत दिवसेंदिवस असमाधानाची वृद्धि जास्त जास्त होऊं लागली !

आज तिच्या धाकट्या वहिणीचे पति काही दिवसपर्यंत श्वशुरगृहनिवासाचें स्वर्गसुख अनुभवण्याच्या हेतूने मेदिनीपुरास आले होते. अर्थातच, घरातील एकूणएक मडळी त्याच्या स्वागताची झटून तयारी करण्यात गुग झाली होती! जावईबुवा दिवाणखान्यात बसले असून सर्वांबरोबर गप्पागोष्टी, हास्यविनोद करीत होते. इन्दूही काही वेळपर्यंत तेथे बसली होती; परतु हा आनदाचा कलकलध्वनि तिच्या दु खी मनाला तापदायक वाटू लागला. आपल्याकडे कोणाचें लक्ष नाहीं असे पाहून ती कमलला घेऊन हळूच दिवाणखान्यातून निसटली व आपल्या खोलीत येऊन पडून राहिली! येथेसुद्धा, दिवाणखान्यातील आनद आमोदाचा हास्यध्वनि मधून मधून तिच्या कानांवर येऊन आदळत होताच. नाना विचाराचें काहूर उठून तिचें अत करण कोठल्या तरी अव्यक्त लज्जेनें भरून गेलें!

इन्दूला मेदिनीपुरला येऊन आज तीन महिने झाले. तिची धाकटी बहीणही आपल्या पतिगृहाहून त्याच सुमारास मेदिनीपुरास आली होती! या अडीच तीन महिन्याच्या अवधींत तिचा पति शातीपुराहून (इन्दूच्या धाकट्या बहिणीचें सासर शातीपुरास होतें) कमीतकमी चार वेळा तरी येऊन गेला होता. परतु नरेन्द्र एकदांसुद्धा आला नाही. एवढेच नाही, परंतु एक पत्र पाठवून तिची विचारपूस करण्याचेसुद्धा त्याला काही प्रयोजन वाटलें नाहीं!

हा प्रकार इन्दूच्या माहेरच्या मडळीच्या ध्यानात आला नव्हता, असें नाही. पुष्कळ वेळा त्याच्या भाषणात ह्या विषयाबद्दल चर्चा निघत असून, त्याची चागली वाटाघाटही होत असे. आज कदाचित् पुन्हा ह्या विषयाची चर्चा निघेल ते टाळण्यासाठी म्हणून इन्दूने एवढ्या घाईघाईने दिवाणखान्यातून बाहेर पाय काढला होता!

नरेन्द्र कधीं मेदिनापुरास आला नाही. त्याच्या अवहेलनेमुळे तिला काय दुःख होत होतें ते इन्दूलाच ठाऊक. परतु ह्या अवहेलनेचा परिणाम नुसत्या इन्दूच्या अतःकरणाला व्यथा देण्यापुरताच झाला असता, तर तिला त्याचे काहींच वाटलें नसते. कदाचित् तिनें त्याबद्दल पर्वाही केली नसती! परतु ही स्थिति स्त्रीजातीला अत्यत लज्जास्पद असून त्यामुळें तिची दिवाभीताप्रमाणे स्थिति होते, हें तिला ठाऊक नव्हतें! भ्रूणहत्या, नरहत्या इत्यादि पापाप्रमाणे हें पापही स्त्रीला एकलकोंडेपणानें समाजांतून बाहेर रहावयाला लावतें! परंतु असें हें पातक तरी काय आहे, हेच तिला समजत नव्हते. तिच्या ह्या अज्ञानामुळेंच विमलेच्या उप-

देशाची तिनें अशी उपेक्षा केली होती. परंतु आतां, प्रत्यक्ष अनुभवानें एक एक गोष्ट पटू लागल्यानतर तिला तिची भ्रामक समजूत कळून आली! तिला आतां चागले समजून चुकलें कीं, माझ्यावर माझ्या पतीचे प्रेम नाही, ही गोष्ट प्राण गेला तरी स्वीकार करणे स्त्रीला अशक्य आहे!

हा वेळपर्यंत ती आपल्या पतीच्या घरांत त्याच्याच सहवासात राहत असे. त्या वेळी, त्याच्याशीं वाटेल तसा बेबनाव झाला, तरी बाहेरच्या समाजात ती वर डोके करून खुशाल वावरत असे! पतीच्या छायेचे छत्र मस्तकावर धारण केले असता, कोणत्याही अपवादाचा ताप स्त्रीच्या देहाला स्पर्श करू शकत नाही. परतु आता ती राहत होती ते घर तिचे नव्हते! जगाच्या भेदक दृष्टीपासून रक्षण करण्याकरितां आज तिच्या अगावर पतीच्या कृपेचे कवच नव्हतें! आज ती एकाकी,—अगदी असहाय अवस्थेत होती! आणि ही करुणाजनक परिस्थिति तिनें आपल्या हातानेंच आपल्याभोवती निर्माण करून घेतली होती! आतां तिनें स्वत चे रक्षण तरी कसे करायचें? आपल्या दुर्दैवाबद्दल दोष तरी कोणाला द्यायचा?

आज तिच्या बहिणीचा पति घरीं आल्यानतर तर तिची स्थिति फारच केविलवाणी झाली होती! तिच्याकडे पाहणाऱ्या प्रत्येक व्यक्तीची दृष्टि तिच्याबद्दलच्या करुणेने भरून गेली आहे, असें तिला वाटू लागले! दुःखदग्ध हृदयावर करुण-दृष्टि अमृताचा वर्षाव करते म्हणतात; परंतु इन्दूचे दु खी हृदय या करुण-दृष्टिपातामुळे जास्तच दग्ध होऊ लागलें. कमलला कोणीही तिच्या पित्यासबंधी जिज्ञासा केली, म्हणजे इकडे इन्दूचे हृदय लज्जेनें म्लान होई! घरी जाण्यासंबधीं कोणीं तिच्याजवळ प्रश्न काढला, म्हणजे धरणी दुभंग होऊन आपल्याला आत घेईल तर बरे असे तिला वाटूं लागे. हाय! हाय! तिच्यासारखी दुर्दैवी स्त्री जगात दुसरी कोणी असेल काय? तिचा दुरभिमान एवढया उच्च,—नव्हे, नीच थराला जाऊन पोहोचला होता कीं, पतिगृह सोडताना नरेन्द्राला अत्यंत कटु शब्दाचा प्रहार करून, शेवटीं ती त्याला वजावून आली होती, की, " स्त्रीचे प्रतिपालन करण्याची क्षमता अगीं येण्याच्या पूर्वी त्यानें तिला पुन्हा आणण्याकरितां येऊं नये!"

इन्दूच्या नेत्रावरून मोहाचें भ्रमपटल दूर झालें!

× × × ×

" कमल, कां बरें बाळ, रडायला काय झालें तुला ? "

कमला रुद्धस्वरांत म्हणाली, " आई, आपण बाबांकडे केव्हां बरं जाणार ? त्यांना पहावें असें मला फार वाटतें ! " इन्दूच्या जखमी हृदयावर जणूं काय आणखी एक जबरदस्त प्रहार झाला. कांहीं न बोलतां तिनें कमलला आपल्या पोटाशीं धरलें, आणि स्वतः हुंदके देऊन रडूं लागली ! बाहेर चाललेल्या जलवृष्टीनें तिची लाज राखली ! तिचें रोदन कमलखेरीज कोणाच्याही लक्षांत आलें नाही !

दुसरे दिवशीं प्रातःकाळींच,–इन्दूनें शिकवून ठेवल्यावरून की काय कोणाला ठाऊक––कमला, " मला बाबांच्याकडे जायचें " असा हट्ट धरून बसली ! इन्दूनें तिला आजारून गोंजारून, धाक दाखवून समजावण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, परतु ती आपला हट्ट कांही केल्या सोडीना ! बालहट्ट आणि स्त्रीहट्ट हे दोन्ही एकवटल्यावर त्यापुढें इन्दूला हात टेकावे लागले यांत काय नवल ? नाइलाज होऊन, ती दादाकडे जाऊन म्हणाली, " कमल कांही केल्या उगी रहात नाहीं. कलकत्त्यास जायचें असा हट्ट धरून बसली आहे ! "

दादा म्हणाले, " मग काय हरकत आहे, उद्यां सकाळच्या गाडीनेंच तूं तिला घेऊन जा ! नरेन्द्रबाबू कसे काय आहेत ? त्यांचें मला तर कधींच पत्र येत नाही. तुला येते ना ? "

खालीं मान घालून इन्दू म्हणाली, " हो ! "

" प्रकृति बरी आहे ना त्यांची ? "

पूर्ववत् इन्दूनें उत्तर दिलें, " हो ! "

* * * * *

आश्चर्यानें स्तमित होऊन विमलेनें विचारले, "कोण, वहिनी ? आणि आलां केव्हा तुम्ही ?"

"ही नुकतीच येतें आहें !"

इन्दूच्या मागोमाग एक नोकर टांग्यांतून ट्रंक घेऊन येत असलेला विमलच्या दृष्टीस पडला. इन्दूबद्दल आपली दारुण विरक्ति कशी तरी आंतल्या आंत दाबून ठेवून ती म्हणाली, "म्हणजे ? स्टेशनवरून सरळ इकडेच आला वाटतें ! घरीं गेलां नाहीं का ?"

"अहं ! टागा घरासमोरून येत असतां, कमलला तेथें उतरवून मी येथे निघुन आलें. मी आलें, तें फक्त तिच्या हट्टाकरतांच. एरव्हीं आलें नसतें !"

विमला एक दीर्घ निश्वास सोडून म्हणाली, " तुम्ही आलां नसतां, तर तेंच फार बरें झालें असतें. वहिनी, तेथें आतां तुम्ही जाऊनसुद्धां कांहीं उपयोग नाहीं!"

इन्दूच्या हृदयांत धस्स झालें ! तिनें हृदयाची आतुरता लपविण्याचा विफल प्रयत्न करीत शुष्कमुखानें विचारलें, " का बरे, वन्स?"

विमला सहज गभीरभावानें म्हणाली, " ती सारी हकीगत मग सांगेन. अगोदर लुगडे बदलून, हात पाय धुऊन, फराळ आटोपून घ्या! Go on! व्हावयाचे तें तर झालेंच—आता तें काही परत येऊं शकत नाही—मग त्याबद्दलची वार्ता आज कळली काय, किंवा उद्या कळली काय, सारखेच! ह, चला!"

इन्दू उभी होती, ती मट्कन खालीं बसली. तिचे मुख प्रेताप्रमाणे विवर्ण दिसू लागलें!—अत्यत क्षीण स्वरांत ती म्हणाली, " नाहीं वन्स, सारी हकीगत अगोदर ऐकल्याशिवाय मी एक घोंटभर पाणीसुद्धां घेणार नाही. मी येताना पाहिले, टागा उभा राहिलेला पाहताच स्वारी दारात येऊन उभी राहिली होती. प्रकृतीही आता पूर्वींपेक्षां किंचित् सुधारली असावी, असा भास होत होता. माझें सौभाग्य अखड असतां–मी तिकडे जाऊन कांहीं उपयोग नाही, असे तुम्ही का बरें म्हणता ?"

किंचित् कालपर्यंत थांबून विमलेनें पुन्हां एक दीर्घ निश्वास सोडला. नंतर ती हळू हळू म्हणाली, " खरोखरच वहिनी, आतां त्या घरात तुम्हाला स्थान उरले नाहीं. आतां तुम्ही माझ्या घरीं राहिला काय, किवा आपल्या दादाच्या घरीं राहिला काय, सारखेंच! माझ्या दादाच्या घरी आतां तुम्ही वास्तव्य करू शकाल असें मला वाटत नाही!"

प्रबल वेगानें आलेले अश्रु आंवरण्याचा प्रयत्न करून रुद्ध स्वरांत इन्दू म्हणाली, " वन्स, असा माझा अंत कां बरे पाहता ? आता माझ्याच्यानें जास्त धीर धरवत नाहीं; माझ्या नशिबीं काय आहे ते लवकर स्पष्टपणे कळवा! काय झालें आहे—दुसरें लग्न का केलें आहे त्यांनीं?

" तुम्हाला तसें वाटतें का ? "

" नाहीं, मला तसें कधीही वाटलें नाहीं. माझा अपराध वाटेल तेवढा भयंकर असो; त्यांच्या हातून असें अन्याय्य आचरण कधींही होणार नाहीं ह्याबद्दल माझी पूर्ण खात्री आहे. मग का बरें तुम्ही म्हणतां मला त्या घरांत स्थान मिळणार नाहीं असें ? "

विमलेच्या नेत्राच्या पापण्या ओल्या झाल्या; परंतु तिच्या नेत्रांतून अश्रुबिंदु बाहेर आलेला दिसला नाहीं. ती इन्दूच्या मुखाकडे पाहून म्हणाली, " वहिनी, ही गोष्ट मी तुम्हाला कोणत्या उपायाने समजावून सागू तेच मला कळत नाहीं. शभूबाबूनें दादाला कैदेंत टाकले होते ! "

इन्दूच्या सर्वांगावर काटा उभा राहिला. ती म्हणाली, " म्हणजे ? "

विमला म्हणाली, " आम्ही सारीजणं तेव्हां गेलो होतो काशीला ! येथे एकटा दादाच काय तो होता. अशा वेळीं एके दिवशी शभूबाबूनें दादाला नोटीस दिली, त्याचे सारे रुपये पटवून देण्याबद्दल ! रुपयाची व्यवस्था करण्याकरितां दोन दिवसाची सवलत देण्यात आली होती ! एवढया थोड्या अवधींत चार हजार रुपयांची व्यवस्था दादाला करता न आल्याकारणाने त्याच्यावर तुरुगांत जाण्याची पाळी आली ! हें वर्तमान कळविण्याकरिता त्याने भोलाला काशीस माझ्याकडे पाठविलें, परंतु दुर्दैवानें आम्ही त्या वेळेस बनारस सोडून अलाहाबादेस निघून आलों होतो. भोला आमच्या तपासांत भटकत होता, तरी त्याची आमची भेट झाली नाही. अलाहाबादेहून आम्ही घरीं आलो एवढयात दहा दिवस निघून गेले. दादा तुरुंगातच होता ! येथे आमच्याजवळ तरी एवढी मोठी रक्कम कोठून असणार ? मी आपले दगिने गहाण ठेवून शंभूबाबूचे कर्ज फेडून टाकलें, आणि अकराव्या दिवशीच दादाला तुरुगातून सोडवून आणलें ! आता तुम्हीच विचार करून पहा बरे वहिनी, तुमच्या अगावरसुद्धा पांच सात हजाराचे दागिने आहेत. त्याखेरीज तुमचे स्वतःचे दहा हजार रुपये रोख ब्याकेत तुमच्या नावानें जमा केलेले आहेत ! हें सर्व दादाला ठाऊक असूनसुद्धा, दादाने दहा दिवसपर्यंत तुरुगात राहणे पतकरलें, परंतु त्याने तुम्हापुढें हात पसरला नाहीं ! त्यानें तुमच्याकडे एक बोटभर चिठ्ठी पाठविली असती, तरीसुद्धां हा सर्व प्रसंग टळून, सारें काहीं सुरळीतपणे पार पडले असते ! पण तसे करणे त्याला आवडलें नाहीं ! ह्यावरून तुम्ही पहा. आतां तुम्ही तिकडे जाऊन काय करणार ? जाऊं द्या वहिनी, त्याला तुमच्याकडून मिळालें तेवढें सौख्य पुरे झालें ! आता कां त्याच्या पाठीस लागतां ? जाऊ द्या त्याला, म्हणजे त्यालाही शांति मिळेल व तुम्हालाही बरें वाटेल !"

इन्दू खालीं मान घालून सर्व हकीगत ऐकत होती ! विमलेच्या कठोर भाषणाचा तिच्यावर आज कांहीं परिणाम झालेला दिसला नाहीं ! कांहीं वेळानंतर, आपल्या अगावरील एक एक दागिना काढून विमलेसमोर ठेवीत ती गंभीरपणें म्हणाली,

" हे दागिने विकून, गहाण पडलेले तुमचे दागिने तुम्ही सोडवून घ्या ! वन्सं, मी जाते त्याच्याकडे ! तुम्ही म्हणतां मला तेथे स्थान मिळणार नाही म्हणून–परंतु मी म्हणते, ह्या वेळेस मला तेथें खात्रीनेच स्थान मिळेल ! जी एक वस्तु आजपर्यंत मला माझ्या हक्काच्या स्थानापासून वंचित करून दूर ठेवीत आली, तीच वस्तु आज मी तुम्हासमोर टाकून देऊन माझ्या आश्रयस्थानी जात आहे ! उद्या एकदां या तिकडे वन्स–आपल्या दादाला आणि वहिनीला भेटून या !–येते मी !" असें म्हणून टांग्याची वाट न पाहता, इन्दू वाट चालू लागली.

" अरे भोला, वहिनीना त्याच्या घरी पोचवून ये " असें म्हणत म्हणत, डोळ्यातील अश्रु पदराने पुशीत विमला इन्दूला पोचविण्याकरिता दारापर्यंत आली !

---

# प्रपंचकथा

## ( द्वितीय खंड. )



### बिजली.

बरेच दिवसांपूर्वीची गोष्ट. सत्येन्द्रनाथ चौधरी, हा एका मोठ्या श्रीमत जमीनदाराचा एकुलता एक मुलगा. जुन्या काळच्या श्रीमताचा मुलगा म्हटला, म्हणजे शिक्षणाच्या नावानें आवळ्याएवढे असावयाचेंच ! परतु सत्येन्द्राचे वडील आपल्या कालधर्माच्या मानाने फार प्रौढ विचाराचे होते लहानपणापासून त्यांनीं आपल्या मुलाच्या शिक्षणाबद्दल किंचित्‌ही हयगय होऊ दिली नाही. त्याच्या सुदैवानें त्याना सर्व दृष्टीनी योग्य अशी पत्नी लाभली असल्याकारणाने, मुलाच्या शिक्षणाच्या बाबतींत त्या दिशेनें काहीच भय बाळगण्याचे कारण नव्हते !

सत्येन्द्र हायस्कुलात शिकत असतांच त्याचे वडील मरण पावले ! हा त्याच्या शिक्षणक्रमावर मोठाच घाला पडला होता ! परंतु त्याचे दैव चागले, म्हणून त्याच्या मातेने इस्टेटीचा सर्व कारभार आपल्या शिरावर घेऊन त्याला आपला शिक्षणक्रम पुढें चालविण्यास पूर्ण मोकळीक दिली ! तो मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाल्यानतर पुढील उच्च शिक्षण घेण्याकरिता त्याला कलकत्त्यास पाठविण्यांत आले. तेथे यशस्वी रीतीने चार वर्षेपर्यंत शिक्षण घेतल्यानतर, यदा सत्येन्द्र बी. ए. ची परीक्षा पास होऊन आपल्या गावीं परत आला होता.

कांहीं वेळपर्यंत इकडच्या तिकडच्या गोष्टी झाल्यानंतर, सत्येन्द्राच्या लग्नासंबंधीं विषय काढून त्याची आई म्हणाली, " बाळ, आता माझें वय झाले. ही ससाराची यातायात आता माझ्याच्यानें सोसवत नाही ! तुझे एकदा दोन हातांचे चार हात झालेले पाहिले, म्हणजे माझ्या नेत्रांचें पारणे फिटेल ! हा सारा पसारा एकदां तुझ्या बायकोच्या स्वाधीन केला, कीं गंगेत घोडे न्हाले, असें मला वाटेल ! ह्या वर्षीच्या तुझ्या परीक्षेचीच मी वाट पहात होते. ईश्वरकृपेनें तूं पासही झालास ! बाकी तू पास होणार ह्याबद्दल माझी पूर्वीपासूनच खात्री होती म्हणा; म्हणूनच मी मुलगी पाहूनसुद्धां ठेवली आहे ! मुलगी पण मुलगी आहे—आका-

शातील नक्षत्र जसे! बाळ, माझे म्हातारीचे ऐक; एकदां तू स्वत: जाऊन त्या मुलीला पाहून ये!"

सत्येन्द्र मानेने नकार दर्शवीत म्हणाला, "नको, आई, लग्न करण्याबद्दल इतक्यात तू मला आग्रह करू नकोस. यदा बी. ए. झालो, तरी पुढे शिक्षण चालू ठेवावे अशी माझी फार इच्छा आहे. तेव्हा, इतक्यातच हे लग्नाचें विघ्न उपस्थित न झालेले बरे!"

"कां बरे? लग्न झाले म्हणजे तुझ्या शिक्षणक्रमांत विघ्न उत्पन्न होईल, अशी शंका तू का बाळगतोस? सूनबाई राहील येथे माझ्याजवळ आणि तू राहशील लांब—कलकत्त्याला! येथे राहून ती तुझ्या तेथील शिक्षणाच्या आड कशी येणार, हे मला समजत नाही!"

"तू म्हणतेस ते सारे मला मान्य आहे. तरी पण ही भानगड इतक्यांत उपस्थित न झालेलीच बरी! सध्या......" असें बोलत बोलत सत्येन्द्र आईच्या तडाख्यातून सुटण्याच्या हेतूने बाहेर जाऊ लागला. त्याचा उद्देश ओळखून त्याला मध्येच थांबवीत ती म्हणाली, "थांब, तुला आणखी कांहीं सांगायचे आहे; इतक्यात बाहेर जाऊ नकोस." थोडा वेळ विचार करून ती पुन्हा म्हणाली, "त्या मुलीच्या आईला मी वचन देऊन ठेवलें आहे. अर्थातच, तू माझ्या सांगण्याच्या बाहेर जाणार नाहीस असा माझा पूर्ण विश्वास आहे, म्हणूनच मी तसें केले. आता दिलेला शब्द खाली पडूं न देणे सर्वस्वी तुझ्या हातीं आहे. बोल, तू मीं दिलेला शब्द खरा करून माझा मान राखशील ना?"

आता सत्येन्द्र विलक्षण पेचात सापडला! आपल्या इच्छेविरुद्ध आपल्या पायात विवाहाची शृंखला अडकविण्याचा प्रयत्न करीत असलेल्या मातेचा त्याला थोडासा रागही आल्याखेरीज राहिला नाही! तो किंचित् रुष्ट होऊन म्हणाला, "मला विचारण्यापूर्वीच वचन दिलेस काय म्हणून तू?"

त्याचे हे उत्तर ऐकून त्याच्या मातेला साहजिकच वाईट वाटलें. ती व्यथित अन्त:करणाने म्हणाली, "ती माझी चूक झाली हे मी कबूल करते. परंतु दिलेला शब्द आता परत घेण्याची तर सोय नाही! आपल्या मातेचा अपमान होऊं न देणे हे आता तुझ्या हातात आहे! तुला वाटेल तसें कर! शिवाय लग्न करण्यांत तू माझी इच्छाच पुरविणार आहेस असे नाहीं! तर दुसऱ्या एका गरीब दुःखी कष्टी जीवाला कायमच्या चिंतेतून मुक्तता दिल्याचें श्रेय तुझ्या पदरीं पडणार

आहे. त्या मुलीला एकट्या आईखेरीज दुसरें कोणीही नाहीं! पहा, तुला वाटेल तसें करण्यास तू मोकळा आहेस; परंतु माझ्या म्हातारीच्या पाढऱ्या केसांची कांहीं लाज ठेवायची असेल, तर..."

आपण आपल्या उर्मट उत्तरानें मातेच्या मनाला दुःख दिलें हें पाहून सत्येंद्रालाही आतां वाईट वाटलें! तो जात्याच कोमल मनोवृत्तीचा होता! शिवाय त्याचें मातेवरही फार प्रेम होते. तो सहसा तिच्या इच्छेच्या विरुद्ध वर्तन करीत नसे. परंतु ह्या लग्नाच्या बाबतीत, त्याचें मत आईच्या इच्छेच्या अगदीच विरुद्ध होते. इतक्यात लग्न करावे असे त्याला खरोखरच वाटत नव्हतें तरी पण आईच्या अंतःकरणाला रोखठोक उत्तर देऊन इतक्यात जास्त दुखविण्यात अर्थ नाही असा विचार करून, "ठीक आहे. विचार करून काय ते कळवितों," असें गुळमुळीत उत्तर देऊन तो तेथून बाहेर निसटला!

आई बराच वेळपर्यंत सत्येन्द्र गेला त्या दिशेकडे शून्य दृष्टीने पहात उभी राहिली! सत्येन्द्राचे वडील वारले, तेव्हापासूनची एक एक गोष्ट तिच्या अंतःकरणात उभी राहू लागली! पतीचा मृत्यू झाल्यानंतर तिनें सारा कारभार स्वतःच पाहण्याचे ठरविण्याची मुख्य कारणे दोन. एक तर सत्येन्द्राचे वय लहान असून, तो इस्टेटीचा कारभार पाहण्यास योग्य नव्हता हे, व दुसरें म्हणजे, मुलानें शिक्षण मध्येंच सोडू नये अशी तिची मनापासून इच्छा होती, हे! सत्येन्द्राला शक्य तेवढें शिक्षण द्यावयाचे असें त्याच्या वडिलानें ठरवून ठेवलें होते! त्याला पुढे शिकविण्यात आपल्या मृत पतीची एक इच्छा आपण पूर्ण करीत आहों ह्या जाणिवेचे समाधान तिच्या चित्ताला आनंद देत असे! सत्येन्द्र वकिलीची परिक्षा पास होण्यापूर्वी त्याचें लग्न करायचे नाहीं, असा तिनेंही निश्चय केला होता. परंतु मध्येच एक गोष्ट घडून आली, त्यामुळें मुलाचे यंदाच लग्न करावयाचा तिनें बेत केला.

ती गोष्ट अशी!—सत्येन्द्राची आई सोमवारचा उपवास करीत असे. तिच्या ह्या व्रताला बारा वर्षें पूर्ण झाल्यानंतर तिनें त्याचें उद्यापन करण्याच्या वेळीं ग्रामभोजन करण्याचे निश्चित केलें! तिच्या गावात अतुलचंद्र मुखोपाध्याय या नावाचा एक गरीब ब्राह्मण रहात असे. त्याला मरून बरीच वर्षें झालीं असून त्याच्यामागें त्याच्या कुटुंबांत त्याची स्त्री आणि एक अकरा वर्षें वयाची मुलगी, अशीं दोन माणसें होतीं! भोजनाच्या दिवशी जमीनदारीणबाईच्या निमंत्रणावरून ह्या उभयता आईलेंकी जमीनदाराच्या घरी जेवावयाला आल्या होत्या! तेव्हांच ती मुलगी

सत्येन्द्राच्या आईच्या प्रथम दृष्टीस पडली. मुलगी तिच्या मनांत भरावयाला तीं दिसण्यांत अत्यंत सुस्वरूप होती, एवढें एकच कारण नसून ती पुढें गुणानेंही हजारांत एक होईल अशी तिची खात्री झाली होती. त्याच वेळेस अतुलबाबूच्या पत्नीशीं सत्येन्द्राच्या आईच्या ह्या लग्नाबद्दल गोष्टी झाल्या होत्या.

सत्येन्द्र लग्न करण्याच्या विचारास अनुकूल नाहीं असे पाहून आतां पुढे काय करावें असा विचार तिच्या अंतःकरणांत उत्पन्न झाला. बराच वेळपर्यंत विचार केल्यानतर ती मनातल्या मनांत म्हणाली, " हरकत नाहीं. एकदां मुलगी तर पहा म्हणावें, मग लग्नाला कसा कबूल होत नाहीं, ते मी पहाते?"

दुसरे दिवशीं तीन वाजण्याचे सुमारास रोजच्या क्रमास अनुसरून सत्येन्द्र फराळ करण्याकरिता आईच्या खोलीकडे निघाला. त्या खोलीच्या दारात पाऊल ठेवतांच सत्येन्द्र आश्चर्यानें दिङ्मूढ होऊन दारातच थबकला. समोरच त्याच्या फराळाचे ताट व चहाची कपबशी ठेवली असून, त्याच्या पाटाच्या अगदी समोर वैकुंठातील लक्ष्मी हिऱ्यामोत्याच्या दागिन्याने नटून थटून बसली होती!

हसत मुखाने मुलाकडे पहात सत्येन्द्राची आई म्हणाली, " बैस पाटावर! असा दारांतच काय उभा राहिलास?"

सत्येन्द्राचें ध्यान भग पावलें. तो दचकून म्हणाला, "येथे नको; आणखी दुसरीकडे कुठें तरी माझा पाट मांडायला सांग!"

आई मद मद हास्य करीत म्हणाली, " लग्न करण्याची तुझी खरोखरच इच्छा नाहीं ना? मग या एवढयाशा टीचभर पोरीची लाज वाटण्याचें तुला काय कारण?"

सत्येन्द्राच्या धीटपणावर त्याच्या मातेनें केलेले हे आक्रमण त्याला सहन झाले नाही. आपली लग्न करण्याची मुळीच इच्छा नाही, हे आपल्या आईला अप्रत्यक्षपणे सुचविण्याला ही संधि फार छान आली आहे, असाही विचार त्याच्या अतःकरणांत उत्पन्न झाला. त्याबरोबर " मला कोणाचीही लाज वाटण्याचे काही कारण नाही," असें म्हणून तो लांब तोंड करून पाटावर जाऊन बसला! आई निघून गेली. दोन मिनिटांच्या आंतच फराळाचें कसें तरी पोटात कोंबून सत्येन्द्र कांही न बोलता बाहेर निघून गेला!

तो आपल्या खोलींत जाऊन पाहतो, तों तेथे त्याची मित्रमंडळी जमली असून चौसरीचा आणि पत्त्याचा डाव रंगांत आला होता. ब्रिज म्हणजे सत्येन्द्राचा अत्यंत

आवडता खेळ ! तो खेळ खेळत असतां सत्येन्द्र आपले देहभानसुद्धां विसरून जात असे. आज तो खोलीत प्रवेश करतांच त्याच्या मित्रमडळीनें त्याचे स्वागत करून ब्रिज खेळण्याकरिता त्याला आव्हान केले; परंतु आश्चर्याची गोष्ट ही कीं, आज त्यानें खेळण्याचें साफ नाकारलें, " माझें कपाळ दुखतें आहे. " अशी थाप मारून, तो एका कोपऱ्यात जाऊन तक्क्याशीं डोळे मिटून पडून राहिला. मित्रमडळीनें फार आग्रह केला, तरी त्यानें खेळात भाग घेतला नाही. न खेळण्याचा त्याचा दृढनिश्चय पाहून शेवटी नाइलाज होऊन मित्रांनी त्याचा नाद सोडला व त्याच्याशिवायच खेळ सुरू झाला ! सध्याकाळ होईपर्यंत पुष्कळ खेळ झाला, किती तरी आरडा-ओरड, हसणे खिदळणे चालले होतें. परंतु सत्येन्द्राचे कशाकडेही लक्ष नव्हतें. शेवटीं कोण हरले, कोण जिकले, त्याला कशाचाही पत्ता नव्हता ! आज कशाकडेही त्याचे मनच लागेना !

हळू हळू मित्र मंडळी त्याचा निरोप घेऊन आपापल्या घराकडे निघून गेली, तरीसुद्धा सत्येन्द्र खोलीतच पडून होता. हळू हळू अधार पडला, नोकर येऊन दिवा ठेवून गेला, तरीसुद्धां सत्येन्द्र तसाच पडलेला. त्याच्या अतःकरणांत कोणते विचार चालले होते, कोणाला ठाऊक ! होतां होतां घड्याळांत आठाचे ठोके पडलेले त्याला ऐकू आले. त्याबरोबर तो उठला आणि निजण्याच्या तयारीनें आपल्या शयनगृहाकडे निघाला. मार्गांत त्याची आई त्याला भेटली. त्याला शयनगृहाकडे जातांना पाहताच ती म्हणाली, "इतक्यात चाललास का निजायला? "

" निजायला नाहीं, अभ्यास करण्याकरितां जातो ! एम्. ए. चा अभ्यास सोपा नाही ! दिवस घालवून उपयोग नाही ! " असें बोलून एक गूढ इगितानें आपल्या मनातील भाव मातेला कळवून, दुम्‌दुम् पाय वाजवीत सत्येन्द्र जिन्याची एक एक पायरी चढूं लागला !

खोलीत येऊन अर्धा तास झाला—साडे आठ वाजले, तरी सत्येन्द्रानें एक ओळ तरी वाचली असेल, तर शपथ ! टेबलावर दिवा जळत होता, त्याच्याकडे पाठ करून नरेन्द्र आरामखुर्चीवर पडला होता. त्याच्या हातात एक उघडें पुस्तक होतें; परंतु दृष्टि पुस्तकाकडे नसून वर सीलिंगकडे पाहून एम्. ए. चा अभ्यास करण्यांत गुतली होती ! एकाएकीं त्याचें ध्यान भंग पावलें ! अभ्यासात पुन्हां विघ्न उपस्थित झालें; व ह्याचें पातक कोणाच्या तरी पायातील पायजिव्याच्या मजुल झणत्काराकडे होतें ! खुर्चीवर उठून बसून सत्येन्द्र पुन्हां लक्षपूर्वक

ऐकूं लागला—झुम्–झुम्! तो ध्वनि थोडा वेळ थांबला आणि पुन्हां सत्येन्द्राला ऐकू आला–झुम्! सत्येन्द्रानें दाराकडे दृष्टि वळवून पाहिले तो तीन वाजता आईच्या खोलीत त्याच्या दृष्टीस पडलेली तीच वैकुठातील लक्ष्मी! सत्येन्द्र टक लावून तिच्या मुखाकडे पाहू लागला. मुलीने मृदु कंठानें पृच्छा केली, " आईनें आपलें मत विचारले आहे! "

कांहीं वेळपर्यंत स्तब्ध राहून सत्य म्हणाला, "कोणाच्या आईनें?" त्याचा आवाज किंचित् कंपित होत होता!

मुलगी म्हणाली, " माझ्या आईनें! "

काय उत्तर द्यावें ते नरेन्द्राला सुचेना. कांही वेळपर्यंत थांबून तो म्हणाला, " माझ्या आईला विचारले, म्हणजे माझे मत काय आहे ते कळेल! "

हे उत्तर ऐकून मुलगी परत जाऊं लागली. सत्येन्द्रानें तिला एकाएकीं प्रश्न केला, " तुमचे नाव काय? "

" माझे नाव राधाराणी. " असे म्हणून ती निघून गेली.

## [२]

अकरा वर्षें वयाच्या टीचभर राधाराणीला आपल्या मार्गांतून एकीकडे सारून सत्येन्द्र एम्. ए. चा अभ्यास करण्याकरितां कलकत्त्यास निघून आला. विश्वविद्यालयाची एकुणएक परीक्षा उत्तीर्ण होईपर्यंत–आणि जमल्यास त्यानतर सबध आयुष्यात सुद्धा लग्न करायचें नाहीं, असा त्याचा दृढनिश्चय ठरला होता. कारण बायकोची बेडी पायांत पडून मनुष्य एकदां ससारबधनात अडकला, म्हणजे त्याच्या कर्तृत्वशक्तीला वाव सापडत नाहीं! मनुष्याची उच्च उच्च ध्येयें साध्य होण्याच्या मार्गांत स्त्री पर्वतरूपानें आडवी येते–इत्यादि, इत्यादि.

तरी पण सत्येन्द्राच्या मन स्थितींत काही तरी विलक्षण क्रांति घडून आली होती खास! मधून मधून कांहीं कारण नसतां, उगाच त्याच्या हृदयाला कशाची तरी हुरहुर लागून रहात असे. कोठेंही एखादी स्त्रीमूर्ति त्याला दिसली, कीं लगेच त्याच्या अतश्चक्षूंपुढें एका लहान मुलीचें मनोहर मुख उभें रहात असे. त्या मुखापुढें, तो पहात असलेला स्त्रीदेह अगदींच लपून जाऊन, त्याच्या हृदयांत ती एकच प्रतिमा एकरूपानें वास करूं लागे. पुष्कळ प्रयत्न करूनही सत्येन्द्र राधाराणीला विसरू शकला नाहीं! आपल्या बाल्यकालापासूनच तो स्त्री-

संबंधीं उदासीन होता. कधीही त्यानें आपल्या मातेखेरीज दुसऱ्या कोणत्याही स्त्रीसबधीं उत्सुकता किवा अगत्य प्रगट केले नव्हतें. परंतु आतां त्याची ती वृत्ति राहिली नाही! नदीच्या घांटावर, मार्गांत, कोठेंही त्याच्या दृष्टीस एखादी स्त्री पडली, की अगोदर ती किती वयाची असावी, हा विचार त्याच्या अत:करणांत उत्पन्न होत असे. त्याच्या अत करणात वास करीत असलेल्या मूर्तीशी ह्या स्त्रीच्या वयःपरिमाणाची तुलना होणे शक्य आहे, असे दिसताच तो तिचे स्वरूप निरीक्षण करण्याचा यत्न करी. ह्या प्रयत्नाचा उद्देशही, हे स्वरूप त्याने पाहिलेल्या राधाराणीच्या स्वरूपाशीं तुलना करावी, हाच होता की काय, ते आम्हाला सागता येत नाहीं. परतु पुष्कळ वेळां, मार्गातच तो एखाद्या तरुणीकडे आपली निर्लज्ज परंतु निष्पाप दृष्टि लावून पहात असलेला आढळे! पुष्कळ प्रयत्न करूनही त्याची ती दृष्टि त्याला मागे वळवितां येत नसे! पाहता पाहता एकाएकी आपल्या मूर्खपणाबद्दल त्यालाच लाज वाटूं लागे. आपण करीत असलेल्या हलकटपणाच्या वर्तनाबद्दल आजूबाजूचे लोक काय म्हणत असतील, असा विचार उत्पन्न होऊन त्याच्या शरीरावर थरारून रोमाच उभे रहात असत. लज्जारक्त मुखानें दृष्टि खाली करून तो द्रुतगतीने तेथून पाय काढीत असे!

सत्येन्द्राला पोहण्याचा विलक्षण नाद होता. चोरबागानातील त्याच्या घरापासून गगा फार लांब नव्हती. रोज अगदी प्रात काळी उठून तो जगन्नाथाच्या घाटावर जाऊन मनसोक्त स्नान करी. पोहण्याचे जवळजवळ व्यसनच त्याला जडले होते, असे म्हटलें तरी चालेल! श्रीमत लोकांच्या ह्या पोहण्याच्या नादाचा फायदा घेऊन त्यावर उपजीविका करणारे ब्राम्हण कलकत्त्यांत थोडेथोडके नाहींत! कोणीही गृहस्थ गंगास्नानाच्या हेतूनें आला, म्हणजे तो पाण्यातून बाहेर येईपर्यंत त्याचीं वस्त्रे सांभाळायचीं, हा त्याचा धंदा! काही धर्मभीरु यजमान किंवा यजमानिणी असल्या, तर स्नानानतर त्याना गध, फूल, अक्षता वगैरे पूजेचें साहित्य पुरवावे, हाही त्यांचा दुसरा पोटधंदा आहे! नुसत्या ह्या धद्यावरच रोजचे तीन चार रुपये मिळविणारे ब्राम्हण कलकत्त्यास किती तरी पहावयाला सांपडतात! जगन्नाथाच्या घाटावर रोज प्रातःकालपासून आसन मांडून बसलेला एक असाच ब्राम्हण होता! सत्येन्द्र हा त्याचा नेहमीचा यजमान ठरलेला होता! त्याला बक्षिस देण्याच्या बाबतींत सत्येन्द्र आपल्या स्वभावाप्रमाणें सढळ असल्या कारणानें, दुसऱ्या गिऱ्हाइकाला सोडून तो सत्येन्द्राचें काम अगोदर करीत असे!

आज पौर्णिमा ! त्यामुळे गंगेवर स्नान करण्याकरिता येणाऱ्या स्त्रीपुरुषांची विशेष गर्दी दिसत होती ! तिकडे लक्ष न देता सत्येन्द्र तातडीनें आपल्या नेह-मीच्या ब्राम्हणाच्या शोधार्थ इकडे तिकडे भटकत होता. गंगेचें पात्र दृष्टीस पड-तांच, केव्हा एकदा जाऊन आत उडी घेतो, असे त्याला झाले होते ! घाईघाईनें ब्राम्हणाला शोधीत असतां मार्गात लोकांच्या गर्दीमुळें त्याला अपली द्रुत गति थांबविणे भाग पडलें. पाहतो, तो त्याच्या आजूबाजूचे पाच सात लोक मोठ्या आग्रहपूर्वक एका विविक्षित दिशेकडे पाहात होते. त्याच्या दृष्टीमागे आपली दृष्टि फेकून, त्याचे एवढे लक्ष वेधण्याचे कारण काय ते पहावयाला जातो तोच तो आश्चर्याने स्तमित होऊन 'आ' वासून पाहात उभाच राहिला !

एकाच स्त्रीदेहात एवढे सौंदर्य एकवटलेले कोणी कधीही पाहिले नसेल ! वय फार नाही—सतरा अठरा वर्षांचे असेल ! अंगावर परिधान केलेलीं वस्त्रेंही अगदी साधी—एक स्वच्छ शुभ्रवर्ण तलम पातळ ! शरीरावर अलंकारही फारसे नव्हते ! त्याच्या परिचित ब्राह्मणाजवळून गंधाक्षता इत्यादि पूजेचे साहित्य घेऊन त्याच्याच समोर ठेवलेल्या गंगेच्या मूर्तीची ती पूजा करीत होती. ब्राह्मण-ही फार काळजीपूर्वक तिला सर्व साहित्य पुरवीत होता.

सत्येन्द्र ब्राह्मणाच्या जवळ जाऊन उभा राहिला ! त्याच्याकडे दृष्टि जातांच द्रव्याच्या लोभी ब्राह्मणाचे लक्ष त्या युवतीवरून सत्येन्द्राकडे वळलें ! हातांतील फुलें हातांतच राहू देऊन, सत्येन्द्राचे कपडे घेण्याकरिता तो हात पुढे करून उभा राहिला !

आपलें कार्य अर्धेच टाकून देऊन स्वतःकडे ब्राह्मणाचें लक्ष वेधून घेणारी ही व्यक्ति कोण, ते पाहण्याकरितां युवतीने आपले कुतूहलपूर्ण नेत्र सत्येन्द्राकडे वळविले ! उभयताची दृष्टादृष्ट झाली ! सत्येन्द्राला काय वाटले कोणाला ठाऊक ! त्याने मोठ्या गडबडीने आपली वस्त्रे ब्राह्मणाच्या अंगावर फेकली, व जाऊन गंगेत उडी मारली ! त्या दृष्टीपासून स्वतःचें रक्षण करण्याकरिता त्यानें असें केलें कीं काय कोणाला ठाऊक !

काय असेल ते त्याचे त्यालाच ठाऊक; परंतु आज सत्येन्द्राच्यानें फार वेळ पाण्यात राहवलें नाही ! रोज तो तास तास, दीड दीड तासपर्यंत पाण्यात डुंबत रहात असे. परंतु आज पाच मिनिटांच्या आतच तो बाहेर आला ! कपडे बद-लण्याकरितां ब्राह्मणाजवळ येऊन पहातो, तों ती तरुणी केव्हांच अदृश्य झाली होती !

त्या सबंध दिवसभर त्याच्या नेत्रासमोर तेंच जगन्नाथाच्या घाटावरचें दृश्य नाचत होतें! दुसरा विचारही आज त्याच्या अंतःकरणांत प्रवेश करूं शकला नाही. जेव्हां पहावें तेव्हां, तीच तीक्ष्ण दृष्टि त्याच्या हृदयाचा भेद काढीत आहे, असा त्याला भास होई! रात्रींही त्याला चांगलीशी झोप लागली नाहीं! त्या दृष्टीच्या जखमेने व्याकुळ होऊन तो कितीदा तरी स्वप्नसृष्टीतून जागा झाला! शेवटी सरासरी पांच वाजण्याचे सुमारास त्याने एकदाचें अंथरूण सोडले! प्रातर्विधि कसे तरी उरकून घेऊन, त्यानें आपलें धोतर आणि टॉवेल बगलेंत मारला, व द्रुत गतीनें जगन्नाथाच्या घाटाकडे जाण्यास निघाला.

घाटावर येऊन पाहतो, तों ती असामान्य रूपवती सुंदरी नुकतीच स्नान आटोपून घाटाच्या पायऱ्या चढत आहे. तातडीनें आपले स्नान आटोपून सत्येन्द्र आपलीं वस्त्रे घेण्याकरिता ब्राह्मणाजवळ येऊन पाहतो, तो कालप्रमाणें आजही ती मोठ्या भक्तिभावानें गंगेचे पूजन करण्यात गुंतली होती! पुन्हा उभयताची दृष्टि एक झाली! पुन्हा त्याच्या सर्वांगातून विद्युत्प्रवाह खेळू लागला!

कसे तरी आपले कपडे परिधान करून सत्येन्द्र प्राण वाचविण्याकरिता तेथून निसटला!

[ ३ ]

रमणी रोज प्रातःकाळीं स्नान करण्यास जगन्नाथाच्या घाटावर येते, ही गोष्ट सत्येन्द्राच्या चांगली ध्यानात आली होती. इतके दिवसपर्यंत तिच्याशीं भेट झाली नाही, ह्याचे कारण हेंच होतें की, आतां पावेतो तो बऱ्याच उशीरा स्नान करण्यास येत असे. त्यामुळे, तो येण्याच्या पूर्वीच ती रमणी परत निघूनसुद्धां जात असे. पौर्णिमेच्या दिवशी आपल्या सुदैवानेच लवकर येण्याची बुद्धि आपल्याला झाली, असे सत्येन्द्राला वाटल्याखेरीज राहिलें नाही!

आज सात दिवस झाले, दररोज जान्हवी तीरावर या दोघांची भेट होऊन दृष्टीस दृष्टि भिडत असे; परंतु आजपर्यंत कोणीही दुसऱ्याशीं एक शब्दही बोललें नव्हतें! आणि वास्तविक पाहिले असतां शब्दाचें प्रयोजन तरी काय होतें? कारण ज्या ठिकाणीं नुसत्या दृष्टींत साऱ्या भाषेचें सार एकवटलेले असते, त्या ठिकाणीं मुखांतून निघणारे शब्द मूक बनणारच! ही अपरिचित सुंदरी कोणीही कां असेना, एवढे मात्र खास, कीं तिला ही नेत्राची भाषा उत्तम प्रकारे अवगत असून त्या शास्त्रांत ती अगदीं पारंगत झाली होती, ही गोष्ट सत्येन्द्राच्या अंतःकरणालाही पटल्यावांचून राहिली नाहीं!

नेहमींप्रमाणें आजही स्नान आटोपून अन्यमनस्कभावानें तो घरीं परत जाण्या-करितां निघाला. मन भलतीकडेच भटकत असून शरीर मात्र कांहीं दूरपर्यंत गेलें. इतक्यांत मागून कोणी तरी मजुळ स्वरात उच्चारलेले शब्द त्याच्या कर्ण-रंध्रांत शिरले. सत्य दचकला! एवढा मधुर शब्दस्वर दुसऱ्या कोणाचा असू शक-णार? त्यानें मागे वळून पाहिले; तों--तों--तीच सुदरी रेलवेलाइनीच्या पलीकडून सत्येन्द्राला हाक मारीत आहे, "थोडें थाबावें!"

तिच्या कंबरेवर पाण्यानें भरलेली एक लहानशी कळशी असून, खांद्यावर ओल्या लुगड्यांचा पिळा होता! सत्येन्द्रानें तिच्याकडे पाहतांच तिनें खूण करून त्याला आपल्याजवळ येण्यास सुचविले. सत्येन्द्राच्या सर्वांगांतून पुन्हा विद्युत्-प्रवाह सुरू झाला! इकडे तिकडे दृष्टिपात करून, धडधडणाऱ्या उरानें तो तिच्या जवळ जाऊन उभा राहिला!

त्याच्या प्रश्नोत्सुक दृष्टीशी आपली दृष्टि भिडवून ती तरुणी पूर्ववत् मृदु कंठात म्हणाली, "माझी मोलकरीण आज माझ्याबरोबर आली नाहीं! मला माझ्या घरापर्यंत पोंचवून दिले तर फार उपकार होतील!"

खरेंच! रोज तिच्याबरोबर असणारी तिची वृद्ध मोलकरीण आज तिच्या बरोबर नदीकाठी दिसली नाही, ही गोष्ट आता सत्येन्द्रालाही आठवली. परंतु त्या तरुणीची विनति श्रवण करून त्याच्या अतःकरणात द्विधाभाव उत्पन्न झाला. अशा अपरिचित तरुण स्त्रीला बरोबर घेऊन आपण रस्त्यातून हिंडणे हे निरनि-राळ्या दृष्टीनें किती धोक्याचे आहे ते त्याला चागले कळत होते! उलटपक्षीं अशी कामगिरी शिरावर पडली असतांना तिचा अव्हेर करणे ही गोष्टही त्याला कशीशीच वाटू लागली! तिला "नाहीं" म्हणावयाचें कसे? काहीं वेळपर्यंत विचार करून मनाचा मोठा हिय्या करून त्यानें तिच्याबरोबर जायचे नाहीं असें ठर-विलें, व त्याप्रमाणें तिला तो कळविणारही होता! परंतु कांहीं केल्या असे कठोर शब्द त्याच्या मुखावाटे बाहेर निघत ना

त्याच्या अतःकरणाची ही स्थिति रमणीच्या तेव्हांच ध्यानांत येऊन तिनें थोडेंसें हास्य केलें! हें हास्य ज्या स्त्रीच्या मुखमंडलावर विलसू शकतें, तिला अप्राप्य असे या जगांत कांहीं नाहीं! एका क्षणांत सत्येन्द्राचा द्विधाभाव नष्ट होऊन त्याचा एक निश्चय कायम ठरला! "चलावें" असें म्हणून त्या क्षणींच तो तिच्यासहित मार्गक्रमण करूं लागला!

दोन चार पावलें पुढें जाऊन रमणी पुन्हां म्हणाली, “माझी मोलकरीण आजारी पडल्यामुळें तिला बरोबर येता आलें नाही! परतु गंगास्नान केल्या-खेरीज मलाही बरें वाटेना!–तेव्हां आज एकटेच येणे भाग पडले! माझ्या-प्रमाणे आपल्याला देखील हे व्यसन जडलेले दिसते!”

सत्य हळू हळू म्हणाला, “होय. मी बहुतेक रोजच गगास्नान करीत असतो!”

“आपले घर कोणत्या बाजूस आहे?”

“मी चोरबागानात रहात असतो!”

“अरे वा! मग माझ्या घरापासून आपले घर फारसे लाब नाही म्हणायचे! ह्या जवळच्या घाटापासून जो मोठा आडवा रस्ता जातो, तेथेंच माझे घर! त्या वळणापर्यंत मला पोचवून देऊन मग वाटल्यास आपण सरळ आपल्या घरीं निघून जावे!”

“होय, तसेंच करणे बरे!”

यानतर बराच वेळपर्यंत कोणी कांहींच बोललें नाही! बाहेरून शांत दिस-णाऱ्या सत्येन्द्राच्या हृदयात परस्परविरोधी मनोविकाराची कोण भयकर खळबळ चालली होती! चितपूर रोडवर आल्यानतर ती रमणी सत्येन्द्राकडे मुख वळवून उभी राहिली. पुन्हा एकवार तिचें तें भुवन-विजयी हास्य हसून ती म्हणाली, “माझें घर आता फार लाब नाही.—आता आपल्याला मी जास्त त्रास देऊ इच्छित नाहीं. मी आता एकटी घरी जाऊ शकेन; आपण आणखी श्रम घेण्याचें कारण नाहीं!”

“ठीक आहे.” असें म्हणून, सत्येन्द्र मुख वळवून आपल्या घराच्या दिशेनें चालू लागला.

त्या दिवशी संबंध दिवसभर सत्येन्द्राच्या हृदयात काय चाललें होतें, त्याचें वर्णन करणें अशक्य आहे. ही गोष्ट फक्त कल्पनेनेंच जाणतां येणे शक्य आहे;—आणि तेंसुद्धां, आपल्या यौवनकाली, पंचशराच्या पुष्पबाणाचा आघात ज्यांना सहन करावा लागला आहे, अशा भाग्यशाली लोकांनाच! काही विलक्षण उन्मा-दाच्या निशेंत मस्त असलेल्या जीवाला, जल–स्थल, आकाश–पाताल, दाही दिशा, सर्व एकाच विविक्षित रंगानें रंगविलेल्या दिसूं लागतात! चैतन्याच्या अगीं वास करीत असलेली सर्व चेतनाशक्ति हरपून जाऊन, त्याची अवस्था एका प्राण-हीन चुंबक-शलाकेप्रमाणे होते. जेव्हां पाहावें तेव्हा एका विविक्षित वस्तूकडे

धांव घेण्याकरिता तो उन्मुख असलेला दृष्टीस पडतो! त्या एका व्यक्तीला सोडून जगात दुसऱ्या कोणत्याही वस्तूचें अस्तित्व आहे असे त्याला वाटतच नाही!— परंतु, असे होणे म्हणजे काय, हें सर्वांनाच कळण्यासारखें नाहीं!

दुसऱ्या दिवशी प्रातःकाळीं सत्य शय्यात्याग करून उठला. पाहतो तों दिवस बराच वर आला असून चोहीकडे चांगलें ऊन पडलें होते! त्याबरोबर त्याच्या अंतःकरणात धस्स झाले! काहीं चमत्कारिक व्यथेच्या तरंगानें त्याच्या हृदय-समुद्रांत भयंकर खळबळ उडून गेली!—आजचा सबंध दिवस व्यर्थ गेला, अशी त्याची खात्री झाली! काय करावे, हे त्याला सुचेना! आज निजून उठावयाला आपल्याला एवढा उशीर कां लागला, याचें त्याला सखेदाश्चर्य वाटू लागलें! प्रियदर्शनाला आंचवल्यामुळे त्याच्या खेदयुक्त अंतःकरणांत नैराश्यजन्य क्रोधाचा उमाळा उत्पन्न होऊन, तो स्वतःवरच खूब संतापला! काही कामाकरिता त्याचा नोकर खोलीत आला, त्याच्याकडे दृष्टि जाताच सत्येन्द्र संतापानें त्याच्या अंगावर ओरडून म्हणाला, "हरामखोर, पाजी, गद्धा! आज एवढा उशीर होई तों पर्यंत तूं मला निजू कसे दिलेंस? रोजच्या वेळेवर उठविलें का नाहीस? तुझ्या मूर्खपणाबद्दल तुला एक रुपया दंड केला आहे, जा!"

नोकर बिचारा हतबुद्ध होऊन त्याच्याकडे टकमकां पाहतच राहिला! नरेन्द्रानें घाईत दुसरे कपडेसुद्धा घेतले नाहींत! दड् दड् दड् दड् जिना उतरून तो खालीं आला! रस्त्यावर समोरच एक भाड्याची व्हिक्टोरिआ उभी होती, तीमध्यें उडी मारून त्याने गाडीवाल्याला चितपूर रोडवरून जगन्नाथाच्या घाटाकडे जोरानें गाडी हाकण्यास फर्मावले!

गाडी चालली होती आणि सत्येन्द्र रस्त्याच्या दोन्ही बाजूंनीं सारखें पहात होता. गाडी जगन्नाथाच्या घाटाच्या जशी जशी अधिकाधिक जवळ येऊं लागली, तशी तशी त्याची उत्कंठा जास्तच वृद्धिंगत होऊं लागली. त्याला जें पाहिजे होते तें रस्त्यावर त्याला कोठेच दिसेना! शेवटी एकदांची गाडी थांबली! नरेन्द्रानें पटकन बाहेर उडी मारली, आणि आपली आतुर दृष्टि घाटावरील जनसमूहांतून कोणी तरी एक विवक्षित व्यक्ति हुडकून काढण्याकरितां तिकडे वळविली! एकाएकीं तें चिरवांछित मुख दृष्टीस पडताच, त्याचा समस्त क्षोभ एका क्षणात शांत झाला! त्याच्या नेत्रातील दारुण आशंका नष्ट होऊन, त्या ठिकाणीं आनंदाचें

सलिल हास्य विलसू लागलें ! रस्त्यावर हरपलेलें अमूल्य रत्न भाग्यवशात् पुन्हा सांपडले, असें त्याला वाटू लागले !

तो गाडींतून खालीं उतरतांच ती हास्यमुखानें त्याच्या जवळ आली, आणि अगदीं परिचिताप्रमाणें म्हणाली, "काय हे ! केवढा उशीर केला हा आपण ! बरें जा, लवकर स्नान आटोपून घ्या ! आजदेखील माझी मोलकरीण आलेली नाहीं. केव्हांची मी वाट पाहतें आहें आपली !"

"एक मिनिट थाबा, हा मी आलोंच पहा !" असें म्हणून सत्येंन्द्र द्रुत गतीनें नदीकडे चालता झाला ! आज पोहणेबिहिणे कुठचे ? कशातरी एक दोन बुचकळ्या मारून तो लगेच बाहेर आला. पाहतो, तो त्यानें आणलेली गाडी कोठेंच दिसेना, रमणी मात्र त्याच ठिकाणीं त्याची मार्गप्रतीक्षा करीत उभी होती !

सत्येन्द्र तिच्याजवळ येऊन म्हणाला, "गाडी कुठे गेली ?"

रमणी म्हणाली, "ती गेली निघून !"

"काय, निघून गेली ?" आश्चर्य वाटून सत्येन्द्रानें प्रश्न केला.

"भाडे घेतल्यावाचूनच तो कसा निघून गेला बुवा ?"

रमणी म्हणाली, "त्याला भाडे मिळालें."

जास्तच आश्चर्यचकित होऊन सत्येन्द्र म्हणाला, "कोणी दिले भाडे ?"

हसून त्याच्याकडे पहात रमणी म्हणाली, "मी दिलें !"

सत्येन्द्र स्तभित होऊन म्हणाला, "काय, तुम्ही ?"

रमणी पुन्हा पूर्ववत् हसून म्हणाली, "त्यात काय आहे एवढे आश्चर्य वाटण्यासारखे ? मी त्याचे पैसे चुकते केले, म्हणून काय बिघडलें ? बरे, पण मला वाटते आता आपण चालू लागावे हे चागले ? अगोदरच आज उशीर झाला आहे !" असें बोलून ती पुन्हा एकवार आपले ते भुवनमोहन हास्य हासून चालू लागली.

सत्येन्द्राची सारी बुद्धि नष्ट झाली असावी यात सशय नाही ! नाहीं तर तो कितीही अनभिज्ञ असला, तरी ह्या सर्व प्रकाराचा अर्थ काय, असा प्रश्न त्याच्या चित्तांत एकदा तरी उद्भवल्याखेरीज खास राहिला नसता !

मार्गानें चालता चालतां रमणीनें प्रश्न विचारला, "काल आपण आपलें घर चोरबागानांत आहे, असें सागितले होतें, नाहीं का ?"

सत्य म्हणाला, "हो."

"तेथें काय फक्त चोरच वास करीत असतात कीं काय ?"

आश्चर्यचकित होऊन सत्येन्द्र म्हणाला, " का बरें ? "

" मला वाटते आपण तर चोरांचे राजे आहांत ! " असे बोलून, किंचित् मस्तक वक्र करून सलील कटाक्षपाताने सत्येन्द्राचें हृदय विदारण करीत ती पुन्हा मराल-गतीने चालू लागली ! सत्येन्द्राच्या हृदयातील धाड् धाड् ध्वनि त्याला स्पष्टपणे ऐकूं येऊ लागला !

रमणीच्या कटिस्थलावर विराजमान झालेली कळशी आज नेहमींपेक्षा किंचित् जास्त मोठी होती. त्यातील गगाजलाचा ध्वनि होत होता-" छलात्-छल् ! छलात्-छल् ! " त्याचा अर्थ असा होता, की, " हे मुग्ध-अध युवका ! सावधान राहा ! ही सर्व छलना—तुझ्या नेत्रात फेकली जाणारी धूळ आहे ! साभाळ ! ! " असें बोलत बोलत कळशीतील पाणी, एकदा तिरस्काराने, एकदा व्यग दर्शविण्याच्या हेतूने आतल्या आत उसळू लागलें !

चितपूररोडचे ते वळण आले ! येथूनच सत्येन्द्राला तिचा निरोप घ्यावयाचा होता. अत्यत सकुचित होऊन अस्फुट स्वरात तो म्हणाला, " गाडीभाड्याचे पैसे.........!"

रमणो मागे परतून उभी रहात अस्फुट मृदुकठांत म्हणाली, " ते तर आपण दिलेच आहेत; आता त्याबद्दल पुन्हा प्रश्न कशाचा ? "

तिच्या शब्दातील गर्भित अर्थ न कळून सत्येन्द्र म्हणाला, " मी केव्हा दिले पैसे ? ते तर—"

त्याला मध्येच थाबवून रमणी म्हणाली, " माझ्याजवळ माझें असें आतां काय राहिले आहे ? मी माझे पैसे देणार कोठून ? माझ्या सर्वस्वाची चोरी करून, आपण केव्हाच त्याचा अपहार केला आहे,—आता 'माझ्या तुझ्याचा' प्रश्न कोठे उरला ?" असें म्हणून तिने आपले मुख सत्येन्द्राच्या दृष्टीस पडणार नाहीं असें वळविले ! आम्हाला असें वाटते की, ती आपले उच्छ्वसित हास्य महाप्रयासानें दाबण्याच्या प्रयत्नात असावी !

तिचा हा अभिनय सत्येन्द्राच्या दृष्टीस पडला नाहीं. म्हणूनच त्याच्यावर करण्यात आलेल्या चोरीच्या आरोपातील गोड इगित ध्यानात येऊन, एकदम त्याचा सर्व सशय दूर झाला ! तिच्या शब्दाची वीज त्याच्या हृदयावरील शकापटल जाळीत पोळीत त्याच्या हृदयप्रदेशांत खोल जाऊन बसली ! सारे विश्व समोर दिसणाऱ्या मोहक मूर्तीत साठविलेलें असून, त्यामुळें त्याला निराळाच मोहकपणा

प्राप्त झाला आहे असें त्याला वाटूं लागलें ! आपलें दैव कधी काळीं असें उघडेल असें त्याला स्वप्नातसुद्धा वाटलें नव्हतें !—

"प्रसन्न होतां कमलावरानें
देतां किती घेशिल दों करानें?"

ह्या कव्युक्तीप्रमाणे आज आपले नशीब कल्पनेच्या पलीकडे उदयाला आलें आहे, असें त्याला वाटूं लागलें ! फरक एवढाच की त्याच्या बाबतीत "कमलावर" प्रसन्न झाला नसून, प्रत्यक्ष "कमला" च प्रसन्न झाली होती ! आपल्यावर तिनें केलेल्या असीम उपकाराबद्दल, भर रस्त्यात तिच्या त्या रक्तवर्ण कोमल मृदुचरणांवर मस्तक नम्र करावे अशीही इच्छा क्षणभर त्याच्या हृदयात उदय पावली ! परतु दुसऱ्या क्षणींच, असीम लज्जेने त्याच्या हृदयावर ताबा जमविला ! मान वर उचलून आपल्या प्रियतमेकडे एकवार डोळे उघडून पाहण्याचे धैर्यसुद्धां त्याच्या अगीं उरले नाही ! कांही न बोलता, खाली मान घालून, तो हळूहळू चालता झाला !

वळणाच्या पलीकडे, काही अतरावर, हुकुमाप्रमाणे फूटपाथवर दासी उभी होतीच ! तरुणी येत असलेली पाहून ती पुढे आली, व आपल्या धनिणीकडे पाहून हंसत हसत म्हणाली, "बाईसाहेब, त्या गृहस्थाच्या नाकात वेसण घालून त्याला रस्तोरस्ती अशा नाचवीत का हिडता तुम्ही ? घरचा बरा आहे, की आहे आपला असाच भुकेबगाल ? काही प्राप्तीची आशा असल्यास बरे, नाही तर उगाच त्रास करून घेण्यांत काय अर्थ आहे ?"

रमणी हसून म्हणाली, "तो घरचा श्रीमत आहे किंवा नाहीं, तें कांही मला ठाऊक नाही ! परतु त्याच्या श्रीमंतीशी मला काय करायचे आहे ? अशा भोळसटाच्या नाकात वेसण घालून रस्तोरस्ती हिडविण्यात मला मोठी मौज वाटते ! निव्वळ करमणुकीपेक्षा ह्या बाबतीत माझा दुसरा काही उद्देश आहे, असें का तुला वाटते ?"

दासीचें हास्य तिच्या पोटात मावेना ! हास्याचा भर ओसरल्यानंतर कांहीं वेळाने ती म्हणाली, "बाई, बाई, बाई ! तुमची देखील अगदी कमालच आहे म्हणायची ! करमणुकीचा हा प्रकार अगदीं नवीन वाटतो मला ! पण ते मेलं एक असो; बाकी माणूस दिसायला कसा राजबिंडा आहे अगदी ! त्याचे डोळे, नाक, कान, सारे कसे अगदी रेंखीव ! वर्ण तरी किती सुरेख आहे ! मला वाटते, तो

खात्रीनें कोणा तरी उच्च कुलांतला असावा ! तुम्हा उभयतांची जोडी कशी पण शोभत होती ! तुम्ही उभयतां बोलत उभीं असतांना मी पहात होते–जणू काय एका फांदीवर फुललेली दोन गुलाबाची फुलेच !"

पुन्हा किंचित् हसून रमणी म्हणाली, "बरें, चल आतां ! तुझ्या तो इतका मनात भरला असेल, तर थोड्याच दिवसांत मी तुला बक्षीस म्हणून देऊन टाकीन तो ! चल !"

दासीदेखील सहजासहजी हार जाणारी नव्हती ! रमणीच्या भाषणाला हसत हंसत उत्तर देत ती म्हणाली, "नाही. बाईसाहेब, एक वेळ अशी वस्तु प्राप्त झाली असताना, जिवात जीव असे तोपर्यंत, दुसऱ्याला देणे तर दूरच राहू द्या, परंतु स्वत च्या दृष्टीआड देखील होऊ देणे अशक्य होईल, हें सागून ठेवते !"

[ ४ ]

ज्ञानी पुरुषाचे असें वचन आहे कीं, असभवनीय गोष्टी प्रत्यक्ष पाहूनसुद्धा दुसऱ्याला सागू नयेत. कारण जे अज्ञानी आहेत, त्याचा त्यावर विश्वास बसणे शक्य नाही ! कोणाला विश्वास वाटो किंवा अविश्वास वाटो, एवढी गोष्ट मात्र खरी, की त्या दिवशी सत्य घरीं परत येऊन टेनिसन्च्या " डॉन जॉन " नामक काव्याचे भाषांतर करण्याकरिता बसला ! सत्येन्द्राचे एवढे वय झालेलें ! एम् ए. च्या वर्गात शिक्षण घेत असलेला ज्ञानविदग्ध पुरुष तो; परतु त्याच्या अत.करणात एकदाही असा प्रश्न उपस्थित झाला नाही की, भररस्त्यांत, दिवसाचा उज्ज्वल प्रकाश शात जगाच्या दृष्टीपासून अलिप्त नसताना, घडलेल्या प्रेमप्रदानाच्या ह्या अद्भुत प्रसगात काही सत्याचा लवलेश असणे शक्य आहे किंवा नाही ! अशा प्रकारे वाहणाऱ्या प्रेमप्रवाहांत अगदीं निःशंक चित्तानें वाहून जाणें निरापद आहे किंवा काय, ह्याबद्दल एक क्षणभरसुद्धां विचार करण्याची त्याला आवश्यकता वाटली नाही ! आपली प्रेमसृष्टिसुद्धा सत्यच आहे असें सत्य समजत होता !

दोन दिवस झाले. तिसऱ्या दिवशी सकाळीं रोजच्याप्रमाणें स्नान आटोपून परत येत असता, अपरिचित रमणी सत्येन्द्राला म्हणाली, "काल रात्री मी नाटक पाहण्याकरितां गेलें होते ! सरलेनें अनुभविलेले कष्ट पाहून हृदय अगदी फाटून जाते–नाहीं ?"

सत्येन्द्रानें " सरला " नाटक पाहिलें किंवा वाचलें नव्हतें; परंतु ज्या मूळ कादंबरीवरून ते नाटक लिहिलें आहे, ती " स्वर्णलता " नामक कादबरी त्यानें

वाचली होती! तो हळू हळू म्हणाला, " होय. फारच दुःखांत तिचा बिचारीचा शेवट झाला !"

रमणी एक दीर्घ निश्वास टाकून नाटकासंबंधीं चर्चा पुढें चालवीत म्हणाली, "आ! फारच भयानक कष्ट सोसावे लागले तिला! बरे, सरलेचेंच आपल्या पतीवर एवढें जिवापाड प्रेम कां होतें, आणि तिच्या वडील जावेचें आपल्या पतीवर तसें प्रेम कां नव्हतें? उभयतांमधील ह्या भेदाचें कारण काय असावें असें तुम्हाला वाटतें?"

सत्येन्द्रानें संक्षिप्त उत्तर दिलें, "एकेकीचा स्वभाव तो!"

रमणी म्हणाली, " स्वभाव हेंच त्याचें खरें कारण असावें, असें मलाही वाटते! तसे पाहिले, तर बहुतेक सारींच माणसें विवाह करतात. परंतु प्रेम मुळाशीं असून झालेले विवाह कितीसे असतील बरें? एवढेंच नाहीं, तर विवाह झाल्यानतर सुद्धां एकमेकावर सारख्या प्रमाणात प्रेम करणारीं जोडपीं कितीशीं सांपडतील? फारच थोडीं! कित्येक माणसें तर अशीं असतात, कीं आयुष्य सपेपर्यंत सुद्धा, प्रेम म्हणजे काय ह्या गोष्टोची त्याना ओळख नसते! तें ओळखण्याची क्षमताच त्याच्या हृदयांच्या ठिकाणीं वसत नाहीं! आपण पाहत नाहीं का? समाजात असे किती तरी लोक आहेत, ज्यांना गाण्याबिण्याचा मुळीसुद्धा नाद नसतो! अशांच्या पुढें प्रत्यक्ष गंधर्व-किन्नर येऊन जरी आलाप काढू लागले, तरी ह्याच्या मस्तकात तिडिक उठायची! तो औरगझेब बादशहा असाच होता म्हणतात! गाण्याचा त्याला अगदीं मनापासून तिटकारा! तशीच दुसरी काहीं माणसें असतात; त्याना म्हणे कधीं रागच येत नाहीं! लोक अशा माणसांची फार स्तुति करतात; पण मला नाही बाई असला स्वभाव आवडत! स्तुति करण्याऐवजीं मला त्यांची निंदाच करावीशी वाटते!"

किंचित हंसून सत्येन्द्र म्हणाला, "कां बरें?"

रमणीनें उद्दीपित स्वरांत उत्तर दिलें, " कारण असे लोक हृदयाचे दरिद्री असतात म्हणून! क्रोध येण्याची क्षमता सुद्धां मनुष्याच्या अगीं असावयाला पाहिजेच! अक्षमतेच्या अगीं काहीं गुण असतील हें मला मान्य आहे; परंतु त्या गुणांपेक्षां दोषच जास्त असतात असे मला वाटते. उदाहरणार्थ, हाच सरलेचा वडील दीर पहा! त्याच्या स्त्रीच्या हस्तें एवढा अत्याचार घडूनसुद्धां, त्याला तिचा मुळींच राग आला नाहीं."

सत्येन्द्रानें कांहींच उत्तर दिलें नाहीं।

रमणी पुन्हां म्हणाली, " आणि त्याची पत्नी ती–प्रमदा कीं काय तिचें नांव? ती तरी काय भयंकर बाई! स्त्री असूनही असा कठोर स्वभाव असणे शक्य असतें असें मला वाटलें नव्हतें. मी तेथें असतें, तर त्या मेल्या राक्षसीणीचा गळा दाबून तिचा जीवच घेतला असता! "

सत्येन्द्र हंसून म्हणाला, " अगदींच असंभवनीय! प्रमदा म्हणून सत्यसृष्टींत कोणी स्त्री होती, असें का वाटतें तुम्हाला? ती म्हणजे नुसती कविकल्पना—"

त्याला मध्येंच थांबवून जास्तच उत्तेजित होऊन तो म्हणाली, " कवीनें तरी अशी कल्पना काय म्हणून करावी? सर्व सांगतात, कीं प्रत्येक व्यक्तीच्या अंतःकरणांत आत्म्याच्या स्वरूपांत परमेश्वर वास करीत असतो म्हणून! परंतु प्रमदेचें चरित्र पाहून तर असें मुळींच वाटत नाहीं! तिच्या अतःकरणात परमेश्वराच्या ऐवजीं सैतानाचाच वास असावा, असेंच वाटतें! खरें पाहिलें असतां, मनुष्याच्या अतःकरणांत एकमेकांबद्दल प्रेमभाव उत्पन्न करून, लोक साऱ्या मानवजातीवर प्रेम करण्यास शिकतील, असें शिक्षण लेखकानें आपल्या पुस्तकांतून लोकांना द्यायला हवें! परंतु ह्या बाबतींत पहावें, तों एका माणसाचें दुसऱ्यावर प्रेम जडण्याऐवजीं, त्याबद्दल तीव्र तिरस्कार मात्र वाटूं लागतो! प्रमदेच्या चरित्राकडे पाहून कोणाच्या मनांत तिच्याबद्दल प्रेम किंवा करुणा उत्पन्न होईल? कोणाला वाटेल, तिच्या हृदयात परमेश्वराचें अधिष्ठान आहे असें?"

हें भाषण ऐकून सत्येन्द्राला बरेंच आश्चर्य वाटलें! तिच्या मुखाकडे पाहून तो म्हणाला, "तुम्ही पुष्कळ पुस्तकें वाचलीं आहेत वाटते?"

रमणी म्हणाली, "मला इंग्रजी येत नाहीं. बंगालींतून जेवढीं पुस्तकें प्रसिद्ध होतात, तीं सारीं मी वाचीत असतें! चांगलें पुस्तक असलें, तर त्या नादांत मला कशाचेही भान राहत नाहीं! हें एक वेडच जडलें आहे मला, असें म्हणायला कांही हरकत नाही! पण हें पहा—चितपूर रोड संपलाच! येथून माझें घर अगदीच जवळ आहे! चला ना माझ्या घरीं एकदां! मजजवळ असलेलीं सारी पुस्तकें मी दाखवितें आपल्याला!

सत्य दचकून म्हणाला, "तुमच्या घरीं?"

"होय. माझ्या घरी! चला, तुम्हाला आलेंच पाहिजे!"

एकाएकीं सत्येन्द्राचे मुख पांढरे फटफटीत झालें! तो भीतिग्रस्त स्वरानें म्हणाला, "नको, नको! भलतेंच—"

"भलतेंचबिलतेंच कांहीं नाहीं! आज मी कांहींसुद्धां ऐकणार नाहीं—आपण आलेंच पाहिजे!"

"नको, आज नको—मग येईन केव्हां तरी." असे बोलून सत्येन्द्रानें कंपित गतीनें प्रस्थान केलें! आपल्या अपरिचित प्रेमिकेचें वाङ्मयासंबंधीं उच्च ज्ञान पाहून तिच्याबद्दलच्या अभिमानयुक्त श्रद्धेनें त्याचें हृदय अवनत झालें!

* * * *

आज सकाळच्या प्रहरीं सत्येन्द्र एकटाच स्नान आटोपून, मंद मंद पावलें टाकीत घराकडे चालला होता! त्याचें मुख अगदींच म्लान दिसत असून, त्याची अवनत दृष्टि अत्यत कातर—अश्रुसिक्त दिसत होती! अजूनसुद्धां त्याच्या नेत्राच्या पापण्या भिजलेल्या होत्या! आज चार दिवस झाले, त्याच्या त्या अपरिचित प्रियतमेचें त्याला दर्शनसुद्धा झालें नव्हतें! या चार दिवसांत एकदासुद्धा ती गगास्नानाला आली नव्हती!

हे चार दिवस त्यानें कसे घालविले असतील, तें त्याचें त्यालाच ठाऊक! किती तरी निरनिराळ्या स्वरूपाचे विचार त्याच्या अत करणात धुडगूस घालीत होते! "मन चिंती, तें वैरी चिंती ना!" ही म्हण प्रेमी हृदयाच्या बाबतींत अगदीं अक्षरशः सत्य आहे! ती आजारी तर नसेल ना? तिच्यावर कांहीं सकट तर आले नसेल ना? कोणत्या तरी अपघातात तर ती सापडली नसेल ना? एक ना दोन, अशा शेकडो दुश्चिन्ता त्याला भेडसावूं लागल्या! ह्या चार दिवसात झोप कशी असते, तें त्याला ठाऊक नाही! रात्रंदिवस जिवाला एकच तळमळ—एकच ध्यास लागलेला होता!

दुर्दैवाने त्याला तिचें नांवसुद्धां ठाऊक नव्हतें! ती राहत असे, त्या रस्त्याच्या नावाखेरीज त्याला तिचा दुसरा कोणताही पत्ता माहित नव्हता अशा स्थितींत तिचा शोध लावायचा तरी कसा? तिच्यासबधीं माहिती मिळवायची तरी कोणत्या उपायानें? त्याच्या हृदयाची तळमळ कांहीं केल्या शांत होईना! शोकामुळे आणि आत्मग्लानीमुळें त्याचे हृदय दग्ध होत आहे, असें त्याला वाटे! का बरें तो त्या दिवशीं तिच्या घरीं गेला नाहीं? एकदां घर पाहून आल्यानतर मग कोणताच प्रश्न उरला नसता! तिच्या आग्रहपूर्ण निमंत्रणाचा स्वीकार न केल्याबद्दल त्याला अत्यंत पश्चात्ताप वाटू लागला!

सत्येन्द्राचें खरोखरच प्रेम जडलें होतें! हा नुसत्या सौंदर्य-दर्शनामुळें उत्पन्न झालेला क्षणिक मोह नसून, ती हृदयाची गंभीर पिपासा होती! छलना किंवा कापट्य ह्यांची कल्पनासुद्धां त्याला कधी शिवली नाहीं. त्याच्या अतःकरणांत एकच भावना वसत होती; ती म्हणजे—खरोखरच निःस्वार्थ, अक्षरशः पवित्र, संपूर्ण हृदय-व्यापी प्रेम!

" बाबूसाहेब! "

हे शब्द कानी येताच सत्येन्द्र आपल्या उदास विचाराच्या तंद्रींतून दचकून जागा झाला! हाक ऐकूं आली, त्या दिशेकडे वळून पाहतो, तो तिच्याबरोबर नेहमी येणारी दासी, मार्गाच्या एका बाजूस त्याची मार्ग-प्रतीक्षा करीत उभी होती.

तिला पाहताच सत्येन्द्राच्या हातात जणूं काय प्रत्यक्ष स्वर्गच आला! आपल्या प्रेमास्पदाबद्दल आता कांहीं तरी वर्तमान कळणार ह्या जाणिवेनें उत्सुक होऊन, तो मोठ्या लगबगीने तिच्याजवळ गेला, आणि उत्कंठापूर्ण स्वराने म्हणाला, " ती—ती कुठे आहे?" त्याच्याने जास्त धीर धरवला नाही! हृदयातील दारुण आवेग असह्य होऊन त्याच्या नेत्रातून अश्रुप्रवाह वाहू लागला.

पण हे पाहून दासीला फार हंसू आले. त्याच्या दृष्टीस आपले हास्य दिसूं नये, याकरिता तिनें खाली मान घालून कृत्रिम दुःखपूर्ण स्वरात म्हटलें, " बाई-साहेबाची तब्येत फार बिघडली असून त्यानीं आपला सारखा ध्यास घेतला आहे!"

" चल!" असें म्हणून त्याच क्षणीं नेत्र पुसून सत्येंद्र तिच्या मागोमाग चालूं लागला! चालतां चालतां त्यानें गद्गद स्वरांत प्रश्न केला, " आजार कोणता आहे? प्रकृति फारच वाईट झाली आहे का?"

दासीनें उत्तर दिले, " नाहीं, तसे कांहीं नाहीं! पण ताप मात्र बराच आहे अंगांत!"

यानंतर सत्येन्द्र काहींच बोलला नाही. तो मुकाट्यानें खालीं मान घालून त्या म्हाताऱ्या दासीच्या पाठोपाठ चालला होता! तिच्या प्रकृतीस लवकर आराम वाटावा, ह्याकरिता त्याने मनातल्या मनांत परमेश्वराजवळ किती प्रार्थना केली, किती नवस केले!

एकदाचें घर आलें! सत्येन्द्रानें पाहिलें, तों समोर एक खूब मोठा वाडा होता. देवडीवर एक परदेशी द्वारपाल बसला होता. मनात कांहीं शंका उत्पन्न होऊन,

आंत पाऊल ठेवण्यापूर्वी सत्येन्द्रानें दासीला थांबवून प्रश्न केला, " मी आंत आलों, तर तुझ्या मालकिणीच्या वडिलांना राग तर येणार नाही ना! त्यांची माझी मुळींच ओळख नाही, म्हणून विचारतो!"

दासी म्हणाली, "त्याबद्दल तुम्ही निश्चिंत असा अगदी! आमच्या ताईसाहेबांना वडील नाहींत! त्याना फक्त आई आहे; त्याना ह्या प्रकाराबद्दल सर्व माहिती असून, ताईसाहेबांप्रमाणे त्यांचेही तुम्हावर फार प्रेम आहे! तेव्हां ह्या बाबतींत तुम्ही कांहींच आशका बाळगायला नको!"

एक अक्षरसुद्धा मुखावाटे न काढतां सत्येन्द्र मुकाट्यानें आंत शिरला!

एकामागून एक किती तरी खोल्या पार करीत, जिने चढून सत्येन्द्र तिसऱ्या मजल्यावर येऊन दाखल झाला. घरांतील सर्व सामानसुमान श्रीमती थाटाचे असून, एकंदर व्यवस्था पाहता, वाड्याचा मालक जसा श्रीमत तसाच सुशिक्षित आणि रसिक असावा, असे दिसत होते. तिसऱ्या मजल्यावर एकदर तीन खोल्या होत्या. पैकी एकीत सत्येन्द्र सध्या उभा असून, त्याच्या समोरच एक मोठा हॉल होता. ह्या मजल्यावरील प्रत्येक खोली–त्यांतल्या त्यांत तो हॉल फारच सजविलेला दिसत होता. हॉलच्या दारावर पडदा ओढला असल्याकारणाने, आत कोण काय करीत आहे, ते त्याला दिसत नव्हतें. तरी पण आतून ऐकू येणाऱ्या उच्च हास्यध्वनीवरून कल्पना केली असता, आत तीन चार माणसें तरी असावीं असें सहज अनुमान करता येण्याजोगे होते! सत्येन्द्र जिना चढून वर प्रवेश करतो न करतो इतक्यांत त्याच्या कानावर तबल्याचा आणि चाळाचा मंजुल ध्वनि येऊन आदळला. त्याला ह्याचे फार आश्चर्य वाटले, तरी तो त्या दासीमागून चाललाच होता! दासीनें पडद्याकडे बोट दाखवून सत्येन्द्राला म्हटले, " या खोलीत चला!" तो दाराशी येताच, एका हातानें पडदा उचलून धरीत ती उच्च कठात म्हणाली, " ताईसाहेब, हा सांभाळा आपला प्रियकर!"

तीव्र हास्याचा एकच कोलाहलध्वनि झाला! आंत जें दृश्य सत्येन्द्राच्या दृष्टीस पडले, ते पाहून त्याच्या हृदयावर जबरदस्त आघात झाला! आपण मूर्च्छित होऊन खालीं पडतो कीं काय, असें वाटून त्यानें दाराचा आश्रय घेतला! एका क्षणांतच डोळ्यांसमोर घेरी येऊन तो तेथेंच एका कोचावर मटकन बसला!

आंत सबंध हॉल फार उची सामानानें उत्तम रीतीनें शृंगारला होता! जागजागीं खुर्च्या, कोच वगैरे सामान व्यवस्थितपणें मांडलें असून, हालच्या मध्य-

भागीं एक मोठी उच गादी टाकलेली असून, तीवर तक्क्याशीं पाठ टेकून, पोषाख अंगावर घातलेले तीन इसम बसले होते. एकाच्या हातात एक बाजाची पेटी असून, दुसऱ्या इसमासमोर तबला पडलेला होता! तिसरा इसम या दोघांपासून काहींशा अंतरावर बसला असून एकचित्तानें यथेच्छ सुरापान करीत होता! चाल-लेल्या प्रकाराकडे त्याचे तिळमात्रसुद्धा लक्ष असलेलें दिसत नव्हतें! आणि ती? ती बहुतेक नुकतीच काहीं वेळापूर्वी नृत्य करीत असावी, असे दिसत होते! तिच्या पायात चाळ बांधलेले असून, सर्वांगावर उत्तमोत्तम दागिने घातलेले होते! तिच्या नेत्राकडे पाहताच, त्यात मदिरेचा प्रभाव स्पष्टपणे दृग्गोचर होत होता!

सत्येन्द्राला एकदम खालीं बसताना पाहून ती त्वरित गतीनें त्याच्याजवळ आली, आणि त्याचा एक हात आपल्या हातात घेऊन, उच्च हास्य करीत म्हणाली, "आमच्या दोस्ताला कांही फिट्ट वगैरेचा आजार आहे वाटते! नको गडे, आता ही असली सोंगें पुरे झालीं! उठा. मला बाई असल्या गोष्टींचे भारी भय वाटते!"

चेतनारहित झाडावर वीज पडली, म्हणजे तें झाडसुद्धां कंपित होते, तद्वतच तिचा करस्पर्श होताच सत्येन्द्राच्या सर्व शरीरातून विद्युत्प्रवाहाचा धक्का बसून, ते कापू लागलें!

दारूच्या धुंदींत असल्यामुळें तिची शुद्धि कांहीशी नष्ट झाल्यासारखी झाली होती. ती सत्येन्द्राला म्हणाली, "तुम्हाला माझें नाव ठाऊक आहे का? मन्ना बिजली म्हणतात!—आणि तुमचे नाव काय?—सांगा—सांगा ना गडे!"

खोलींतील सर्व मंडळी मोठ्यानें 'खो खो' करून हसू लागली! दासीची तर हंसतां हसता अगदीं मुरकुंडी वळली! हंसतां हसतां ती म्हणाली, "हिः हिः हिः! ताई......ताईसाहेबाची तर अगदीं कमाल.........हिः हिः हिः!"

कृत्रिम रागानें तिच्याकडे वळून बिजली रोषयुक्त स्वरात म्हणाली, "उगाच हसू नकोस अशी! चहाटळ कुठची!" नंतर पुन्हा सत्येन्द्राकडे वळून त्याचा हात ओढीत म्हणाली, "हं. उठा, चला गडे! येथें बसू नका असे!" असें म्हणून तिने त्याला जबरदस्तीने उठवून दुसऱ्या एका लहान गादीवर तक्क्याशीं नेऊन बसविलें, व स्वतः त्याच्यासमोर दोन्ही गुडघे टेकून हात जोडून गायन करूं लागलीः—

(गझल)

मुद्दतोंसे सोनेवाली अब ये किस्मत खुल गई ।
दिलको दिलवर मिलगया, अब फुरकते शब मिट गई ॥
सूरते मेहेताब देखा–इत्तेफाकन् हंस उठा ।
सब गिला जाता रहा, अब हसरतें भी मिट गई ॥
दोनो जानिबसे इशारे हो चुके–बस् हो चुका ।
हो मुबारक इन्शा अल्ला, दिलजमाई हो गई ॥
दिल तड़फता था कभी का फुरकते दीदार में।
अबतलक थी कमनसीबी–खुशनसीबी हो गई ॥

गायन संपलें ! इतक्यांत, जो इसम दारूचे पेल्यावर पेले रिकामे करीत बसला होता, त्याला मदिरेच्या धुंदींत, एकाएकीं साधुभक्तीची लहर आली ! सत्येन्द्राच्या दुर्दैवानें आज स्नान झाल्यानतर जगन्नाथाच्या घांटावरील त्या ब्राह्मणानें, त्याच्या कपाळावर चदनाचा एक भला मोठा त्रिपुड्र लावून दिला होता ! त्यावरून, सत्येन्द्र हा कोणी तरी मोठा साधु पुरुष आहे, अशी त्या दारुड्याची कल्पना झाली ! गादीवरून उठून झोकांड्या खात खात येऊन, त्यानें सत्येन्द्रासमोर साष्टांग नमस्कार घातला, व म्हणाला, “ साधुमहाराज, मी फार मोठा पातकी आहे; मला क्षमा करावी !–थोडे चरणरज......! ”

पेटी वाजवीत असलेला गृहस्थ अजूनपर्यंत बराच शुद्धीवर होता. दारुड्याची ही लीला अवलोकन करून त्याच्या अत करणात सत्येन्द्राबद्दल सहानुभूति उत्पन्न झाली. त्याच्या वतीनें दारूबाजाजवळ रदबदली करीत तो म्हणाला, “ चल, ऊठ तेथून ! कां उगाच त्या बिचाऱ्याला मारून मुटकून साधू बनवीत आहेस ?”

त्याचा प्रतिवाद करून, हंसत हंसत बिजली म्हणाली, “ वाः ! मारून मुटकून कसें ? तो खरोखरच साधुपुरुष आहे ! आणि म्हणूनच, भर दिवसां, त्याला घरीं आणून तुम्हा सर्वांना ही गम्मत दाखवीत आहें ! तुम्हाला माझें बोलणें खोटें आहे असें वाटत असेल, तर तुम्ही त्यालाच विचारा हवें तर ! नाही तर नको, मीच विचारतें, म्हणजे बरें पडेल ! ” असें बोलून ती पुन्हा सत्येन्द्राकडे वळून म्हणाली, “ बरें, आतां तुम्हीच सांगा पाहू, तुमची माझ्याबद्दल काय कल्पना झाली होती तें ? मी नित्य गंगास्नान करण्याकरितां येत असें, तेव्हां मी ब्राह्मही नाहीं किंवा ख्रिस्ती, मुसलमान वगैरेही नाही, ह्याबद्दल तर तुमची खात्रीच झाली

असली पाहिजे! बरें, रोज गंगास्नान करणाऱ्या जुन्या चालीच्या हिंदू कुटुंबांत एवढी मोठी तरुणी एक तर सधवा तरी असली पाहिजे, किंवा विधवा तरी असली पाहिजे! हें सर्व समजत असूनही तुम्ही माझ्यावर प्रेम करावयास सुरुवात केलीत, त्यांत तुमचा उद्देश काय होता? माझ्याशीं लग्न लावायचें होतें, कीं पळवून न्यावयाची इच्छा होती? काय तें सांगा ना–सांगा ना —?"

पुन्हां उच्च हास्यध्वनि होऊं लागला. तो भर ओसरल्यानतर पुन्हां सत्येन्द्रावर नाना प्रकारच्या प्रश्नांचा भडिमार सुरू झाला. परतु सत्येन्द्रानें मानही वर केली नाहीं, किंवा त्यापैकीं एका प्रश्नाचे उत्तरही दिलें नाही! एकाद्या पाषाण मूर्तीप्रमाणें निश्चल होऊन तो बसला होता! त्याच्या अतःकरणांत काय चाललें होतें त्याचें वर्णन करून सांगावयाचें तरी कसें? आणि सागितलें, तरी तें समजणार कोणाला?

इतक्यात अकस्मात् कांही आठवण होऊन बिजली उठून उभी राहिली, व दासीला उद्देशून म्हणाली, "मला अगदींच विसर कसा पडला, ह्याचे आश्चर्य वाटतें! जा, श्यामा, लवकर जा आणि यांच्याकरितां फराळाचें घेऊन ये लवकर —स्नान आटोपून सरळ इकडेच आलेले आहेत; तेव्हां प्रातरुपहार अजून व्हायचाच असेल! थट्टामस्करीत निष्कारण वेळ घालवून मी उगाच उशीर लावला! जा, लवकर आण जा!" बोलता बोलता तिचा थट्टेचा स्वर बदलून जाऊन त्या ठिकाणीं अकृत्रिम स्नेहयुक्त आणि अनुतप्त कठस्वर श्रवणी येऊं लागला!

थोड्याच वेळांत एका ताटांत निरनिराळ्या प्रकारचे फराळाचे जिन्नस घालून दासीने ते ताट सत्येन्द्राच्या समोर आणून ठेवलें! सत्येन्द्र मान वर उचलीत नाहीं, असे पाहून बिजलीनें पुन्हां त्याचा हात आपल्या हातात घेतला व म्हणाली, "हे काय? असे स्तब्ध कां? सुरवात करा."

आपली सर्व शक्ति एकत्रित करून सत्येन्द्र आपलें चित्त स्थिर ठेवण्याचा प्रयत्न करीत होता! आपलें प्रेताप्रमाणें फटफटीत दिसणारें मुख वर उचलून, तो शांतपणें, पण अत्यंत शुष्क स्वरांत म्हणाला, "मी फराळ करणार नाहीं!"

"कां बरें? धर्म बाटेल अशी का भिती वाटते आपल्याला? मी महार आहे कीं चाभार?" बिजलीनें विचारलें.

"तुम्ही महार किंवा चांभार असतां, तर एक वार मी तुमच्या घरीं खाल्लें सुद्धां असतें. परंतु तुम्ही ज्या......!"

हे तीव्र शब्द ऐकून बिजली हंसूं लागली. हंसत हंसत ती म्हणाली, " भाषेचे पांचपेंच माझ्या भोळ्या शकरालाही कळतात एकूण, अ ? " असें बोलून ती पुन्हां हसू लागली ! परंतु या वेळीं तिच्याबरोबर दुसरे कोणीही हंसलें नाहीं; याचें कारण हेंच कीं, तिच्या स्वत च्या हसण्यांत काही जीव नव्हता. हंसण्याचा नुसता शब्दमात्र होत असून, त्या हंसण्यापासून हसणाऱ्याचें अतःकरण दुसरीकडेच कोठें तरी फार निराळ्या वातावरणांत हेलकावे खात होते !

सत्येन्द्र दृढतापूर्वक म्हणाला, " माझें नांव सत्येन्द्र आहे–भोळा शंकर नाहीं. भाषेतील खांचाखोचासंबधी मला कांहींच समजत नाहीं ! स्वत ची चूक झाली असली, तर ती सुधारण्याचे शिक्षण मात्र मला चागले मिळालें आहे !"

यावर बिजली काहीं तरी बोलणार होती; परंतु कोणाला ठाऊक कोणता विचार मनात येऊन तिनें आपले बोलणे आतल्या आतच दाबले ! काहीं वेळानंतर ती पुन्हां सत्येन्द्राकडे वळून म्हणाली, " मी स्पर्श केलेला पदार्थ तुम्ही खाणार नाहीं ? "

सत्येन्द्र निश्चयानें म्हणाला, " नाहीं ! "

बिजली उठून उभी राहिली. तिच्या स्वरांत ह्या वेळीं एक विलक्षण तीव्रता ऐकू येत होती. प्रत्येक शब्दावर जोर देत ती म्हणाली, " खावेंच लागेल ! माझी पूर्ण खात्री आहे, कीं आज नाहीं उद्यां, परवा–आणखी चार दिवसानीं तुम्हाला आपला शब्द मागें घ्यावाच लागेल ! "

तितक्याच दृढनिश्चयानें सत्येन्द्र म्हणाला, " हा आपला भ्रम आहे ! चूक ही प्रत्येक मनुष्याकडून होतच असते ! माझ्या हातून घडलेली चूक केवढया भयानक स्वरूपाची होती, हे प्रत्येकाला कळलें आहे–मलाही ते आता चागलें कळले आहे ! परंतु माझ्याबद्दल आपलीही चूक होत आहे, असे मी पुन्हा बजावून सागतों. आज नाही, उद्या नाहीं, आठ दिवसांनीं नाही, ह्या जन्मात नाही–पुढील जन्मांतही तुमच्या स्पर्शानें दूषित झालेले अन्न मी केव्हांही खाणार नाही !–ठीक आहे. आतां मला परवानगी द्यावी, मी जातों !–येथील वातावरणांत माझें रक्त सुकून जीव कासावीस होऊ लागला आहे ! "

त्याच्या मुखावरील तिरस्काराची छाया एवढी भीषण व स्पष्ट होती कीं, दारुड्याच्या ती दृष्टीस पडून, तो सुद्धां मनांत चरकला ! मस्तक हालवून बिजलीकडे वळून तो म्हणाला, " बिजली बिबि, ' अरसिकेषु रसस्य निवेदनम् । ' जाऊं

द्या ! काय अर्थ आहे त्यांत ? जाऊं दे—जाऊं दे त्याला ! सकाळच्या मजेदार भैरवीची घाण मात्र केली यानें !"

परंतु त्याच्या भाषणाकडे बिजलीचे लक्ष होतें कोठें ? ती सत्येन्द्राच्या त्या करारी मुद्रेकडे टक लावून पहात उभी होती. सत्येन्द्राच्या बाबतीत खरोखरच तिची चूक झाली होती. सत्येन्द्राच्या भाषणानें तिच्या नेत्रावरील भ्रमपटल एकदम नाहीसें झालें ! ह्या मितभाषी, बाह्यस्वरूपावरून अत्यंत शात दिसणाऱ्या पुरुषाच्या अगी एवढें धैर्य—एवढा करारीपणा—वसत असेल असें तिला स्वप्नांतसुद्धां वाटलें नव्हते. त्याचे भाषण ऐकून ती स्तभित होऊन उभी राहिली.

सत्य आसनावरून उठला. बिजली मृदुस्वरांत म्हणाली, "इतक्यांतच जाऊं नका—आणखी बसा थोडा वेळ !" तिच्या मुखावर गभीरता पसरली होती.

तिनें उच्चारलेले हे शब्द त्या दारूबाजाच्या कानात शिरतांच, तो ओरडून म्हणाला, "ह, हं, ह, ह ! त्याला थाबण्याकरिता आग्रह करू नका. ह्या पहिल्या आवेगाचा भर ओसरला म्हणजे आपोआपच येईल परत—जातो कोठें ? एकदा मासा गळाला अडकला, कीं सपलें !—जाऊं द्या त्याला !"

सत्य हॉलच्या बाहेर येऊन उभा राहिला. बिजली त्याच्या मागोमाग येऊन त्याचा पथावरोध करून हळू हळू म्हणाली, "हे लोक पहात आहेत म्हणून; नाहीं तर येथल्यायेथे आपल्या चरणांवर मस्तक ठेवून, मी माझ्या अपराधाबद्दल क्षमाप्रार्थना केली असती.—खरोखरच माझा अपराध अत्यत मोठा—"

सत्येन्द्र दुसरीकडे मान फिरवून स्तब्ध उभा राहिला.

ती पुन्हां म्हणाली, "ह्या शेजारच्या खोलींत माझी लायब्ररी आहे. एक वेळ पहायची नाहीं का ? या, आत या—म्हणजे मी मोकळ्या अत.करणानें आपली क्षमा मागते !"

'नाही' असे म्हणून सत्येन्द्रानें आपली पावले जिन्याकडे वळविलीं. बिजली त्याच्या मागोमाग येत होती. ती हळू हळू म्हणाली, "उद्यां तरी भेट होईल का ?"

"नाहीं !"

"यापुढें कधींच भेट होणार नाहीं का ?"

"नाहीं !"

बिजलीचा कठ भरून आला. येणारे अश्रु थाबविण्याचा प्रयत्न करीत ती मोठ्या प्रयासानें अस्फुट स्वरांत म्हणाली, "आपले पुन्हा दर्शन होणार नाहीं, ह्या गोष्टी-

वर माझा विश्वासच बसन नाहीं! परंतु जरी तसें होणें माझ्या दैवीं नसलें, तरी एवढया एका गोष्टीवर आपला विश्वास बसेल का?—"

भग्नस्वर कानीं येतांच सत्य विस्मित झाला. परंतु लगेच त्याच्या अतःकरणात विचार उत्पन्न झाला. गेल्या पंधरा सोळा दिवसापासून चालत असलेल्या अभिनयाच्या दृष्टीनें पाहिलें असता, भग्नस्वर म्हणजे काय होय? तरीदेखील तो थाबला, व बिजलीकडे मुख वळवून उभा राहिला. त्याच्या मुद्रेवरील प्रत्येक रेषेत तिच्याबद्दल वाटणारा अविश्वास पाहून बिजलीचें काळीज चर्रर झाले! परतु ती तरी काय करणार? हाय! हाय! तिच्याबद्दल त्याच्या अत.करणात विश्वास उत्पन्न व्हावा, असे तिने त्याच्याशीं केव्हा वर्तन केलें होते? तिच्याबद्दल विश्वास उत्पन्न करणारे सर्व उपाय तिनें स्वत.च झाडून फेंकून दिले होते!

सत्येन्द्रानें प्रश्न विचारला, "तुमच्या कोणत्या गोष्टीवर मीं विश्वास ठेवावा, असे तुमचें म्हणणे आहे?"

बिजलीचे ओष्ठाधर कंप पावले; परंतु मुखांतून एक शब्दही उमटला नाहीं. आपले अश्रुभाराक्रान्त नेत्र एकदां सत्येन्द्राकडे वळवून तिने पुन्हां खाली मान घातली. ते अश्रुही सत्येन्द्राच्या दृष्टीस पडले नाहीत असें नाहीं. परतु खोटे अश्रु नेत्रात उभे राहणे शक्य नाहीं का? मान वर न उचलताच, सत्येन्द्र आपल्या उत्तराची अपेक्षा करीत आहे, हें तिच्या ध्यानात आलें. परंतु तिचे हृदय भग्न करूनही जी गोष्ट बाहेर पडण्याची धडपड करीत होती, ती गोष्ट ओष्ठावर येऊन अडून बसली! काहीं केल्या तिच्या मुखावाटे शब्दच बाहेर फुटेना!

तिचें सत्येन्द्रावर अतःकरणपूर्वक प्रेम बसले होते! त्या गंभीर प्रेमाच्या एक शतांशाचीही प्राप्ति करून घेण्याकरिता, ती आपल्या सुदर देहावर पाणी सोडण्यासाठी आनदानें तयार झाली असती! आपली दारुण तृषा शांत करण्याकरिता प्रेमाचा एक बिंदु मिळविण्यासाठींसुद्धा तिने आपल्या सर्वस्वावर मोठ्या आनदानें तिलांजलि सोडली असती!—परंतु तिच्यावर विश्वास कोण ठेवणार? जगाच्या दृष्टीनें, ती चिरकालपर्यंत सशयाच्या दृष्टीनें लांछित झालेली होती. अपराधी माणसाचीं शतकोटि चिन्हें सर्वांगावर धारण करून ती आज न्यायाधीशासमोर येऊन उभी राहिली होती. अपराध करणे, हाच तिचा धदा आहे; तरी पण ह्यावेळीं मात्र ती पूर्णपणे निर्दोष आहे, असें तिनें न्यायाधीशाला कोणत्या तोंडानें सागावे? तिनें कितीही जीव तोडून सागितले, तरी तिच्यावर कोण विश्वास ठेवणार? जसजसा जास्त उशीर होऊं लागला, तसतसें तिला स्पष्टपणे दिसू लागलें कीं, न्यायाधीश

तिला लवकरच फांशीची शिक्षा सुनावणार! परंतु त्यापासून स्वतःचा बचाव कर-ण्याचा तिला एकही मार्ग सुचेना! शेवटीं सत्य अधीर होऊन म्हणाला, "जातों मी."

तरीदेखील बिजलीनें मान वर उचलली नाही. ती म्हणाली, "ठीक आहे, जा. परंतु चारी दिशांनी अपराधांत मग्न असूनसुद्धां जा गोष्टीवर माझा पूर्ण विश्वास आहे, त्या गोष्टीबद्दल मनात अविश्वास बाळगून स्वत अपराधी होऊ नका. ही गोष्ट पूर्णपणें ध्यानात असू द्या, कीं प्रत्येक व्यक्तीच्या देहात आमरणपर्यंत परमेश्वराचे अधिष्ठान असतें!" किंचित् कालपर्यंत थांबून ती पुन्हा म्हणाली, "प्रत्येक मन्दिरांतील देवताची पूजा होते असे मी म्हणत नाही; तरीसुद्धा मूर्तींत देवपणा असतोच! त्या मूर्तींकडे पाहून कदाचित् मस्तक नम्र करण्याची बुद्धि कोणाला होणार नाही; परतु त्या मूर्तीचे अस्तित्व नाकारून चालायचें नाही!" इतके बोलून तिनें दृष्टि वर उचलली. पाहते, तों सत्येन्द्र हळू हळू पावलें टाकीत जिन्याच्या पायऱ्या उतरीत होता!

* * *

स्वभावाविरुद्ध विद्रोह करून तसे आचरण करतां येणे शक्य आहे, परंतु स्वभाव नाहीसा होणे शक्य नाहीं. प्रसगविशेषी तो आपली मान वर केल्याखेरीज राहणार नाही! स्त्रीदेहावर शेकडों अत्याचार घडत असले, तरी त्या देहांतील स्त्रीत्वाचा अस्वीकार करून चालावयाचें नाहीं. बिजली नर्तकी होती, तरी ती स्त्री होती! आजपर्यंतच्या तिच्या अल्प आयुष्यात तिच्या हातून किती तरी अपराध घडले असतील; तरीसुद्धां तिचा देह हा स्त्रीदेहच होता!

बऱ्याच वेळानतर ती जेव्हा पुन्हां आपल्या खोलींत आली, त्या वेळी तिच्या शरिरांत गुप्तरूपानें वास करणारा तो लाछित--अर्धमृत स्त्रीस्वभाव अमृतस्पर्शाच्या प्रभावाने पुन्हां जिवत होऊन बसला होता! एवढयाशा अवधीत तिच्या अतरगात घडून आलेलें परिवर्तन एवढें विलक्षण होतें, कीं त्याचा प्रभाव तिच्या बहिरगावरही दिसू लागला होता! ही गोष्ट त्या दारुड्याच्यासुद्धा ध्यानांत येण्याजोगी स्पष्टपणें दिसू लागली होती. तिच्याकडे दृष्टि फेंकून तो म्हणाला "हें काय? तुमच्या नेत्रांत अश्रु चमकताहेत? ह.! काय माणसाची जात आहे पहा! एवढे सुरेख सुरेख पदार्थ, परंतु बेट्यानें एक घाससुद्धां तोंडांत घातला नाहीं! दुर्दैवी बेटा, दुसरे काय? जाऊं द्या--आणा तें नाट इकडे!" असें बोलून

स्वतःच ते ताट त्यानें पुढें ओढले, व त्यांतील पदार्थांवर यथेच्छ ताव मारू लागला !

परंतु त्याच्या भाषणापैकीं एक शब्ददेखील बिजलीच्या कर्णरंध्रांत प्रवेश करू शकला नाहीं ! एकाएकीं तिची दृष्टि स्वतःच्या पायांकडे जाऊन ती एकदम दच-कली. पायांतील चाळ, दंश करण्याच्या तयारीने विळखा घालून बसलेल्या लहरी सर्पाप्रमाणें तिला दिसू लागले. ती खाली बसली, व ते चाळ तातडीने काढून टाकून तिनें एकीकडे फेंकून दिले !

तो छन् छन् ध्वनि कानीं पडून एकानें आश्चर्यानें प्रश्न केला, " बिबिजान, हें काय ? चाळ का काढून फेंकले ? "

बिजली शुष्कहास्य करून म्हणाली, " पुन्हां घालायची इच्छा नाहीं म्हणून ! "

" म्हणजे ? "

" म्हणजे बिणजे कांहीं नाहीं ! तुमची बिबिजान मेली—"

तोंडात बर्फीचा तुकडा टाकून दारुड्या म्हणाला, " काय ? मेली ? केव्हा ? कोणत्या रोगानें ? "

बिजली पुन्हा हंसली ! हे तेंच हास्य होते ! हंसतमुखानें ती म्हणाली, " ज्या रोगानें दीप प्रज्वलित होताच अंधकार मरतो, किंवा सूर्योदय होतांच रात्र मरते, त्याच रोगाने आज तुमची बिबिजान कायमची मेली असे समजा ! "

× × ×

हें घडून आल्यावर चार वर्षांनंतरची गोष्ट ! कलकत्त्यातील एका मोठ्या अवाढव्य वाड्यांत जमिनदाराच्या मुलाच्या वाढदिवसानिमित्त मोठा समारंभ करण्यात आला होता ! मेजवानीचा थाट आटोपला होता. आतां सायंकाळीं बाहेरील दिवाण-खान्यांत नाच गाणें सुरू होणार होतें !

दिवाणखान्यातील एका कोंपऱ्यांत तीनचार नर्तकींचा एक ताफा आपल्या सर्व जय्यत तयारीनिशीं बसला होता. आज यांचेंच गाणें ठरलेले होते ! दिवाण-खान्याच्या दुसऱ्या बाजूच्या खोलींतून, चिकाच्या पडद्या आडून एकटी राधाराणीच बाहेरील दिवाणखान्यांत चाललेल्या आमोदप्रमोदाकडे पहात होती. निमंत्रित स्त्रीसमुदाय यावयाला अजून बराच अवकाश होता !

अगदीं पदध्वनि न होऊं देतां तिच्या मागें येऊन उभा राहून सत्येन्द्र एकदम म्हणाला, " कशाचें निरीक्षण चाललें आहे एवढ्या लक्षपूर्वक ? "

दचकून पतीकडे पाहून राधाराणी म्हणाली, "काय हे ? केवढयानें दचकलें मी !"

स्वामी हंसून म्हणाला, "तूं एकटीच बसली होतीस; तेव्हां म्हटलें जाऊन इकडच्या तिकडच्या गोष्टी तरी बोलाव्या म्हणून आलों, झालें !"

"छट् ! भलतेंच कांहीं तरी !"

"खरोखर तोच माझा येथे येण्यांत मुख्य हेतु आहे. बरें, जाऊं दे त्या गोष्टी ! ह सांग पाहूं, समोर बसलेल्या त्या चौघीपैकीं, तुला सर्वात कोणती जास्त पसत पडते ?"

"ती बघा." असें म्हणून तिनें त्या नर्तकींपैकीं एका अत्यत साधा पोषाख करून बसलेल्या स्त्रीकडे अगुलिनिर्देश केला.

सत्येन्द्र म्हणाला, "ती फारच क्षीण झाल्यासारखी दिसते !"

"ते असेल कदाचित्; परंतु सौंदर्यात तीच सर्वाहून श्रेष्ठ आहे. बिचारी अगदीच गरीब दिसते. तिच्या अगावर दागदागिने काहींच दिसत नाहींत !

"जिला तूं गरीब म्हणतेस, तिलाच सर्वात जास्त रुपये देऊन आणविली आहे. बाकीच्या ह्या दोघींना तीस तीस रुपये देऊन त्या तिसरीला पन्नास रुपये द्यावे लागले.—हिलाच मात्र दोनशे !"

राधाराणी आश्चर्यानें म्हणाली, "काय, दोनशे ? ती फारच उत्तम गाणारीण आहे वाटते ?"

"मी स्वत. कधीं तिचे गायन ऐकलें नाहीं. परंतु लोक सागतात कीं, चारपांच वर्षापूर्वी ती कलकत्त्यांतील सर्वात श्रेष्ठ गाणारीण होती म्हणून ! आतां कसें काय गाते, ते ऐकण्याच्या अगोदर सागता येणार नाही !"

"उगाच एवढे रुपये खर्च करून तिला आणण्याचें काय बरें कारण होतें ?"

"दोनशेच्या खालीं ती येण्याला तयारच नव्हती मुळीं ! दोनशे देऊनसुद्धा ती येणार नव्हतीच; परंतु शेवटीं मोठ्या प्रयासानें ती यावयास कबूल झाली !"

राधाराणीला जास्तच नवल वाटले. ती विस्मयव्यंजक स्वरानें म्हणाली, "पैसे देऊनसुद्धा ती येण्याकरिता एवढे प्रयास करावे लागले ?"

सत्येन्द्र जवळच एका आसनावर बसून म्हणाला, "त्याचे कारण, तिनें हा व्यवसाय सोडून दिला आहे. एवढी जबर रक्कम सांगण्याचा तिचा मूळ उद्देश हाच कीं, तिच्या अगीं वाटेल तसा चागला गुण असला, तरी एवढया मोठ्या

रकमेचें नांव ऐकतांच कोणी तिला बोलावणारही नाहीं, आणि आपल्या मर्जी-विरुद्ध तिला गाण्याकरिता जावें लागणार नाहीं! तिनें यावें अशी माझीच इच्छा होती; म्हणून काय वाटेल तें झालें तरी तिला आणायचेंच असें मीं ठरविलें होतें."

सत्येन्द्राच्या शेवटच्या वाक्यावर तिचा विश्वास बसला नाहीं. तिनें हंसून विचारलें, " तुमची इच्छा मला ठाऊक आहे. ते जाऊ द्या. परंतु तिनें आपला व्यवसाय सोडण्याचें कारण काय ?"

" तें तुला ऐकायचें आहे ? "

"होय. सांगा."

कांहीं कालपर्यंत स्तब्ध राहून, नंतर सत्येन्द्र म्हणाला, "तिचें नांव बिजली! एके काळीं—परंतु थांब, लवकरच येथे माणसे येऊ लागतील! चल, आपण आंत जाऊन बसू!"

" चला, " असें म्हणून राधाराणी उठून उभी राहिली!

* * * *

स्वामीच्या चरणाशीं बसून राधाराणीनें सर्व हकीगत ऐकून घेतली! नंतर पदरानें नेत्र कोरडे करून ती म्हणाली, " म्हणूनच तिला आज या ठिकाणीं बोलावून अशा प्रकारें तिचा अपमान करून, झालेल्या प्रकाराबद्दल सूड उगवावयाचा वाटते? कोणीं दिला हा सल्ला आपणाला ? "

सत्येन्द्राचे स्वतःचे नेत्रही कोरडे नव्हते! पुष्कळ वेळां मध्येंच त्याचा कंठही भरून येत असे! तो म्हणाला, "तिला ह्या प्रसगीं बोलावण्यात तिचा अपमान झाला, हें खरें! परंतु ते आपण तीन व्यक्ति खेरीज करून चवथ्या कोणाही इसमाला समजणें शक्य नाही! कोणाला समजणारही नाहीं!"

राधाराणीनें काहीं उत्तर दिलें नाहीं. पुन्हां एकदां पदरानें नेत्र पुसून ती बाहेर निघून गेली.

निमंत्रित मंडळी हळू हळू जमा होऊ लागली होती! मधून मधून स्त्रीकंठांतून बाहेर पडणारा कलकल ध्वनि चिकाच्या पडद्याचा भेद करून बाहेर येत होता! बाकीच्या तिघी नर्तकी प्रस्तुत होत होत्या; फक्त बिजली अजूनसुद्धां खालीं मान घालून स्वस्थ बसली होती. गेल्या चार पांच वर्षांत तिच्याजवळचें सर्व द्रव्य संपून तिची स्थिति अगदींच गरिबीची झाली होती. दारिद्र्याच्या कात्रींत सांपडल्याकारणानेंच, आज तिला, पुन्हा तो कायमचा त्याग केलेला व्यवसाय अगी-

कारून या ठिकाणी येणे भाग पडलें होतें! परंतु आज पुन्हा पूर्वीप्रमाणें निर्लज्जपणा स्वीकारून भर सभेत उभें राहणे तिला अशक्य वाटूं लागले! अपरिचित पुरुषांच्या सतृष्ण दृष्टीपुढे, आपला देह दगडाप्रमाणे भारी होऊन, पाय हालचाल करावयाचें नाकारतील, असें तिला दोन तासांपूर्वी वाटलेसुद्धा नव्हते!

" आपल्याला बोलवताहेत !"

बिजलीनें दचकून मागें वळून पाहिलें, तो एक बारा तेरा वर्षांचा मुलगा जवळ उभा होता. तो घराच्या आंतील भागाकडे अगुलिनिर्देश करून पुन्हां म्हणाला, " बाईसाहेब तुम्हाला बोलावताहेत ! "

बिजलीला हें संभवनीय वाटेना! तिने पुन्हां प्रश्न विचारला, " कोण बोल-वते आहे मला ? "

" बाईसाहेब ! "

" तूं कोण आहेस ? "

" मी ह्या घरीं नोकर आहे ! "

बिजली अविश्वास दाखवून, मान हालवीत म्हणाली, " तुझी कांहीं तरी चूक झालेली दिसते! मला नसून दुसऱ्या कोणाला तरी बोलावण्याकरितां तुला सांगितलें असेल! जा, पुन्हा एकदां खात्री करून ये, जा."

मुलगा निघून गेला. नंतर थोड्याच वेळानंतर पुन्हां परत येऊन म्हणाला, " तुमचेंच नाव बिजली ना ?—मग चला तर, तुम्हालाच बोलावले आहे ! "

" चल. " असे म्हणून बिजलीनें पायातील चाळ सोडून ठेवले, व त्या मुला-बरोबर आत जाण्याकरिता उठून उभी राहिली. तिला वाटलें, काहीं तरी विशेष गाण्याबद्दल घरमालकिणीची फरमाईश असेल कदाचित्.

खोलीच्या दाराशीच राधाराणी, मुलाला कडेवर घेऊन उभी होती. त्रस्त कुंठित गतीने बिजली तिच्यासमोर येऊन उभी राहतांच तिनें अत्यादरपूर्वक हात धरून तिला आंत नेले. त्या खोलींत दुसरें कोणीही नव्हतें! तिला एका कोचावर बसवून, आपण तिच्या शेजारीं बसत राधाराणी म्हणाली, " ताई, पटते का कांहीं ओळख ? "

बिजली आश्चर्यानें हतबुद्ध झाली! मुलाला दाखवून राधाराणी म्हणाली, "धाकट्या बहिणीची ओळख पटली नाहीं, तरी हरकत नाहीं म्हणा. परंतु ह्याची ओळख पटली नाहीं, तर मात्र मी फार रागावेन बरें का!" असें म्हणून ती हळू हळू हंसूं लागली!

एवढें झालें तरी बिजली काहीं बोलली नाही ! परतु हळू हळू अधकारयुक्त आकाशात प्रकाश दिसूं लागला. तिची दृष्टि त्या अनिंद्य सुन्दर मुखावरून ढळून, सद्य प्रस्फुटित गुलाबपुष्पाप्रमाणे मनोहर दिसणाऱ्या त्या अर्भकाच्या मुखावर खिळून बसली. राधाराणीही काहीं बोलली नाही. अकस्मात् बिजली उठून उभी राहिली, व मुलाला राधाराणीच्या कडेवरून काढून घेऊन, तिनें त्याला आपल्या हृदयाशी घट्ट धरून ठेवलें ! तिच्या नेत्रावाटे अश्रुधारा सारख्या वाहत होत्या ! राधाराणी म्हणाली, "ताई, ओळख पटली का ?"

" हो. "

राधाराणी म्हणाली, "ताई, समुद्रमंथनानंतर उत्पन्न झालेले विष स्वतः प्राशन करून अमृत तेवढें तुम्ही आपल्या धाकट्या बहिणीच्या वाट्यास ठेवलें ! तुमच्यावर त्याचें प्रेम बसले होते, म्हणूनच मला त्या चरणांची प्राप्ति झाली !"

खोलींतील टेबलावर ठेवलेला सत्येन्द्राचा एक लहानसा फोटो हातांत घेऊन, बिजली अनिमिष नेत्रानीं त्याच्याकडे सारखी पहात होती ! काहीं वेळानतर किंचित् हसून ती मृदुस्वरात म्हणाली, "ताई, विषाकरिता विष हेच अमृत असते ! मी माझ्या प्राप्य वस्तूपासून वञ्चित झालें, असे मला वाटत नाहीं ! तें विष माझ्या वाट्याला आले, म्हणूनच मी अमर झालें असें मला वाटते !"

त्यावर उत्तर न देता राधाराणी म्हणाली, " एकदा भेट घेण्याची इच्छा आहे का ? "

क्षणभर नेत्र मिटून बिजलीनें आपले अतःकरण स्थिर केले. नंतर ती शात-पणे म्हणाली, "नको ताई ! चार वर्षापूर्वी माझ्या पापस्पर्शाला ओळखून जेव्हा त्यानी तिरस्काराने माझ्यापासून आपलें मुख फिरविले, तेव्हा मी गर्वभराने म्हणालें होते, कीं पुन्हां केव्हा तरी तुम्ही याल खास ! परतु ते पुन्हा कधींही आले नाहींत ! माझा गर्व जिरला ! परमेश्वरानें त्या वेळेस माझ्या गर्वाचे खडन का केलें, तें आज माझ्या ध्यानात आलें. परमेश्वर एका वस्तूचा भंग करून त्याऐवजी दुसऱ्या कोणत्या तरी वस्तूचे प्रदान करतो, एक वस्तु हिरावून घेऊन त्याऐवजीं तेवढ्या किंमतीची दुसरी वस्तु त्याच व्यक्तीला पुन्हा अर्पण करतो, ही गोष्ट माझ्यापेक्षा जास्त चागली कोणा-लाही पटली नसेल !" पुन्हा एकदां पदराने अश्रु पुसून बिजली पुढे म्हणाली, "अतःकरण तळमळत असल्याकारणानें, अज्ञानामुळे पुष्कळदां मी परमेश्वराला

नावें ठेविली होतीं ! परंतु त्याच्या दयेची खरी किंमत काय, ते मला आज कळलें ! त्यांना माझ्याजवळ पुन्हां परत आणले असतें, तर मग चारी बाजूनी माझा सर्वस्वी नाशच ओढवला असता ! त्याची प्राप्ति तर मला झाली नसतीच, उलट मी आपलें स्वत्व मात्र गमावून बसले असते ! तसे न होऊं देण्यातच परमेश्वराची खरी कृपा होती असे मला आता खात्रीपूर्वक वाटतें ! ”

राधाराणीचा कंठ सद्गदित झाला होता. पुष्कळ प्रयत्न करूनही तिच्या मुखातून एक शब्दही निघेना ! बिजलीच पुन्हा म्हणाली, “ पुन्हा एकादे वेळी भेट झाली म्हणजे चरणावर मस्तक ठेवून पुन्हा एकदा क्षमाप्रार्थना करीन अशी माझी इच्छा होती ! परंतु आता मला त्याचीही काही आवश्यकता आहे, असें वाटत नाही ! ताई, माझी एक विनति आहे; एवढा फोटो मला पाहिजे आहे ! यापेक्षा जास्त मला कशाचीही अपेक्षा नाही, अपेक्षा केली, तर देवाला ते सहन होणार नाही !—जाते मी आता ! ” असे म्हणून ती उठून उभी राहिली !

अत्यत प्रेमपूर्वक राधाराणीने विचारले, “ ताई, आता पुन्हा भेट केव्हा व्हायची ?”

“यापुढे मी पुन्हा तुम्हाला भेटणार नाही ! माझे एक लहानसे घर आहे, ते विकून लवकरच मी कलकत्ता सोडून लाब कोठे तरी निघून जाण्याचे ठरविले आहे. बरे, दुसरी एक गोष्ट तुम्हाला विचारायची, ती ही की, इतके दिवसानतर आजच एकाएकी माझे स्मरण होण्याचे काय कारण ? मला बोलावण्याकरिता जो माणूस पाठविला होता, त्यानेसुद्धां माझ्याजवळ खोटेच नाव सांगितले ! ह्याचे कारण काय ?”

लज्जेमुळे राधाराणीचे मुख आरक्त झाले. काही न बोलता ती खाली मान घालून उभी राहिली.

एक क्षणानतर बिजली स्वतः म्हणाली, “ मला वाटतें ते कारण माझ्या ध्यानात आलें आहे ! माझा अपमान करावा अशी त्यांची इच्छा होती, हेच ना ते कारण? त्याखेरीज एवढा प्रयत्न करून मला बोलावण्याचे दुसरे कारण मला कांहींच दिसत नाहीं !”

राधाराणीचे मस्तक जास्तच अवनत झाले. बिजली हसून म्हणाली, “ त्यात तुम्हाला लाज वाटण्याचें काय कारण आहे ? एवढें मात्र खरें कीं, माझ्या बाबतींत त्यांचीसुद्धां चूकच झाली ! त्यांच्या चरणीं माझे सहस्रवार प्रणाम निवेदन करून

सागा, म्हणावे, माझें स्वतःचें असें आता माझ्याजवळ काहीच उरले नाही ! माझा मान झाला तरी तो त्यांचाच मान, आणि अपमान झाला तरी त्याचे दु:ख त्यांनाच !"

राधाराणीनें बिजलीच्या चरणांवर मस्तक ठेवले.

"अष्टपुत्रा सौभाग्यवती भव असा आशीर्वाद देण्याचा अधिकार मला नाही ! वयाने मी तुमच्यापेक्षा पुष्कळ वडील असूनसुद्धा, तो अधिकार मला नाहीं ! तरी पण परमेश्वराच्या चरणी माझी अशी प्रार्थना आहे, की तुमचे सौभाग्य चिरकाळपर्यंत टिको ! येतें मी !"

